वारकरी संप्रदायाचे आराध्य दैवत

# || भगवान श्री पांडुरंग परमात्मा ||



## स्वानंद सुखनिवासी जोग महाराज संस्थापित

## वारकरी शिक्षण संस्थेची वंशपरंपरा

आदिनाथ (भगवान शंकर)
|
मच्छिंद्रनाथ
|
गोरक्षनाथ
|
गहिनीनाथ
|
निवृत्तिनाथ
|
ज्ञानेश्वर महाराज
|
विष्णुबोवा जोग महाराज
|
बंकटस्वामी — लक्ष्मणबोवा — मारुतीबोवा गुरव — मामासाहेब दांडेकर
|
वारकरी शिक्षण संस्था
|
हजारो विद्यार्थी

इवलेसें रोप लावियेले द्वारीं । त्याचा वेलु गेला गगनावरी ।।

वारकरी संप्रदायाचे थोर प्रवर्तक

## ।। सद्‌गुरु जोग महाराज ।।



• संस्थापक •
वारकरी शिक्षण संस्था

# ✻ अभंगानुक्रमणिका ✻

॥ हरिः ॐ ॥

श्री विठ्ठलरुक्मिणी प्रसन्न

# सार्थ हरिपाठ नामामृत

## अभंग पहिला

देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी ।
तेणें मुक्ति चारी साधियेल्या ॥ १ ॥
हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।
पुण्याची गणना कोण करी ॥ २ ॥
असोनि संसारीं जिव्हे वेगु करी ।
वेदशास्त्र उभारी बाह्या सदा ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे व्यासाचिया खुणा ।
द्वारकेचा राणा पांडवां घरी ॥ ४ ॥

अर्थ : श्री ज्ञानेश्वर माउली रचित सत्तावीस अभंगात्मक हरिपाठाचा हा पहिला अभंग असल्यानें यामध्ये आपल्याकडील जुन्या लेखकांच्या पद्धतीप्रमाणें ज्ञानेश्वर माउलींनी 'हरिपाठाचे' अनुबंधचतुष्टय सांगितले आहे, असे म्हणावयास हरकत नाही. अधिकारी, विषय, प्रयोजन व संबंध यांस अनुबंधचतुष्टय म्हणतात.

**देवाचिये द्वारीं उभा क्षणभरीं । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ॥ १ ॥**

जो देवाच्या दरवाज्यांत क्षणभर उभा राहतो त्याला सलोकतादि चारी मुक्तींचा लाभ होतो. ॥ १ ॥

पहिल्याचरणामध्ये ग्रंथाचा अधिकारी व प्रयोजन सांगितलें आहे. जो देवाच्या दरवाज्यांत उभा राहिला तो या ग्रंथाचा अधिकारी होय. येथे थोडेसे स्पष्टीकरण करणें आवश्यक आहे. ज्ञानेश्वर महाराज 'देवळाचा' दरवाजा म्हणत नाहीत. ते 'देवाचा' दरवाजा म्हणतात. हा फरक पुष्कळ लोकांच्या लक्षांत येत नाही. म्हणून ते देवळाच्या दरवाज्यांत बसून हे चरण म्हणतांना दिसतात. आपण द्वार हा शब्द साधन या अर्थाने वापरतो. देवाचें द्वार म्हणजे देवाच्या प्राप्तीचें साधन असा अर्थ होतो. तेव्हां या चरणाचा अर्थ असा आहे कीं जो देवाच्या प्राप्तीचे साधन क्षणभर ( = जन्मभर ) करतो त्याला चारी मुक्तींचा लाभ होतो. तें साधन कोणतें हे पुढच्या चरणांत सांगितले आहे. चारी मुक्तींचा लाभ हेच या ग्रंथाचें प्रयोजन आहे.

दुसऱ्या चरणांत ज्ञानेश्वर महाराज मुखाने हरि म्हणा, मुखाने हरि म्हणा असें द्विरुक्ती करून मोठ्या कळकळीनें सर्वांना सांगतात. त्यायोगानें ज्याचें मोजमाप करता येणार नाही असे अगणित पुण्य निर्माण होईल. ॥ २ ॥ या चरणांमध्ये ज्ञानेश्वर महाराज 'हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा' याम्हणण्यातून या ग्रंथाचा विषय सांगतात. या ग्रंथाचें नांव 'हरिपाठ' आहे, यावरून या ग्रंथाचा विषय हरीचें स्मरण आहे हे उघडच होणार आहे. शिवाय ज्ञानेश्वर महाराजांची परंपरा पुढें चालवणाऱ्या वारकरी पंथामध्यें हे हरिपाठाचे अभंग म्हणतांना प्रत्येक अभंगाच्या शेवटी **'हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥ २ ॥** असें म्हणण्याची रीत आहे. प्रत्येक अभंगास वेगळे धृवपद नाहीं. सर्व अभंगांचे हेच धृवपद समजले जाते.

तिसऱ्या चरणांत ज्ञानेश्वर महाराज पहिल्या चरणाच्या उत्तरार्धात जो अधिकारी सांगितला त्याचें स्पष्टीकरण करतात व आपण जें सांगितलें त्याला आधार देतात. देह-स्त्रीपुत्रगृहरूपी संसारांत राहूनहि जिव्हेला हरिनामाचे प्रखर व्यसन लावून घ्या असें वेदशास्त्रादिक हात वर करून सारखे सांगत आहेत.



**असोनि संसारी जिव्हे वेगु करी । वेदशास्त्र उभारी बाह्या सदा ॥ ३ ॥**

येथें एक गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे हरिपाठ हे ईश्वरप्राप्तीचें असे साधन आहे कीं त्यासाठी घरदार सोडण्याची आवश्यकता नाही. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ही गोष्ट मी माझ्या पदरची सांगतो असे नव्हे, सर्वांना प्रमाण असणारा वेदहि वर हात करून असेच सांगतो.

चौथ्या चरणामध्ये आपण जे हरिपाठाच्या अधिकाऱ्याचें व प्रयोजनाचें स्वरूप सांगितलें त्याला उदाहरण म्हणून ज्ञानेश्वर महाराज पुराणांतील एका घटनेचा उल्लेख करतात. ते म्हणतात कीं

**ज्ञानदेव म्हणे व्यासाचिया खुणा । द्वारकेचा राणा पांडवा घरीं ॥ ४ ॥**

महर्षी वेद व्यासानीं लिहून ठेवलेल्या खुणेनें (महाभारतावरून) मी असे सांगतों कीं राज्यासारखा संसार करीत असलेल्या पांडवांच्या घरीं त्यांनी आपणांस अशा प्रकारचें हरिनामाचें प्रखर व्यसन लावून घेतल्यामुळें द्वारकाधीश श्रीकृष्णाने उष्ट्या पत्रावळी काढल्या व घोड्यांना खरारा करणे अशी अनेक कामे केली.

तात्पर्य, प्रपंच करून परमार्थ करणारा पुरुष या ग्रंथाचा अधिकारी, चारीं मुक्ति हे प्रयोजन व ज्या साधनाने वर उल्लेख केलेला अधिकारी मुक्ति मिळवितो तो हरीचा नामोच्चार या ग्रंथांचा विषय आहे. अधिकारी, विषय, प्रयोजन सांगितल्यानंतर संबंध आपोआपच कळून येतो. म्हणून ज्ञानेश्वर महाराजांनी संबंधाचा वेगळा उल्लेख केलेला नाहीं. आतापर्यंत पहिल्या अभंगाचा थोडक्यात अर्थ सांगितला.

**प्रास्ताविक :-** ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरी, अमृतानुभव व चांगदेवपासष्टी हें ग्रंथ ज्या वर्गाकरिता केले आहेत, त्यापेक्षा भिन्न वर्गाकरिता हरिपाठ हा छोटा ग्रंथ केला आहे. वेदशास्त्रांमध्यें निरनिराळ्या प्रकारची अनेक साधने सांगितलेली आहेत.

**जरी वेदे बहुत बोलिलें । विविध भेद सूचिलें ।**
**तऱ्ही आपणा हित आपुलें । तेंचि घेपे ।।** ज्ञा. २- २६०

**अर्थ :** जरी वेदांत पुष्कळ गोष्टी सांगितल्या आहेत; अनेक (विधिनिषेधांचे) प्रकार सुचविले आहेत, तरी त्यापैकी जेवढें कांहीं आपल्या हिताचे असेल तेवढेच घ्यावे. तसेच तु. म. म्हणतात -

**वेद अनंत बोलिला । अर्थ इतुलाचि शोधिला ।**
**विठोबासी शरण जावे । निजनिष्ठा नाम गावे ।** तु. म.- २१३०

**अर्थ :** वेदांनी अगणित वर्णन केलेलें आहे, (अनेक विषय सांगितलें आहेत) त्यात शोध करून पाहिले असता हाच मुख्य अर्थ निघाला आहे. तो असा कीं, विठोबारायाला सर्व भावाने शरण जाऊन, त्याचे नाम निजनिष्ठेने (आत्मनिश्चयाने) घ्यावे.

मग वेदाने निरनिराळ्या प्रकारे कां सांगितले आहे ? याचे उत्तर असे आहे कीं अधिकारी वर्ग निरनिराळे आहेत म्हणून सांगितलें आहे. उदा. - वैद्य आपल्याजवळ निरनिराळ्या प्रकारची औषधें ठेवतो. याचे कारण काय तर रोगी अनेक प्रकारचे असतात. म्हणून तद्वत् वेदमार्गाला अनुसरून ज्ञानेश्वर महाराजांनी निरनिराळ्या लोकांकरिता अनेक ग्रंथ केले. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, आम्ही वेदाच्या व ऋषीमुनींच्या मार्गाने चाललो आहोत.

**वेदमार्गें मुनि गेले त्याचि मार्गें चालिलो । न कळेचि विषय अंधा म्हणोनि उघड बोलिलो । चालता धनुर्धरा तरंगाकारी हारपलो । ज्ञानदेव निवृत्तिचा द्वैत सर्व निरसलो ।।** ज्ञा. म. ९६०



गीतेमध्येसुद्धा कर्म, उपासना, ज्ञान असे विभाग करून सांगितले आहेत. तरी त्या सर्व साधनांचे ध्येय - सार एकच आहे, ते म्हणजे ब्रह्मप्राप्ती, आत्मप्राप्ती.

हुशार ग्रंथकर्ता ग्रंथ सांगण्यापूर्वी अनुबंधचतुष्टय सांगत असतो. अनुबंधचतुष्टय म्हणजे काय- ज्याच्या ज्ञानाने मुख्य ग्रंथात प्रवेश होतो त्याला अनुबंध म्हणतातात. **अनुबध्नाति इति अनुबंधः** ते चार आहेत. **१) अधिकारी २) विषय ३) प्रयोजन ४) संबंध**

अनुबंध कळल्यावर हा ग्रंथ कोणाला अनुलक्षून केला आहे. उदा. - गीता, उपनिषदे, ब्रह्मसूत्रे यांचे अधिकारी भिन्न आहेत. त्याचप्रमाणें हरिपाठाचे अधिकारी भिन्न आहेत. आता ज्ञानेश्वरीचा अधिकारी कोण, ते ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगचि अधिकारिये ।**
**परि लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ।।** ज्ञा.१८-१७४९

**अर्थ :** या अध्यात्मशास्त्रांत अंतर्मुखवृत्ति झालेलेच अधिकारी आहेत. परंतु शब्दचातुर्याने (सामान्य) लोक सुखी होतील.

**अहो अर्जुनाचिये पांती । जे परिसणया योग्य होती ।**
**तिहीं कृपा करूनि संतीं । अवधान द्यावें ।।** ज्ञा.१-६२

**अर्थ :** अहो, अर्जुनाच्या पंक्तीला बसून ऐकण्याची ज्यांची योग्यता असेल त्या संतांनीं कृपा करून इकडे लक्ष द्यावे. याचा अर्थ इतरांनी ज्ञानेश्वरी ऐकू नये असे नाही, पण त्यांना त्याचे यथार्थ ज्ञान होणार नाही.

**चकोरा चंद्रामृत फावले । येरा आण वाहुनि काय वारिलें ।**
**डोळ्याविण पाहले । वाया जाय ।।** ज्ञा.११-९६

**अर्थ :** चकोर पक्ष्याला चंद्रामृत प्राप्त झालें, तेच चंद्रामृत इतर

प्राण्यांना घेऊ नका म्हणून शपथ घालून चंद्राने त्याचें निवारण केले आहे काय ? परंतु जसे इतरांस (अमृतसेवनाची) दृष्टी (हातवटी) नसल्यामुळे चंद्रोदय होऊनहि तो व्यर्थ जातो, तसे हे ज्ञान आहे त्याला अधिकार असावा लागतो.

**आतां आत्मप्रभा नीच नवी । तेचि करूनि ठाणदिवी ।**
**जो इंद्रियांते चोरूनि जेवी । तयासीची फावे ।।** ज्ञा.६-२३.

**अर्थ :** आता नित्य नवा आत्मप्रकाश हाच कोणी एक ठाणदिवा करून, जो इंद्रियांना न कळतां जेवतो. (उपभोग घेतो); त्यालाच (कैवल्यरूप पक्वान्नांचा) लाभ होतो. तात्पर्य, ज्याची अंतर्मुख वृत्ति झालेली आहे तोच गीतेचा अधिकारी आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी तर उघड उघडच ज्ञानेश्वरीमध्ये ज्ञान सांगितले आहे. पण हे ज्ञान पटेल इतका शुद्ध अंतःकरणाचा साधक निराळाच. कारण अंतःकरण शुद्धीकरिता यम-नियमांचें डोंगर पार करावे लागतात.

**आणि यमनियमांचे डोंगर । अभ्यासाचे सागर ।**
**क्रमोनि हे पार । पातले ते ।।** ज्ञा.५-१५९

**अर्थ :** यमनियमांचे डोंगर व अभ्यासाचे समुद्र पार करून (ओलांडून) ते ह्या पलीकडच्या तीराला (ब्रह्मत्वाला) पोहोचले एकेक यम - नियम साधण्याकरिता बारा बारा वर्षें लागतात असे स्वामी विवेकानंद सांगत असत.

यम पांच आहेत :- १) अहिंसा २) सत्य ३) अस्तेय ४) ब्रह्मचर्य ५) अपरिग्रह व नियम पांच आहेत १) शौच २) संतोष ३) तप ४) स्वाध्याय ५) ईश्वरप्रणिधान. असे यमनियम पांच-पांच आहेत.

आतां अमृतानुभवाविषयी तर बोलावयासच नको. तो तर सिद्धानुवादच आहे.



**ज्ञानदेव म्हणे श्रीमंत । हे अनुभवामृत ।**
**सेवोनि जीवन्मुक्त । हेंचि होतु ।।** अमृ. १० - १९

**अर्थ :** ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हे श्रीमंत अनुभवामृत त्याचे सेवन करून ज्ञानी जीवन्मुक्त अनुभवामृतरूपच होऊन राहोत.

अमृतानुभवाचा अधिकारी जीवन्मुक्त आहे. त्याने आपला अनुभव तपासून घ्यावा एवढ्याकरिता ज्ञानेश्वर महाराजांनी अमृतानुभव लिहिला.

आता चौदाशे वर्षे आपल्या योगसामर्थ्यानें मृत्यूशीं झुंज देऊन विजयी झालेल्या अनेक सिद्धीसंपन्न पण केवळ आत्मज्ञानाविषयी कोऱ्या राहिलेल्या अशा महान तपोनिधी योग्याला केलेला उपदेश म्हणजेच 'चांगदेव पासष्टी' होय.

**एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे । दोनी डोळस आरिसे ।**
**परस्पर पाहता कैसे । मुकले भेदा ।।** चांगदेव पासष्टी-६२.

**अर्थ :** (या ओवीत आरशाच्या रूपकानें ज्ञानेश्वर महाराज आणि चांगदेव या दोघांची स्थिती काय झाली, तिचे वर्णन केले आहे) ज्ञानदेव आणि चक्रपाणी (चांगदेव) हे दोन्ही शुद्ध आत्मज्ञानसंपन्न डोळस आरसे एकमेकांस पाहता, एकमेकांच्या देहदृष्टीने असणाऱ्या भेदभावास दोघेहि मुकले.

भगवान अर्जुनाला सांगतात, तूं गीता भलत्याला सांगू नकोस, म्हणजे कोणाला सांगू नको.

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ।।** गी.१८-६७

**अर्थ :** १) जो तपोहीन आहे २) गुरु-देवांविषयी भक्तीत ढिला आहे

२) ज्याला हे ज्ञान ऐकण्याची इच्छा नाही व ४) जो माझी निंदा करतो, त्याला हे ज्ञान कधीहि सांगू नकोस.

अधिकारी पुरुषाला गीता सांगावी हे खरे, पण अनधिकारी विषयासक्त पुरुषाने म्हणजे मध्यमवर्गाने काय करावे, तर त्यांच्याकरिता ज्ञानेश्वर महाराजांना दया आली आणि त्यांनी सामान्य लोकांकरिता हा हरिपाठ सांगितला आहे. हरिपाठानेच तुम्हाला ज्ञान प्राप्त होईल. म्हणून तुकाराम महाराज अशा लोकांना उपासना सांगतात -

**अवघ्या दशा येणेंचि साधती । मुख्य उपासना सगुणभक्ति । प्रगटे हृदयींची मूर्ति । भावशुद्धि जाणोनियां ॥ १ ॥ बीज आणि फळ हरीचे नाम । सकळ पुण्य सकळ धर्म । सकळां कळांचे हें वर्म । निवारी श्रम सकळही ॥ धृ ॥** तु. म. - ७१३

**अर्थ :** श्रीहरीच्या सगुण स्वरूपाची भक्ती करणे हीच मुख्य उपासना आहे. ह्याच योगाने सर्व अवस्था साध्य होतात व त्यांचे ठिकाणीं शुद्ध भाव आहे असे जाणून त्या भक्तांच्या हृदयांत श्रीहरीची मूर्ति प्रगट होते. ॥ १ ॥ श्रीहरीचे नाम हेंच मुख्य बीज असून फळहि तेच आहे. सर्व पुण्य, सर्वधर्म व सर्व कला प्राप्त होण्याचे वर्म नामच आहे आणि त्याच योगाने सर्व जन्ममृत्युचे श्रम निवारण होतात. ॥ धृ ॥

म्हणून ज्ञानेश्वरी व हरिपाठ यांचे अधिकारी भिन्न सांगितले आहेत. आता - ब्राह्मणांना जशी संध्या करणीय आहे, त्याचप्रमाणे वारकऱ्यांना हरिपाठ म्हणणीय आहे. ज्याप्रमाणे संध्या केल्याशिवाय ब्राह्मण होत नाही, म्हणून रोज संध्या नित्यनियमाने करावी. त्याप्रमाणे हरिपाठ म्हटल्याशिवाय वारकरी होत नाही; म्हणून दररोज हरिपाठ म्हणावा. हरिपाठ हा वारकऱ्यांमध्ये सर्व अबालवृद्धांच्या तोंडी आहे. हरिपाठ हा काही स्फूट सत्तावीस अभंग एकत्र करून तयार केलेला



नव्हे, हे सर्व अभंग जसे एका सूत्रांत मणि गोविलेले असावेत तसे असल्याने हरिपाठ ही सत्तावीस अभंगांची एक साखळीच आहे. या सर्व अभंगांना ध्रुवपद एकच आहे, ते कोणते म्हणाल तर -

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥ धृ ॥**

या हरिपाठ ग्रंथाविषयी अनेक अख्यायिका आहेत. कित्येकांचे म्हणणे असे आहे कीं, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव या ग्रंथांच्या भाषेशी तुलना केली तर हरिपाठाची भाषा सरळ, सोपी आणि अलिकडच्या काळातील दिसून येते. त्यामुळे हा ग्रंथ (हरिपाठ) ज्ञानेश्वर महाराजांचा असावा किंवा नसावा असा संशय निर्माण होतो, परंतु हा संशय व्यर्थ आहे. कारण हरिपाठ हा सोपा, रोजच्या म्हणण्यातला व त्यामुळे अबालवृद्धांच्या तोंडी झाल्याने त्याची आजची भाषा माउलींच्या काळातील मुळीच राहिलेली नाही. तसेच त्यांचे कमी प्रचारांत असलेले जे ग्रंथ आहेत, (अमृतानुभव, ज्ञानेश्वरी, चांगदेव पासष्टी इ.) त्यांत त्या ग्रंथांचे इतके रूपांतर झालेले दिसत नाही. ही गोष्ट लक्षांत न आल्यामुळे कित्येक चिकित्सक लोक हरिपाठ हा ज्ञानदेवांचा ग्रंथच नाही असे म्हणतात. पण वस्तुस्थिती वर सांगितल्याप्रमाणे असल्यामुळे हरिपाठ हा ज्ञानेश्वर महाराजांचाच आहे. नुसत्या शब्दांच्या रूपावरून माउलींचा नाही असे म्हणू नये. दुसरी गोष्ट अशी कीं - 'हरिपाठ' ही ज्ञानदेवांचीच वाङ्मयीन कृती आहे, याला अंतर्गत पुरावा देण्यासारखा आहे. **हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।** या कडव्यामधून ज्ञानेश्वर महाराज जगाला वरीलप्रमाणे उपदेश करतांना आढळून येतात. यामुळे हरिपाठात त्यांनी स्वानुभव सांगितला आहे याची हरिपाठ वरवर चाळून पाहणाऱ्याला कल्पनाच येत नाही, पण खोल दृष्टीने अभ्यास करू लागल्यास असे आढळून येईल कीं, 'हरिपाठ' कां करा हे सांगतांना ज्ञानेश्वर महाराजांनी इतर प्रमाणें न देता आपला अनुभव, आत्मप्रचिती

सांगितली आहे व तो अनुभव आणि त्याची भाषा त्यांच्या इतर ग्रंथांत त्यांनी कथन केलेल्या अनुभवाशी व भाषेशी जुळती आहे, असो. या ग्रंथांत मुख्यत्वेकरून ज्ञानेश्वर महाराजांनी स्थापित अगर परिपुष्ट केलेल्या हरिनामस्मरणरूप भक्तीचा विचार सांगितला आहे. सर्व ग्रंथभा त्यांनी एकच गोष्ट सांगितली आहे, ती म्हणजे भगवंताचे नाम, मनुष्यमात्रांना या ग्रंथाचे पठण व त्यात सांगितल्याप्रमाणे आचरण करण्याचा अधिकार आहे. तरी सर्वधर्मजिज्ञासूंनी या ग्रंथाचा विचार करून आपले खरे हित करून घ्यावे. ज्ञानेश्वर महाराजांचे सर्वच ग्रंथ दुर्बोध आहेत, तरी त्यातल्यात्यात हरिपाठ हा ग्रंथ बराच सुबोध आहे म्हणून पाठांतर करावा व रोज म्हणावा.

**देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी । तेणे मुक्ति चारी साधियेल्या ।**

विवरण : या अभंगाच्या पूर्वार्धात अधिकारी सांगतात उत्तरार्धात प्रयोजन सांगतात आणि ध्रुवपदांत विषय सांगतात. अधिकारी कोण तर प्रथम चरणाच्या पूर्वार्धात सांगितल्याप्रमाणे देवाच्या द्वारां क्षणभर उभा राहणारा हा अधिकारी आहे. देवळाच्या द्वारांत नव्हे देव वेगळा आणि देऊळ वेगळे हे लक्षांत ठेवावे. देवाला दरवाजा आहे काय ? अभंगाच्या भावार्थानंतर आपण प्रथम चरणाचा विचार करू.

१) देव कोणता २) द्वार कोणते ३) उभा म्हणजे काय ४) क्षण कोणता ५) चार मुक्ती कोणत्या ६) देव प्राप्तीचे साधन का ७) फल काय ८) अधिकारी कोणता ९) नामाने संसारी लोक तरत याला आधार काय - या सर्व मुद्यांचा विचार भावार्थानंतर करण्यात येईल. तूर्त भावार्थ पाहू. आता प्रयोजन सांगतात. प्रयोजन म्हणजे फल ते कोणते ? **तेणे मुक्ति चारी साधियेल्या ।** हे फल सांगितले आहे कां ? तर सर्व जीवांचा ओढा पर्यायाने सुखाकडेच आहे; म्हणून मोक्षाकडे आहे. नाथ महाराज सांगतात -



**मजलागी दुःख होआवें । ऐसें कोणी भावीना जीवें । न वांछीतां दुःख पावे । येणें न संभवे स्वतंत्रता ।।** ए. भा. १०-४४६

**अर्थ :** मला दुःख व्हावे अशी मनापासून कोणीच इच्छा करीत नाही; पण दुःख हे इच्छा न करताहि प्राप्त होते. ह्यावरून त्याला स्वतंत्रता संभवत नाही.

मोक्षामध्ये सलोकतादि चार मुक्ति सांगितल्या आहेत. १) सलोकता २) समीपता ३) स्वरूपता ४) सायुज्यता.

१) **सलोकता** - ज्या देवतेची आपण उपासना करतो त्या देवतेच्या लोकाला जाणे याला सलोकता मुक्ति असे म्हणतात. **चिरंजीव कल्प वैकुंठी नांदे किंवा वैकुंठभुवनी घर केले ।**

२) **समीपता** - ज्या देवतेची आपण उपासना करतो त्या देवतेच्या जवळ जाणे याला समीपता मुक्ति असे म्हणतात.

**लक्ष्मीवल्लभ तया जवळी ।**

३) **स्वरूपता** - ज्या देवतेची आपण उपासना करतो त्या देवतेसारखे होणे याला स्वरूपता मुक्ति असे म्हणतात.

**चतुर्भुज नर होऊनि ठेले ।।**

४) **सायुज्यता** - ही ज्ञानाने प्राप्त होते. निर्गुण निराकार जे ब्रह्म आहे त्या ब्रह्माशी तद्रूप होणे याला सायुज्यता मुक्ति म्हणतात. रामानुज जे द्वैती शास्त्रकार आहेत ते साकाराच्या ठिकाणी मुक्ति मानतात. अर्थात् चतुर्भुज होणे म्हणजे स्वरूपता मुक्ति मानतात आणि शंकराचार्यादि मंडळी निराकाराच्या ठिकाणी मुक्ति मानतात म्हणजेच सायुज्यमुक्ति मानतात. ज्ञानेश्वर महाराजहि तेच सांगतात.

**यया ब्रह्मत्वासीचिपार्था । सायुज्य ऐसीं व्यवस्था ।**
**याचि नांवें चौथा । पुरुषार्थु गा ।।** ज्ञा. १४-४०१

**अर्थ :** अर्जुना, या ब्रह्मत्वालाच सायुज्य असे म्हणतात व चौथा पुरुषार्थ हे यालाच नांव आहे. या चारी मुक्ति कशाने प्राप्त होतील, त्याचे उत्तर ज्ञानेश्वर महाराज प्रस्तुत अभंगाच्या दुसऱ्या चरणांत सांगतात.

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ।। २।।**

आपण मुखाने नाम घेणार. पण वाण्या तर चार आहेत. त्यापैकी कोणत्या वाणींने नाम घेणार १) परा २) पश्यंति ३) मध्यमा आणि ४) वैखरी अशा चार वाण्या आहेत.

१) **परा वाणी** - परा वाणी ही नाभिस्थानास्थित आहे. ती निर्विकल्प आठवणरूप असते व ज्ञानामध्ये स्फुरते, कारण परावाणीचे स्फुरण **'अहंब्रह्मास्मि'** असे आहे.

२) **पश्यंति वाणी** - परेपासून हृदयस्थानी किंचितमात्र उमटणारी भासरूप ती पश्यंति वाणी होय. ही मुग्धावस्थेत स्फुरते.

३) **मध्यमा वाणी** - ही कंठस्थानास्थित मननात्मक असते. ही स्वसंवेद्य आहे. म्हणजे स्वतःची स्वतःला समजते.

४) **वैखरी वाणी** - जिच्यायोगाने मनुष्य दुसऱ्याशी बोलू शकतो अशी जी स्वपरवेद्य वाणी म्हणजे ती स्वतःलाहि समजते व दुसऱ्यालाहि समजते आणि जिच्यायोगाने शब्द बाहेर पडतात. ती वैखरी वाणी होय. तर ज्ञानेश्वर महाराज वैखरी वाणीनेच प्रथम नाम घ्यायला सांगतात. **हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।** परमार्थात विघ्नकारक कोण असेल तर ते पाप, त्याच्या निवारणार्थ बलवत्तर पुष्कळ पुण्य पाहिजे. म्हणून तुकाराम महाराज म्हणतात.

**तुका म्हणे नाड । पाप ठाके हिताआड ।।** तु. म. ३४०

**अर्थ :** तुकाराम महाराज म्हणतात, पूर्वी केलेले पाप हे मनुष्यास मोठे फसविणारे आहे, ते पापच त्याच्या हिताच्या आड येते.



**जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः । जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः ।।**

दुर्योधन म्हणतो मी धर्महि जाणतो परंतु माझी धर्माकडे प्रवृत्ती होत नाही आणि अधर्महि जाणतो परंतु त्यातून मी निवृत्त होत नाही. (मी पापपुण्य जाणतो परंतु मला पुण्य करण्याची प्रवृत्ती होत नाही आणि पापनिवृत्तीची इच्छाहि होत नाही.)

आता नामरूपी पुण्य मात्र अनिष्ट निवृत्ति व इष्ट प्राप्ति करून देते. नाम हे सुलभ आहे. ते सर्वांना घेता येते. म्हणून अभंगाच्या दुसऱ्या चरणातून ज्ञानेश्वर महाराज सांगतात कीं नामाने अगणित पुण्य होते. **हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ।।**

नामस्मरण करणाऱ्याची सर्व पापें हरण करतो म्हणून त्याला हरि म्हणतात.

**सकळ पापातें संहारी । यालागी बोलिजे नामे श्रीहरी ।**
**पुण्यपाप तिळभरी । आत्मसाक्षात्कारी उरेना ।।** हस्तामलक-१८५

तुकाराम महाराजहि सांगतात की,

जयामध्ये नारायण । शुद्ध पुण्य तें एक ।। तु. म. २७३७

**अर्थ :** ज्यामध्ये नारायणाची वस्ती आहे, (जे कर्म नारायणाला उद्देशून केले जाते.) तेच एक शुद्ध पुण्य आहे.

**ज्याचे मुखी नाम तोचि एक धन्य । त्याचें शुद्ध पुण्य इयें जनीं ।।** ना.म.

**पुण्यात्मकें पापें स्वर्गा येइजे । पापात्मके पापे नरका जाइजे ।**
**मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य ।।** ज्ञा. ९ - ३१६

**अर्थ :** पुण्यरूप पापानें (बाहेरून दिसायला पुण्य व आतून भरलेलें पाप) स्वर्गाला येता येतें आणि (आंतबाहेर अशा) पापरूप पापानें

नरकाला जाणें होतें. मग माझी प्राप्ती ज्याने होते ते शुद्ध पुण्य होय.

'हरि' या दोन अक्षरांच्या उच्चाराला वेद, शास्त्र, पुराणे, संतांचे ग्रंथ यामधून फार मोठी किंमत दिलेली आहे. भगवान विष्णूंच्या सहस्रनामातीलच 'हरि' हे एक प्रसिद्ध नाम आहे.

अतुलः शरभो भीमः समयज्ञो हविर्हरिः । विष्णुसहस्रनाम

'हरि' नामाला कांही विशेषच महत्त्व प्राप्त झालेले आहे. आम्हा वारकऱ्यांमध्ये तर त्याला विशेष महत्त्व आहे. 'हरि' हे नाम आज इतक्या उच्च पदवीला पोहोचले आहे कीं खुद्द वेद पठणाला प्रारंभ 'हरिः ॐ' या नामानेच करावा लागतो. मी अशी एक गोष्ट पुराणांत ऐकलेली आहे कीं, एका शिष्याने वेदाध्ययन केले व आपल्या गुरुजींच्या जवळ तो परीक्षा देण्यासाठी गेला. शिष्याने वेदाचा काही भाग म्हणून दाखविला व विचारलें कीं गुरुजी, यांत किती चुका आहेत ? यावर गुरुजी म्हणाले, ''अरे बाबा, तो समोर एक वृक्ष आहे, त्याच्याखाली जाऊन बस आणि वेदपठणाला सुरुवात कर. वेद पूर्ण होईपर्यंत जितकी पानें गळतील तितक्या चुका आहेत असे समज.'' गुरूंच्या आज्ञेप्रमाणे समोरच्या वृक्षाखाली जाऊन तो शिष्य वेदपठण करू लागला. तो काही पंक्ती म्हणतो न म्हणतो तोच त्या वृक्षाचीं पानें गळून पडली. हे दृश्य पाहून तो गुरुजींकडे धांवत आला आणि घडलेली सर्व हकीगत सांगितली तेव्हां गुरुजी म्हणाले, ''अरे बाबा, मुळांतच तूं मोठी चूक केली आहेस. आरंभाला 'हरिःॐ' म्हणावयाचे विसरलास.'' अर्थवादाचा यातील काही भाग सोडून दिला तरी त्यात एवढे सत्य कीं 'हरिः ॐ' या शब्दद्वयाला एवढी किंमत आहे कीं, त्यांच्या उच्चाराविना खुद्द वेदांच्यां अक्षरांचा उच्चारहि अपूर्णच समजला जाऊं लागला एवढे या नामाचे अमोल महत्त्व आहे; सामर्थ्य आहे. हीच गोष्ट ब्रह्मदेव आणि महाविष्णु यांच्या संदर्भाने सांगितली



जाते. असो. बाकीची साधनेंहि पुष्कळ आहेत. १) ध्यान २) ज्ञान आणि ३) कर्म परंतु हीं साधनें कठीण आहेत. ध्यान तर अत्यंत कठीण आहे.

**सडें जे देखिलें । तें ध्यानकासें लाविलें ।**
**परिग्रही घातले । तरियावरी ।। ज्ञा.-१२-९१**

अर्थ : जे भक्त सडे (अंतर्बाह्य परिग्रहरहित) आहेत असें मी पाहिलें, त्यांस माझ्या ध्यानरूपी कांसेला लावले व परिग्रही होतें त्यांना नामरूपी नावेवर बसविलें.

असो, जो मनुष्य ध्यानाला बसला असता थोडा वेळ कां होईना जगाला विसरतो. परंतु ध्यान करणारा अपरिग्रही पाहिजे. तो अंतर्बाह्य परिग्रहरहित असावा लागतो. परंतु हे सर्वांना जमणार नाही. ज्यांना स्त्रीपुत्रादिक आहेत; ज्यांचे मन अनेक ठिकाणी विखुरलेले आहे; त्या संसारी लोकांकरिता ज्ञानेश्वर महाराज तिसऱ्या चरणांत सोपा उपाय सांगतात.

**असोनि संसारीं जिव्हे वेगु करी । वेदशास्त्र उभारी बाह्या सदा ।। ३ ।।**

साधुमध्ये दोन वर्ग आहेत १) कठीण मनाचा साधु व २) दयाळू मनाचा साधु. ज्याप्रमाणे वैद्यामध्येसुद्धा वरीलप्रमाणे दोन वर्ग असतात. कडक मनाचा जो वैद्य असतो, तो रोग्याला म्हणतो, ''कुपथ्य करतांना बरे वाटले, आता दुःख भोगा.'' याप्रमाणे रोग्यावर रागावतो. ''माझ्या औषधाचा तुला गुण येत नाही त्याचे कारण कुपथ्य आहे.''

दुसरा वैद्य गोड बोलून रोग्याला औषध देऊन बरे करतो व हळूहळू प्रेमाने त्याला कुपथ्य सोडावयास लावतो व त्याचा रोग बरा करतो. सर्वस्वी रोग्याचे कल्याण इच्छिणारा हा दयाळू वैद्य होय.

तसेच साधुमध्येहि वर सांगितल्याप्रमाणे दोन वर्ग आहेत. पैकी कठीण मनाचे साधु म्हणजे,

**असोनि संसारीं जिव्हे वेगु करी । वेदशास्त्र उभारी बाह्या सदा ॥ ३ ॥**

भगवंताचे नाम आम्ही संसारी लोकांना घ्यायला सांगतो, ते पदरचे काखेंतलें सांगत नाही असे सांगून ज्ञानेश्वर महाराज वरील चरणांत त्याला मोठा पुरावा देतात. **वेदशास्त्र उभारीं बाह्या सदा।**

वेदशास्त्रादिक हात वर करून सारखे सांगत आहेत. काय सांगत आहेत तर देह, स्त्री, पुत्र, घर यांच्यात तुम्ही रहा परंतु यांच्यात राहूनहि जिव्हेला हरिनामाचे प्रखर व्यसन लावून घ्या. असे वेदशास्त्राचे म्हणणे आहे. वेद हा स्वतःप्रमाण आहे म्हणजे याच्या सिद्धीकरिता दुसऱ्याचा पुरावा नको. आस्तिक दर्शनकार वेद प्रामाण्य मानतात. जो वेद मानत नाही तो नास्तिक म्हणावा. **''नास्तिको वेदनिंदकः''** जो वेदांची निंदा करतो तो नास्तिक होय, असे तुकाराम महाराज म्हणतात -

**वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकीया खळ ॥** तु. म.३१२७.

**अर्थ :** ज्याच्यापासून जगाचें हित आहे, त्या वेदांचीं जो निंदा करतो, तो चांडाळ असून भ्रष्ट सुतक्याप्रमाणें नीच आहे.

**नास्तिका द्यावया तोंड । वेदांचें गाढें बंड ।**
**तें देखोनि पाखांड । आनचि वाजे ॥** ज्ञा.१३-१९

**अर्थ :** नास्तिक लोकांबरोबर वादविवाद करण्याकरिता वेदांचें प्रचंड बंड असल्याचें पाहून तें पाखंडीं लोक निराळीच बडबड करतात.

सांख्य शास्त्रकार, पूर्व मीमांसक हें ईश्वर मानत नाहीत, परंतु वेद मानतात म्हणून त्यांना आस्तिक म्हणावे. बौद्ध, जैन, लिंगायत हे देवाला मानतात. परंतु वेदाला मानीत नाहींत, म्हणून तें नास्तिक म्हटले जातात.

ज्ञानेश्वर महाराज हे मोठे आस्तिक होते. यात संशय घेण्याचे मुळीच कारण नाही. कारण त्यांच्या आईवडिलांना ब्राह्मणांनी देहान्त



प्रायश्चित्त दिले व त्यांना गंगेत देहविसर्जन करावयास भाग पाडले. तथापि पैठणहून शुद्धिपत्र आणण्याच्या विषयावरील निवृत्तिनाथ महाराज व ज्ञानेश्वर महाराज यांचा नामदेव महाराजांनी शब्दांकित केलेला संवाद बघावयास पाहिजे. निवृत्तिनाथ महाराज म्हणाले, ''आपण ब्रह्म आहोत, आपणांस शुद्धिपत्रासाठी पैठणला जाण्याची गरज नाही.'' परंतु ज्ञानेश्वर महाराजांच्या आग्रहास्तव त्यांना जावे लागले.

**विधिवेदविरूद्ध संपर्क संबंध । नाही भेदाभेद स्वरूपी ॥ १ ॥**
**अविधि आचरण परम दूषण । वेदोनारायण बोलियेला ॥ २ ॥**
**स्वधर्म अधिकार जातिपरत्व भेद । उचित तें शुद्ध ज्याचे तया ॥ ३ ॥**
**म्हणोनिया संती अवश्य आचरावे । जनां दाखवावें वर्तोनिया ॥४॥**
**कुळीचा कुळधर्म अवश्य पाळावा । सर्वथा न करावा अनाचार ॥५॥**
**प्रत्यवाय आहे अशास्त्री चालता । पावन अवस्था जरी झाली ॥६॥**
**ज्ञानदेव म्हणे ऐका जी निवृत्ति । बोलिली पद्धती धर्मशास्त्री ॥७॥**

नामदेव महाराज गाथा ९०३

वरील अभंगावरून सरळ सिद्ध होते कीं, ज्ञानेश्वर महाराज हे शास्त्राप्रमाणे वागणारे होते.

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥** गी. १६-२४

**अर्थ :** कार्य कोणते व अकार्य कोणते याची व्यवस्था जाणण्याला शास्त्र (वेद) हेच तुला प्रमाण आहे. शास्त्रांत सांगितलेलें कर्म जाणून ते करणें हे या लोकी तुला योग्य आहे.

**शास्त्र म्हणेल सांडावें । तें राज्यही तृण मानावें ।**
**जें घेववी तें न म्हणावें । विषही विरुद्ध ॥** ज्ञा.१६-४६०

**अर्थ :** शास्त्र जे टाकावें म्हणून म्हणेल, तें जर राज्य असले तरी ते गवताच्या काडीप्रमाणें समजावें व शास्त्र जें घ्यावें म्हणून सांगेल, तें

जरी विष असलें, तरी ते प्रतिकूल समजूं नये. ते घ्यावे.

म्हणून ज्ञानेश्वर महाराज वेदशास्त्रांचा आधार घेऊन सांगतात कीं, संसारी लोकांनी भगवंताचे नाम घ्यावे. परंतु कोणी असें म्हणेल कीं संसारात राहून परमार्थ साधलेला असा कोणी आहे कां ? याला प्रमाण काय ? तेच ज्ञा.म. अभंगाच्या चौथ्या चरणांत सांगतात.

**ज्ञानदेव म्हणे व्यासाचिया खुणा । द्वारकेचा राणा पांडवा घरी ॥ ४॥**

पांडव हे संसारी होते पण भगवंताचे नाम अखंड घेत होते. यासाठी व्यासांचा (महाभारतातील) पुरावा दिला आहे.

**पहा ते पांडव अखंड वनवासी । परी त्या देवासी आठविती ॥**

**अर्थ :** (तु. म.१०८३) लोकहो, तुम्ही लक्षांत घ्या ते पांडव सर्वकाळ वनवासांत होते; पण त्या देवाचे अखंड स्मरण करीत होते. पांडवांच्या भक्तीमुळे द्वारकेचे राजे भगवान श्रीकृष्ण त्यांच्या घरी अखंड रावत होते व त्यांची सर्व कामे करीत होते.

**देखा नवल तया प्रभूचें । अद्‌भूत प्रेम भक्तांचें । जे सारथ्य पार्थाचें । करितु असे ॥ पाइकु पाठीशीं घातला । आपण पुढां राहिला । तेणें पांचजन्यु आस्फुरिला । अवलीळाचि ॥** ज्ञा.१-१४२-४३

**अर्थ :** पहा त्या प्रभूचें नवल, त्याचे भक्तांविषयी प्रेम विलक्षण आहे. कारण तो (सर्वशक्तिमान परमेश्वर) पण अर्जुनाच्या सारथ्याचेंहि काम करीत होता. आपल्या दासास पाठीशी घालून तो स्वतः युद्धाच्या तोंडावर राहिला. त्या श्रीकृष्णाने पांचजन्य नांवाचा शंख लीलेनेंच वाजविला. त्याचप्रमाणे संजय म्हणतो -

**पैं कौरवकुळचक्रवर्ती । मज हाचि विस्मयो पुढतपुढती । जे श्रियेहूनि त्रिजगतीं । सदैव असे कवणी ॥ ना तरी खुणेचें**



**बानावयालागी । श्रुतीवांचूनि दावा पां जगी । ना सेवकपण तरी अंगीं । शेषाचांचि आथि ॥ हां हो जयाचेनि सोसें । शिणत आठही पहार योगी जैसे । अनुसरले गरुडाऐंसें । कवण आहे ॥ परि ते आघवेंचि एकीकडे ठेलें । सापें कृष्णसुख एकंदरें जाहलें । जिये दिऊनि जन्मलें । पांडव हे ॥** ज्ञा.११-१६५-६८

**अर्थ :** (संजय म्हणाला), हे कौरव कुळातील सार्वभौम धृतराष्ट्र राजा, मला वारंवार हेंच आश्चर्य वाटतें कीं, लक्ष्मीपेक्षां त्रैलोक्यामध्ये जास्त दैववान कुणी आहे कां ? अथवा तत्त्वाची गोष्ट वर्णन करण्यांत वेदाशिवाय जगांत दुसरा कोणी समर्थ आहे कां ? दाखवा बरे ? अथवा एकनिष्ठ सेवकपण पाहिलें, तर ते एका शेषाच्यात ठिकाणीं आहे. अहो महाराज, ज्या परमात्म्याच्या प्राप्तीच्या इच्छेनें योगी असे आठहि प्रहर शिणत असतात, (असे भगवंताकरिता कष्ट सोसणारें कोण आहेत) व गरुडासारखा देवास आपल्याला वाहून घेतलेला दुसरा कोण आहे ? परंतु तें (आतां) सर्व एका बाजूला राहिलें. ज्या दिवसापासून पांडव जन्माला आले, त्या दिवसापासून तें श्रीकृष्णापासून भक्ताला होणारे सुख त्यांच्याच ठिकाणीं एकवटले.

**भाविकाचें काज अंगें देव करी । काढी धर्माघरी उच्छिष्ट तें ॥ १ ॥**
**अर्जुनाचीं घोडीं धुतली अनंतें । संकटें बहुतें निवारिलीं ॥ ४ ॥**

**अर्थ :** जें परम भाविक भक्त आहेत, त्यांची कामे देव स्वतः अंगानें करतात. (ह्याविषयीं मागील पुरावें असे आहेत कीं,) धर्माच्या घरी राजसूय यज्ञात भगवंतांनी स्वतः उष्टी काढली. अनंत भगवंतानें भारतीय युद्धाच्या वेळी अर्जुनाची घोडी तर धुतलीच परंतु त्यांच्या अनेक संकटांचे निवारण केले. ( तु. म. ३६६८ )

**अर्जुनाचे रथवारुं । ते वागवी सर्वेश्वरु ।**
**एवढें भक्तीचें उपकारु । मागें मागें हिंडतसे ॥** तु. म.२६१५

अर्थ : अर्जुनाच्या रथावर हा सर्वेश्वर श्रीहरी सारथी होऊन त्याच्या (रथवारू) घोड्यांची चाकरी करतो आणि त्याच्या भक्तीचें उपकार मानून त्याच्या मागें मागें हिंडतो.

**या जगदीश्वराचें प्रेम । एथ दिसतसें निरुपम ।**
**कैसे पार्थे येणे सर्वोत्तम । पुण्य केलें ॥** ज्ञा.४-११

अर्थ : या जगदीश्वराचे प्रेम येथे (या अर्जुनावर) अगदी निरुपम दिसत आहे; या पार्थानें कसे उत्कृष्ट पुण्य केलें आहे बरे.

विचार करा अर्जुनाने कोणते सर्वोत्तम पुण्य केले होते ? अर्जुन हा नामधारक होता. त्याच्या रोमांरोमांतून श्रीकृष्ण - जयकृष्ण असा ध्वनि निघत होता. असे ज्ञानेश्वर महाराजांनी पांडवांचे वर्णन केले आहे. कोणी म्हणेल कीं, ज्ञानेश्वर महाराज पांडवांना पहावयास गेले होते कां ? तेव्हां ज्ञानेश्वर महाराज याचे उत्तर व्यासांच्या पुराव्यानें देतात. खुणा = पुरावा. खुण म्हणजे रहस्य असाहि अर्थ होतो. (तत्त्वाची गोष्ट) ज्ञानेश्वर महाराज सांगतात व्यासांनी महाभारत ग्रंथ लिहिला; त्यात जे तत्त्व सांगितलें आहे, त्यावरून आम्ही सांगतो.

ज्ञानदेव म्हणे व्यासाचिया खुणा । द्वारकेचा राणा पांडवा घरीं ॥

व्यासांचा अधिकार फार मोठा होता. हे सत्यवती पुत्र असून सत्य वक्ते व विद्वान होते. म्हणजे पूर्ण ज्ञानी होते. ते प्रत्यक्ष नारायणच होते. कारण त्याशिवाय कोण बरे महाभारतासारखा ग्रंथ रचू शकेल ? या व्यास महर्षिंनी अठरा पुराणें, ब्रह्मसूत्रें, गीता इत्यादि अनेक ग्रंथ लिहिले. त्यामध्ये महाभारतासारखे सर्व श्रेष्ठ महाकाव्य लिहिले. त्याची योग्यता ज्ञानेश्वर महाराजांनी वर्णन केलेली आहे.

**म्हणऊनि महाभारतीं जें नाहीं । ते नोहेचि लोकीं तिहीं ।**
**येणें कारणें म्हणिपे पाही । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥** ज्ञा.१-४७



अर्थ : महाभारतात जें नाहीं तें त्रैलोक्यांत नाहीच. या कारणामुळें संपूर्ण त्रैलोक्य व्यासांचें उष्टें म्हटलें जाते. (म्हणजे व्यासांनंतर झालेल्यांनी आपल्या सर्व कल्पना व्यासांपासून घेतल्या आहेत.) अशा या ग्रंथाच्या श्रवणाने जनमेजय राजाचे दोष सहज नाहीसे झालें. ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

**येथ कळाविदपण कळा । पुण्यासी प्रतापु आगळा ।**
**म्हणऊनि जनमेजयाचे अवलीळा । दोष हरले ॥** ज्ञा.१-३७

अर्थ : येथून कळांना कुशलता प्राप्त झाली. पुण्याला विशेष तेज चढले व म्हणूनच (भारताच्या पठनाने) जनमेजयाचे दोष सहजच नाहीसे झाले.

(गुरुवर्य मामासाहेब दांडेकर यांच्या सार्थ ज्ञानेश्वरीतील शेवटी दिलेली पौराणिक कथानकें पाहणें)

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, व्यासासारख्यां अधिकारी पुरुषानें असे सांगितले कीं पांडव हे संसारी असूनहि भगवद्भक्ती केल्यामुळें त्यांना देवाची प्राप्ती झाली व त्यांचा उद्धार झाला, म्हणून आपणसुद्धा -

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥ ४ ॥**

अशारितीने अभंगाचा भावार्थ सांगितला आहे.

**- भावार्थ समाप्त -**

**देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ॥ १ ॥**

**व्याख्यान :-** या अभंगामध्ये पूर्वी सांगितल्याप्रमाणें चार पांच गोष्टींचा विचार करता येईल. १) देव कोणता ? २) त्या देवाचे द्वार कोणते ? ३) उभा म्हणजे काय ? ४) क्षण कोणता ? ५) चार मुक्ति कोणत्या ? ६) साधन काय ? ७) फल काय ? ८) हरिपाठाचा अधिकारी

कोण ? ९) नामानें संसारीं लोक तरलें याला आधार (पुरावा) काय ? असा विचार मांडलेला आहे. प्रथम आपण देव कोणता याचा विचार करू.

देव सगुणहि आहे आणि निर्गुणहि आहे; तसेच देवळातील साकार प्रतिमा असे तीन प्रकार आहेत. १) **सगुण** :- सगुण परमात्मा शंखचक्रगदाधारी आकारवान. २) निर्गुण :- निराकार शुद्ध ब्रह्म. **३) देवालयातील साकार मूर्ति** :- प्रतिमा

यापैकी ज्ञानेश्वर महाराजांना कोणता देव अभिप्रेत आहे.

**निर्गुण पती आवडे मज । आधीं माय पाठीं झालिये भाज ।।** ज्ञा. म.

**जेथे नाही गुणागुण । नाही कार्यासी कारण ।। तो तूं गुणातीत परिपूर्ण रे । कान्हो सच्चिदानंद शब्द आरोता रे ।।** ए.म.

**रंग नहि रूप नहि नहि वर्ण छाया । निराकार निर्गुण तूंहि रघुराया ।।** कबीर महाराज

**शून्य स्थावर जंगम व्यापूनि राहिला अकळ ।**
**बापरखुमादेवीवरू विठ्ठलु सकळ ।।** ज्ञा.म.

**सत्य ज्ञानानंत गगनाचे प्रावर्ण । नाही रूप वर्ण गुण जेथे ।।** ज्ञा.म.

असा हाच देव ज्ञानेश्वर महाराजांना अभिप्रेत आहे. ज्ञानेश्वर महाराज स्थूल देवाचे द्वार सांगत नाहींत. देवळातील साकार मूर्तीच्या दर्शनाने चारी मुक्ति मिळणार नाहीत. कारण साकार मूर्तीच्या ठिकाणी अटळ श्रद्धा पाहिजे. प्रतिमेच्या ठिकाणी श्रद्धा असावी लागते. तुकाराम महाराज म्हणतात - **अवघे ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव ।**
**प्रतिमा तो देव कैसा नव्हे ।।** तु. म.२८४१

**अर्थ :** सर्व काही ब्रह्मरूपच आहे. जर ब्रह्मावांचून कोठे रिकामी जागाच नाहीं तर मग पाषाणाची अगर कोणत्याहि धातूचीं केलेली मूर्ति देव कां असणार नाही ?



मात्र श्रद्धा पाहिजे. नामदेव महाराजांनी देवळातील साकार देवाला बोलायला लावले, जेऊं पण घातले. या सर्व गोष्टी श्रद्धेने होतात. (प्रेमानें होतात). पण ज्ञानेश्वर महाराजांचा देव व्यापक (सर्वभूती) आहे.

**जें जें दृष्टी दिसे तें तें हरिरूप । पूजा ध्यान जप त्यासीं नाही ।।**

अर्थ : जगांतील जीं जीं वस्तु दिसेल तीं तीं ज्याला हरिरूपाने अनुभवाला येते, त्याला पूजा, ध्यान, जप करण्याची आवश्यकताच नाही.

देव समजल्यावर त्या देवाला दरवाजा आहे कां ? असल्यास किती आहेत ? आता देवाला दरवाजा असल्यास तो एखाद्या घरासारखा आहे कां ? कीं बंगल्यासारखा आहे ? - तर तसे नव्हे. कारण देव सर्व ठिकाणी व्यापून (भरून) उरला आहे.

**एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ।।** श्वेता.उप.६-११

मग अशा देवाच्या ठिकाणी द्वार कसे संभवेल. मग द्वार कोणते ? तर साधनाचे द्वार सांगितले आहे.

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ।। धृ ।।**

त्या निर्गुण ब्रह्माकडे जाण्याकरिता भगवंताचे नाम हे द्वार सांगितले आहे.

**शंका :** परंतु हे पटणे कठीण आहे. कोणी म्हणेल ज्ञानेश्वर महाराज थापा मारतात. कारण धर्मनीती अशी आहे कीं मनुष्याने मरावे पण खोटें बोलूं नये. **सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् न ब्रूयात्सत्यमप्रियम् । प्रियंच नानृतं ब्रूयात् एष धर्मः सनातनः ।।** सत्याने वाचासिद्धी प्राप्त होते. पुन्हा तेच ज्ञानेश्वर महाराज सांगतात - **''वेदशास्त्र उभारी बाह्या सदा ।''** यावरून तर असे ठरते कीं, वेदशास्त्रेंहि खोटे बोलतात. परंतु

वेदशास्त्रें ही कधीहि खोटें बोलत नाहींत आणि ज्ञानेश्वर महाराजहि खोटे बोलत नाहीत. सर्व उपनिषदांमध्ये निर्गुण ब्रह्माचेच वर्णन केलेलें आहे. कठोपनिषदादि उपनिषदें, गीता हे सर्व ग्रंथ निर्गुण ब्रह्माचेच वर्णन करितात. **ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना । अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥** (गी.१३-२४) इत्यादि साधने सांगतात. तसेच ध्यान म्हणजे पंचकोशाहून आत्मा निराळा पाहणें. उदा. गवताच्या काडीचे वेष्टन वेगळे करून पाहणे.

**कोणी एकु सुभटा । विचारांचा आगिटा ।**
**आत्मानात्मकिटा । पुटें देऊनि ॥** ज्ञा.१३-१०३६

आत्मा आणि अनात्मा हें खरोखर दोन्ही मिसळले नाहीत. भ्रमानें नाव तसे वाटते म्हणून विचारानें वेगळे करणे.

**छत्तीसहीं वाणीभेद । तोडोनिया निर्विवाद । निवडितीं शुद्ध । आपणपें ॥ हें रूप हें छाया । पैल जळ हे माया । ऐसा निवाडु धनंजया । जेवीं कीजे ॥** ज्ञा.१३-१०३०-३७.

**अर्थ :** हा देह व ही त्याची छाया, पलीकडे दिसते ते खरें पाणी आहे व जेथे जे पाण्यासारखे दिसत आहे तें खोटें मृगजळ आहे. अर्जुना, याप्रमाणें अशी निवड करावी. द्वैत गेले कीं परमात्मा मूळचाच आहे.

**दुजें खंडें तरी । उरला तो अवघा हरी ।**
**आपणांबाहेरी । न लगें ठाव धुंडावा ॥** तु. म. ३८५५

**अर्थ :** ज्ञानानें द्वैताचा (मी तूं पणाचा) निरास झाला म्हणजे खाली एक हरीच राहतो, त्याला शोधण्याकरिता आपणांस बाहेरील ठिकाणांस जावयास नको.

**देह नव्हे मी हें सरे । उरला उरें विठ्ठल ॥** तु. म.३३२१

**अर्थ :** देह मी नाही हे कां पटले कीं मग एक विठ्ठलच खाली उरतो.



**देह आधीं काय खरा । देह संबंधपसारा ।**
**बुजगावणें चोरा । रक्षणसें भासतें ॥** तु. म. ३८५५

**अर्थ :** विषयाचा भोग घेणारा आपला देह हाच आधी मुळीं खरा नाही, तर देहसंबंधाने असणारे स्त्रीपुत्रादिक हें कोठून खरे असणार ? त्यांचे दिसणें म्हणजे शेतांतील बुजगावणें जसें चोरास पिकाचे रक्षक आहे, असे सत्य भासते; त्याप्रमाणे देह आणि देहासंबंधी इतर बाबीं सत्य वाटणें हा केवळ भ्रम आहे.

निर्गुण ब्रह्माकडे जाण्यासाठी उपनिषदें आणि शास्त्रें यांनी देवप्राप्तीची जी साधनें सांगितली आहेत. त्यात १) ज्ञान हे असे साधन सांगितले आहे. ज्ञानानें मोक्ष प्राप्त होतो.

२) कांहीं ठिकाणी वैराग्य साधन हे द्वार म्हटले आहे.

**ऐसेनि शुभाशुभी संसारीं । सांडिला तो अवधारीं ।**
**वैराग्यमोक्षद्वारीं । उभा ठाके ॥** ज्ञा.१८-९००

**अर्थ :** अशा रितीने तो पापपुण्यात्मक संसाराकडून टाकिला जातो; व वैराग्यरूपी मोक्षाच्या द्वारांत उभा राहतो.

**मोक्षफळें दिधलीं वोल । जे सुकृततरूचें फूल ।**
**तयें वैराग्यीं ठेवी पाऊल । भंवरु जैसा ॥** ज्ञा.१८-९०२

**अर्थ :** जें वैराग्य म्हणजे मोक्षफळाने दिलेले तारण होय व जें पुण्यरूप वृक्षाचे फूल आहे, त्या वैराग्यरूपी फूलावर भ्रमराप्रमाणे तो पाऊल ठेवितो.

३) कांहीं ठिकाणीं संतसेवेला द्वार म्हटले आहे.

**जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंटा ।**
**तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनि ॥** ज्ञा.४-१६६

अर्थ : कारण संत हे ज्ञानाचे घर आहेत, त्यांची सेवा हा त्या ज्ञानरूपी घराचा उंबरठा आहे.

४) कांहीं ठिकाणी कर्म हे द्वार मानतात, असो. अशी अनेक ठिकाणी अनेक साधने सांगितली असता, ज्ञानेश्वर महाराज देवाकडे जाण्यासाठी एकच दरवाजा सांगतात. एकच साधन सांगतात. **हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।** त्याचे समाधान करों तर उपनिषदातहि असेच सांगितले आहे. भगवन्नामानेच निर्गुण ब्रह्माची प्राप्ती होते. केनोपनिषदांत वर्णिल्याप्रमाणे -

**तद्ध तद्वनं नाम तद्वनमित्युपासितव्यं स य एतदेवं वेदाऽभि हैनं सर्वाणि भूतानि संवाञ्छन्ति ।। ३१ ।।** -६ कनोपनिषद् खंड -

नामाचे सामर्थ्य ज्याच्या योगाने पदार्थ दाखविणे व त्या पदार्थांचे स्मरण होणे आणि पदार्थ अंकित करून देणे, वगैरे क्रिया नामाने घडतात. **शंका** : पण त्या देवाला नांव कोठे आहे ?

**नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु ।**
**हा आकारासीचि प्रवादु । वस्तूंसि नाहीं ।।** ज्ञा.१३-९०

अर्थ : नाम, रूप, संबंध, जाति, क्रिया, भेद हे सर्व आकारासंबंधी बोलणे आहे. वस्तूला (ब्रह्माला) हे बोलणे नाहीं. 'न तत्र चक्षुर्गच्छति' डोळ्यांनी त्याला पाहता येत नाही. असे ते ब्रह्म असतांना म उपनिषदांत नामाची महती कां सागितली आहे ? याचे समाधान ज्ञानेश्वर महाराज करतात. देवाला नाम नाही ही गोष्ट खरी आहे पण गीतेचा पुरावा देऊन सांगतात. **ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः । ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ।।** गी.१७-२३

अर्थ : ॐ, तत्, सत् असा तीन प्रकारचा ब्रह्माचा नामनिर्देश श्रुतींनी सांगितला आहे. या नामाच्या योगानें पूर्वी (प्रजापतीने) ब्राह्मण, वेद



आणि यज्ञ निर्माण केलेले आहेत.

**एवं ॐ तत्सदाकारू । ब्रह्मनाम हे त्रिप्रकारू ।**
**हे फूल तुरंबी सुंदरु । उपनिषद ते ।।** ज्ञा.१७-३४३

अर्थ : याप्रमाणे ॐ, तत्, सत् या रूपाने ब्रह्माचे हे नाम तीन प्रकारचे आहे. या सुंदर फुलाचा उपनिषदे वास घेतात. (म्हणजे उपनिषदांनी याचा चांगला विचार केला आहे.)

**तरी अनादि परब्रह्म । जें जगदादिविश्रामधाम । तयाचें एक नाम । त्रिधा पैं असे ।। २८ ।। ते कीर अनाम अजाती । परी अविद्यावर्गाचिये राती । माजी वोळखावया श्रुती । खूण केली ते ।। २९ ।। उपजलिया बाळकासी । नांव नाही तयांपासीं । ठेविलेनि नावेंसी । ओ देत उठी ।। ३० ।। कष्टलें संसारशिणें । जे देवों येती गाऱ्हाणें । तया ओ दे नांवें जेणें । तो संकेतु हा ।। ३१ ।। ब्रह्माचा अबोला फिटावा । अद्वैतत्त्वे भेटावा । ऐसा मंत्र देखिला कणवा । वेदें बापें ।। ३२ ।। मग दाविलेंनि जेणें एकें । ब्रह्म आळविले कवतिके । मागां असत ठाके । पुढा उभे ।।** ज्ञा.१७.३३३

अर्थ : जे परब्रह्म आरंभरहित असून जगाचें उत्पत्तिस्थान व विश्रांतीस्थान आहे. त्याचे एक नांव तीन प्रकारचे आहे. ते ब्रह्म खरोखरच नांवरहित व जातिरहित आहे; परंतु अविद्यासमुदायरूपी रात्रीत सांपडलेल्या जीवांनी ब्रह्मास ओळखावे; एवढ्यासाठी श्रुतींनी त्या परब्रह्मास जी खूण केली, ते त्या परब्रह्माचे नाम होय. नुकतेच जन्मास आलेले मूल आपल्याबरोबर नांव घेऊन येत नाही; (परंतु त्या मुलांला) ठेवलेल्या नांवानें हाक मारली असतां ते ओं देत उठते. संसारदुःखाने शिणलेले जे जीव ब्रह्माकडे (आपले गाऱ्हाणे सांगण्यासाठी) येतात, त्या जीवांना ज्या नांवानें ब्रह्म ओं देत उठते; तो हा संकेत नामरूपी खुण होय. जीवाचा व ब्रंह्माचा अनादि काळापासून अबोला आहे, तो नाहीसा

व्हावा व ते ब्रह्म अद्वैतपणाने (जीवांस) भेटावे, म्हणून वेदरूपी बापानें (सर्व जीवांची) दया मनांत घेऊन हा नाममंत्र शोधून काढला. मग वेदाने दाखविलेल्या ज्या एका नामाने ब्रह्मास हाक मारली असता ते (ब्रह्म) वृत्तीच्या मागे असूनहि पुढे उभे राहते. ज्याप्रमाणें मुलाला ठेवलेल्या नांवानें हाक मारली असतां तो झोपेतून सुद्धा ओं देतो, त्याप्रमाणें ब्रह्माला सुद्धा प्रेमानें आळविलें असता ब्रह्म ओं देते वेदशास्त्र येथे साधन या दृष्टीने 'ॐ' हे ब्रह्माचे नाम आहे असे दर्शविते.

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**सगुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ।** गी.१४-२६

**अर्थ :** आणि अव्यभिचारी (अभेद) भक्तियोगानें जो माझी उपासना करतो, तो या गुणांच्या पूर्णपणें पलीकडे जाऊन, त्यास ब्रह्मत्व प्राप्त होण्याची योग्यता येते.

चौथा पुरुषार्थ म्हणजे मोक्ष तो ज्ञानानें प्राप्त होतो. असें असतांना देखील ज्ञा. म. नुसते 'हरिनामानें तो मोक्ष प्राप्त होतो' असें सांगतात. **'हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा'** याचे समाधान सांगतात, आत्मानुभव म्हणजे केवळ बडबड नव्हे, अत्यंत पठनानें व बुद्धी तर्कपटु असल्यानें आत्मज्ञान होणें शक्य नाही. श्रुती माउली सांगते,

**नाऽयमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन । यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥** मुंडकोपनिषद् ३.२

**अर्थ :** हा आत्मा पुष्कळ वेद शास्त्राध्ययनानें प्राप्त होण्यासारखा नाही. पुष्कळ श्रवणानेंहि मिळणारा नाही. तर तो विद्वान ज्या परमात्म्याला प्राप्त होण्याची इच्छा करतो, त्या वरणानेंच - (त्याला प्राप्त होण्याच्या इच्छेनेंच) तो लभ्य आहे. (म्हणून - अन्य कामांचा त्याग करून आत्मलाभाची इच्छा करणे, हेच आत्मलाभाचे साधन आहे.) नाहीतर सर्व पंडित उद्धरून गेले असतें.



**वेदशास्त्र जाणितलें । आगमी पूर्ण ज्ञान झालें । पुराणमात्र धांडोळिलें । आहे तें राहिले वेगळेंचि ॥ भस्मउधळण जटाभारू । अथवा उदास दिगंबरू । न धरी लोकांचा आधारू । आहे तो विचारू वेगळाचि ॥**

तात्पर्य, आत्म्याच्या कृपेवांचून आत्मानुभव होणें शक्य नाही.

**तुका म्हणे कृपा करिल नारायण ।**
**तरिच हें वर्म पडें टायीं ॥** तु. म.३१६१

**अर्थ :** तुकाराम महाराज म्हणतात, जर नारायण खरी कृपा करील, तरच हें भक्तीचे मर्म कळेल.

**तैसें मोक्ष देईल ज्ञान । येथ कीर नाही आन ।**
**परि तेंचि थारे ऐसें मन । शुद्ध होआवें ॥** ज्ञा.१५-३५

**अर्थ :** त्याप्रमाणे ज्ञान मोक्ष देईल यात खरोखरच अन्यथा नाही, पण तें ज्ञान टिकेल असें तें मन शुद्ध पाहिजे.

आता अंतःकरण शुद्धी, देव किंवा श्रीगुरुकृपेनें मिळते ते ज्ञान अनुभवास येण्यास अंतःकरण शुद्धी पाहिजे. आता अंतःकरण शुद्धी, देव, गुरु, ज्ञान या सर्वांचा योग नामस्मरणानें होतो म्हणून तुकाराम महाराज म्हणतात -

**जिव्हें गोड तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिकें पुढें ॥**
**महामळें मन होतें जें गादलें । शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसें ॥** तु.म.२०६५

**अर्थ :** माझ्या जिव्हेला 'विठ्ठल' हा तीन अक्षरांचा गोड रस लागला आहे. त्याच्यापुढें स्वर्गीय अमृताची गोडीहि फिकी आहे. माझे मन मोठ्या (महामळें) वासनेनें भरलें होतें, ते स्फटिकाप्रमाणें स्वच्छ झालें.

त्याचप्रमाणे एकनाथ महाराज म्हणतात -

**अवचटे तोंडा आल्या 'हरि' । सकळ पातकें संहारी । ते हरिनाम निरंतरीं । जे निजगजरीं गर्जती ॥ ऐसें ज्याचे जिव्हेवरी । नाम नाचे निरंतरी । तो**

**धन्य धन्य संसारी । स्वानंदे हरी गर्जतु ॥ सप्रेम सद्भावे संपूर्ण । नित्य करिता नामस्मरण । वृत्ति पालटती आपण । तेहीं लक्षण ऐक राया ॥ नामासरिसाच हरि । रिघें हृदयामाझारीं । तेणें धाकें अभ्यंतरीं । हों लागे पुरी हृदयशुद्धी ॥ तेव्हा प्रपंच सांडोनि 'वासना' । जडोनि ठाके जनार्दना । अहंकारू सांडोनि अहंपणा । 'सोहं' सद्नामार्जी रिघे ॥** ए.भा.२-७७३-७७

**अर्थ :** तोंडांत चुकून जरी हरीचें नाम आले; तरी सुद्धा ते सर्व पातकांचा नाश करते. असे ते श्रीहरीचे नाम भक्तजन निरंतर गर्जत असतात. ह्याप्रमाणें ज्याच्या जिव्हेवर निरंतर नाम नाचत असते, जे स्वानंदाने हरिनामाचा गजर करीत असतात, ते संसारामध्ये अत्यंत धन्य होत. पूर्ण प्रेमानें व सद्भावाने नित्य नामस्मरण केले असतां वृत्ति आपोआप पालटून जाते, तेहि लक्षण सांगतो ऐक नामाबरोबर हृदयामध्ये हरी शिरतो, त्या धाकाने अंतरात पूर्णपणे हृदयशुद्धी होऊ लागते. तेव्हा 'वासना' प्रपंचाला सोडून जनार्दनालाच चिकटते व 'अहंकार' अहंपणाला सोडून 'सोहं' (परब्रह्म तेच मी) ह्या भावनेमध्ये शिरतो.

पण नामाबरोबर पथ्य पाळले पाहिजे. तें कोणतें तर शुद्ध आचरण आणि शुद्ध वाणी. खोटें न बोलणे. शुद्ध अंतःकरण म्हणजे कोणासहि न दुखविणे, अगर न फसविणे; अशा शुद्ध अंतःकरणात शुद्ध नाम ठेवणे; वाचेच्या ठिकाणीं खोटें बोलण्याचा दोष नसणे या पथ्यानें नामस्मरण केले पाहिजे.

**भोजना न द्यावें आन । जेणें चुके अनुपान ।**
**तरीच घेतल्याचा गुण । होईल जाण सत्य भाव ॥** तु. म. ७१७.

**अर्थ :** जे दिल्याने अनुपानात = (औषधाबरोबर घेण्याच्या पदार्थात म्हणजे पथ्यसेवनांत) चूक होईल असे भोजनास अन्य देऊ नये, तरच औषध घेतल्याचा गुण येईल, हे तुम्ही सत्य समजा. (त्याचप्रमाणे नामस्मरण हें औषध भवरोग जाण्यासाठी घ्यायचे आहे, पण त्याचे अनुपान ते चित्तशुद्धीपूर्वक घ्यावे. चित्त विषयांकडे धावणे हे कुपथ्य होय. ते जर विषयाकार होईल तर नामस्मरणरूपी औषधाचा गुण येणार नाही, भवरोग निवृत्ति होणार नाही.)



**नाम घेतां मन निवें । जिव्हे अमृतचि स्रवे ।**
**होतातीं बरवे । ऐसें शकुन लाभाचे ॥** तु. म.-१८६६

**अर्थ :** हरीचे नाम घेण्याचे मन हे त्रिविध तापापासून शांत होते व जिव्हेनें हरिनामामृताचा (स्राव) वर्षाव होतो. अशाप्रकारचे उत्तम लाभदायक शकुन होतात.

आम्ही नामस्मरण करतो, पण वेळ आली तर लाखो वेळा खोटे बोलतो व अनेकांची निंदा करतो. असे बचमंगळ नागानें काही होणार नाही. एकनाथ महाराज सांगतात -

**नाम घेताहे वैखरी । चित्त धावें विषयांवरी ॥ १ ॥ कैसें होताहे स्मरण । स्मरणामाजी विस्मरण ॥ २ ॥ नामरूपां नव्हतां मेळ । नुसतां वाचेचा गोंधळ ॥ ३ ॥ एका जनार्दनी छंद । बोलांमाजीं परमानंद ॥ ४ ॥**

पथ्यानें नाम घेतले असता चित्तशुद्धी होते आणि त्या चित्तशुद्धीद्वारा ज्ञान प्राप्त होते.

**ऐसे निर्मळ झालिया चित । ब्रह्म प्रकाशे सदोदित । मग ते नव्हे विषयासक्त । होय विरक्त अनिच्छिता ॥** ए.भा.१४-२३६

**अर्थ :** असे चित्त निर्मळ झालें असतां तेथें सदोदित ब्रह्म प्रगट होऊन राहतें. मग तें चित्त विषयासक्त होत नाहीं. तसेच तु. म. म्हणतात -

**अवघ्यां दशा येणेंचि साधती । मुख्य उपासना सगुणभक्ति । प्रगटे हृदयीची मूर्ति । भाव शुद्धीं जाणोनिया ॥** तु. म.-७१३

**अर्थ :** श्रीहरीच्या सगुण स्वरूपाची भक्ति करणे, हीच मुख्य उपासना आहे, ह्याच योगानें सर्व अवस्था प्राप्त होतात व त्याचे ठिकाणी शुद्ध

भाव आहे, असे जाणून त्या भक्ताच्या हृदयांत श्रीहरीची मूर्ति प्रगट होते.
**नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ॥ १ ॥ ऐसें धरोनिया ध्यान । मनें करावें चिंतन ॥ २ ॥** तु. म.-२४५०

**अर्थ :** वाणीनें हरिनामाचा उच्चार केल्याबरोबर जगजेठी हरि आपल्यापुढे प्रत्यक्ष उभा आहे, असें ध्यान धरून मनानें त्याचे चिंतन करावे.

**ऐक रे जना । तुझ्यां स्वहिताच्यां खुणां ।**
**पंढरीचा राणा । मनामार्जी स्मरावा ॥** तु. म.-२७१४

**अर्थ :** अरे जना, तुझ्या स्वहिताच्या गुह्य गोष्टी सांगतो, त्या ऐक, पंढरीचा स्वामी जो पांडुरंग त्याचें मनामध्यें स्मरण करीत रहावें.

नामाबरोबर भगवंताचे स्मरण घडलें असतां अंतःकरणात आपोआप पालट होतो. तात्पर्य, अंतःकरणशुद्धीद्वारा ज्ञान प्राप्त होते. किंवा भगवंताच्या कृपापूर्वक ज्ञान प्राप्त होते. परंतु त्याच्याकरिता सतत चिंतन केले पाहिजे.

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥** गी.१०-१०

**अर्थ :** याप्रमाणे (माझ्या ठिकाणीं) सतत युक्त असलेल्या व प्रीतिपूर्वक माझी भक्ति करणाऱ्या त्यांना, मी अशा प्रकारची बुद्धि देतों की, जिच्या योगाने ते माझ्या समीप येतील.

तुकाराम महाराजांचा एक प्रसिद्ध अभंग आहे. त्यामध्ये ते भगवन्नामाचे सामर्थ्य सांगतात. (तु. म.२४८५)

**न कळे तें कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ १ ॥**
**न दिसें तें दिसों येईल उगले । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ २ ॥**
**न बोलों तें बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ ३ ॥**



**न भेटें तें भेटों येईल आपण । करिता चिंतन विठोबाचें ॥ ४ ॥**
**अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणतां वाचे ॥ ५ ॥**
**तुका म्हणे जीव आसक्त सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥ ६ ॥**

**अर्थ :** एका विठोबाचें नामचिंतन केल्यानें न कळणारा देव तो (उगले =) आपोआप कळून येईल. एका विठोबाच्या नामाचे चिंतन केल्यानें न दिसणारा देव आपोआप दिसू लागेल. विठोबारायाचे नामचिंतन केल्याने जो देव बोलत नाहीं तो आपल्याशी बोलूं लागेल. एका विठोबाचें चिंतन केल्याने न भेटणारा देव आपोआप भेटेल. एका विठोबाचें नाम वाचेनें निरंतर घेतल्यानें न होणारा असा अलभ्य व अपार स्वरूप लाभ होतो. तुकाराम महाराज म्हणतात, संसाराच्या ठिकाणी आसक्त असणाऱ्या जीवांनी काया - वाचा - मनानें विठोबाचें नामचिंतन केलें, तर तें भवसागरातून तरतील. आरंभापासून शेवटपर्यंत मुक्कामाला पोहोचण्याचे सामर्थ्य भगवंताच्या नामांत आहे. म्हणूनच तु. म. म्हणतात, **बीज आणि फळ हरीचे नाम ॥ धृ ॥** तु. म. - ७१३ न कळणारे काय ? तर ब्रह्म, अशा प्रकारचे दुर्बोध ब्रह्महि नामाने कळो येईल. फार काय सांगावे ! विषयासक्त जीवसुद्धां नामाने तरतील असे तुकोबारायांनी (वरील अभंगात) सांगितले आहेच.

**तुका म्हणे गीतीं गातां । नामें द्यावी सायुज्यता ।** तु. म.२५१४

**अर्थ :** तुकाराम महाराज म्हणतात, हरीचें नाम गाईलें असतां, ते नाम सर्वांत श्रेष्ठ अशी सायुज्यता मुक्ति प्राप्त करून देते.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, 'ॐ तत्सत्' हे भगवंताचे नाम निर्गुण ब्रह्माचे आहे हे खरे, परंतु ते आपल्या ठिकाणी जोपर्यंत अंतःकरणात कामाचा उठाव आहे तोपर्यंत शिरणार नाही; कारण भगवंत व त्याचे नाम यामध्यें अभेद आहे. नाम आणि नामी यांचा अभेद आहे. ज्ञानेश्वर

लावीन. कारण हरीच्या या कीर्तनाने देह ब्रह्मरूप होतो व देवासारखा त्याचा ऋणी होतो. अशाप्रकारचें भाग्य कीर्तनाने प्राप्त होते.

भक्ती ही लोकसंग्रहाकरितां नसून प्रेमाकरितां आहे. उदा - स्त्री ही पुत्रपौत्र झाल्यावरहि आपल्या पतीजवळ राहते; तो लोकसंग्रह नसून केवळ प्रेमाकरितां राहते. तात्पर्य, नामानें, ज्ञानानें, कर्माने इ. साधनांनी मोक्ष प्राप्त होतो. पण सर्वांचा अनुभव साधारणतः भिन्नच असतो. उदा. - मुंबईहून मोटार पुण्याला येते. त्याप्रमाणे रेल्वेहि पुण्याला येते, विमानहि पुण्याला येते; पण प्रवासाचे अनुभव प्रत्येकाचे भिन्नभिन्न आहेत. तसेच परमार्थाचेहि आहे. योग्याचें जसे शरीर बदलते तसे इतर भक्ताचे नाही. पण योग्याला भक्तीचा अनुभव येणे शक्य नाही.

**पवनाचा वारीका वळघे । चाले तरी उदकीं पाऊल न लागे ।**
**येणें येणें प्रसंगे । येती बहुता सिद्धि ।।** ज्ञा.६-२७०

**अर्थ :** - योगी हा वायुरूप घोड्यावर बसतो व पाण्यावर चालला तरी पाण्यांत पाऊल शिरत नाही. अशा अनेक सिद्धि त्यास प्रसंगानुसार प्राप्त होतात. परंतु,

**भक्तिप्रेमसुख नेणवे आणिकां । पंडित वाचकां ज्ञानियांसि ।। १ ।।**
**आत्मनिष्ठ जरी झाले जीवनमुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्यां ।।** तु. म.३१६१

**अर्थ :** - कोणी कितीहि मोठे शब्दाचे पांडित्य करणारे पंडित असोत अनेक ग्रंथ वाचणारे मोठे वाचक असोत, तसेच मोठे ब्रह्मज्ञानी जरी असलें तरी हे सर्व भक्तिप्रेमाचे सुख जाणत नाहीत. कोणी कितीहि आत्मनिष्ठ जरी झाले, तसेच जीवन्मुक्त जरी झाले, तरी त्यांना भक्तिसुख हे दुर्लभच आहे.

(योगी ध्यानापुरता ईश्वर मानतो, ज्ञानी स्वतः ब्रह्मरूप असतो, पण या दोघांनाहि सगुण भक्तिप्रेम येणे शक्य नाही.) भक्ताला श्रीकृष्ण



जयकृष्ण म्हटले कीं समाधी लागते. याचे उदाहरण म्हणजे रामकृष्ण परमहंस, तुकाराम महाराज माळशिरस येथे कीर्तनात रंगले

**धन्य म्हणवीन इहलोकीं लोका । भाग्ये आम्ही तुका देखियेला ।।** तु. म.६६३

**अर्थ :** - तुकाराम महाराज म्हणतात, इहलोकांतील लोकांकडून मी असें धन्य म्हणवीन कीं, आम्ही तुकाराम महाराजांना पाहिले हे आमचे मोठे भाग्य आहे. तात्पर्य, नामस्मरणानें सर्वकाही होते.

**भोगीं झाला त्याग । गीतीं गातां पांडुरंग ।**
**इंद्रियांचा लाग । आम्हांवरूनि चुकला ।।** तु. म.४०३०

अर्थ : - पांडुरंगाचे नाम सुस्वरानें गाईल्यामुळें भोगाच्या ठिकाणीं वैराग्यानें त्याग झाला व इंद्रियांचा स्वैराचाराचा पगडा आमच्यावरून उठून त्यातून आमची सुटका झाली.

म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, **"हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा"** ज्ञानेश्वर महाराजांनी एकच द्वार सांगितले आहे. नामरूपी किल्लीने सर्व साधनरूपी दरवाजांची कुलूपे उघडली जातील.

**सकळीकां साधना वरिष्ठ हें नाम मा मनीं भाव न धरी दुजा रे ।।** ज्ञा. म.१३९

म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

**देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ।।**

उभा = ( तत्परतेने ) जन्मभर नाम घेणे, क्षणभर म्हणजे काय ? सेकंदभर नव्हे तर सर्व जन्मभर. गौळणी म्हणतात -

**क्षणभरी आम्ही सोशिलें वाईट । साधिलें अवीट निजसुख ।।** तु. म.३०१

**अर्थ :** - गौळणी म्हणतात, आम्ही जन्मभर लोकनिंदा, अपवाद सहन केला तेव्हा भगवंताची प्राप्ती झाली.

येथे क्षणभर या शब्दाचा अर्थ ब्रह्मदेवाचा क्षण घेतला आहे. ब्रह्मदेवाच्या आयुष्याच्या मानाने आपले आयुष्य क्षणभरच आहे. **आतां द्वारकेचा राणा पांडवा घरी ।** पांडव हे अद्‌भूत भक्त होते. अर्जुनाच्या रोमारोमातून श्रीकृष्ण जयकृष्ण असे शब्द निघत होते. पांडव मोठे भक्त असल्यामुळे देव त्यांचे घरी रहात असत.

ज्या सुखाकारणे देव वेडावला ।
वैकुंठ सांडोनि संतसदनी राहिला ॥
धन्य धन्य ते वैष्णव सदन ।
जेथे लक्ष्मीसहित शोभे नारायण ॥ ए.म.१४८५
वैष्णवा घरी देव सुखावला । बाहीर नवजे दवडोनि घातिला ॥
ए.म.१४८६

देव म्हणे माझें पुरतसें कोड ।
संगती गोड या वैष्णवांची ॥ धृ ॥
संतांचें सुख झालें या देवा ।
म्हणऊनि सेवा करी त्यांची ॥ तु. म.२२८७

**अर्थ :** - या देवाला संतांच्या संगतीचे परमसुख झाले. म्हणून तो त्यांची सेवा करतो. एवढ्याकरिता ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।
पुण्याची गणना कोण करी ॥ धृ ॥

- समाप्त -

* * *

## * अभंग दुसरा *

**चहूं वेदीं जाण साही शास्त्रीं कारण ।**
**अठराही पुराणें हरिसी गाती ॥ १ ॥**
**मंथुनी नवनीता तैसें घे अनंता ।**
**वायां व्यर्थ कथा सांडी मार्गु ॥ २ ॥**
**एक हरि आत्मा जीवशिवसमा ।**
**वायां तूं दुर्गमा न घालीं मन ॥ ३ ॥**
**ज्ञानदेवा पाठ हरि हा वैकुंठ ।**
**भरला घनदाट हरि दिसे ॥ ४ ॥**

**अर्थ :** - जर चार वेद, सहा शास्त्रें व अठरा पुराणें यांचे तात्पर्य पाहिले तर तें सर्व हरीचेंच वर्णन करीत आहेत असें दिसतें हे तूं समज. ॥ १ ॥ ज्याप्रमाणें दही घुसळून त्यातील सारभूत लोणी काढून घेतात व असार ताकाचा त्याग करतात त्याप्रमाणें वेदशास्त्रपुराणांत सारभूत असणाऱ्या हरीचे तूं विचाराने ग्रहण कर आणि त्यातील ताकाप्रमाणे असणाऱ्या वांझट कथांचा मार्ग टाकून दे. ॥ २ ॥ हरि जो एक आत्मा त्याची व्याप्ति मायोपाधिक शिवामध्यें व अविद्योपाधिक जीवांमध्ये एकसारखीच आहे. त्या हरीला सोडून दुसऱ्या समजण्यास कठीण अशा गोष्टींमध्ये (साधनामध्यें) तूं आपले मन घालूं नको. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरि हाच वैकुंठ आहे, म्हणजे वैकुंठ हे एक त्याचे नांव आहे. त्याचेच मी निरंतर भजन करतो आणि तो मला पाण्याने भरलेल्या मेघांच्या दाट फळीप्रमाणें जिकडे तिकडे दिसत आहे. ॥ ४ ॥

**विवरण :-** अज्ञानी जीवांना परमात्म स्वरूपाचे यथार्थ ज्ञान

होणे शक्य नाही. म्हणून त्यांच्यासाठी ज्ञानेश्वर महाराजांनी सोपा असा हरिपाठ केला आहे. आपण पहिल्या अभंगांत सांगितलेला सिद्धांत बगलेतला नसून पूर्वापार चालत आलेल्या शास्त्रांतहि संमत आहे, हे पटण्याकरिता ज्ञानेश्वर महाराजांनी दुसऱ्या अभंगाची योजना केली आहे. ही झाली अभंगाची संगती; म्हणजेच अभंगाची साखळी होय.

आतां - चार वेद, सहा शास्त्रें, अठरा पुराणें इ. बद्दलचा विचार पाहूं - चार वेद म्हणजे १) ऋग्वेद २) यजुर्वेद ३) सामवेद ४) अथर्ववेद. सहा शास्त्रें व त्यांचे शास्त्रकार खालीलप्रमाणे -

शास्त्रकारांमध्ये सहा आस्तिक शास्त्रकार व सहा नास्तिक शास्त्रकार ( दर्शनकार ) आहेत.

**आस्तिक दर्शनकार** - जे वेद व वर्णाश्रमधर्म ( चातुर्वर्ण्यव्यवस्था ) मानतात त्यांना आस्तिक दर्शनकार म्हणतात.

**नास्तिक दर्शनकार** - जे वरीलप्रमाणे वेदवर्णाश्रमधर्म (चातुर्वर्ण्यव्यवस्था) मानीत नाहीत त्यांना नास्तिक दर्शनकार म्हणतात. यामध्ये चार्वाकादि सहा नास्तिक दर्शनकार आहेत. **"नास्तिको वेद निंदकः ॥"**

येथे आस्तिक शास्त्रकारांचा विचार सांगितला आहे.

| सहा आस्तिक शास्त्रें | | शास्त्रकर्ते |
|---|---|---|
| १) | पूर्वमिमांसा | जैमिनी मुनि |
| २) | उत्तरमिमांसा | व्यास महामुनि |
| ३) | सांख्यशास्त्र | कपिल मुनि |
| ४) | योगशास्त्र (पातंजल) | पतंजली |
| ५) | न्यायशास्त्र | गौतम मुनि |
| ६) | वैशेषिक शास्त्र | कणाद महर्षी |



आतां अठरा पुराणें पुढीलप्रमाणें :- **१) ब्रह्म २) पद्म ३) विष्णु ४) वायु ५) लिंग ६) गरुड ७) नारद ८) भागवत ९) अग्नि १०) स्कंध ११) ब्रह्मवैवर्त १२) भविष्य १३) मार्कंडेय १४) वामन १५) वराह १६) मत्स्य १७) कूर्म आणि १८) ब्रह्मांडपुराण** अशी अठरा पुराणें आहेत. या सर्व पुराणांची निर्मिती व्यासमहर्षींनी केली आहे.

आतां वर सांगितलेल्या आस्तिक दर्शनकारांप्रमाणे भक्तिशास्त्रातहि केवलाद्वैती, विशिष्टाद्वैती, द्वैती, द्वैताद्वैती वगैरे प्रकार आहेत; परंतु आपला वारकरी संप्रदाय हा शुद्ध अद्वैती संप्रदाय आहे म्हणजे आपण सगुण ब्रह्मालाहि मानतो आणि निर्गुण ब्रह्मालाहि मानतो.

**निर्गुणीं पावलें सगुणी भजतां । विकल्प धरितां जिव्हा झडें ॥**

काही तीन वेद मानतात. **ऋग्वेदादि तिन्हीं । प्रतिष्ठीजती वाग्भुवनीं । केली जैसी वदनीं । ब्रह्मशाळा ॥** ज्ञा. १७-२२२

**म्हणोनि ऋग्यजुः सामु । हे तिन्ही म्हणे मी आत्मारामु ।** ज्ञा.९-२७७

**वेद अपौरुषेय आहेत. म्हणजे पुरुषापासून झालेले नाहीत. तर** स्वतः प्रमाणभूत झालेले आहेत; स्मृति म्हणजे ऋषींनी स्मरण करूम केलेले ग्रंथ. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**चहूंवेदी जाण साहीं शास्त्रीं कारण । अठराहि पुराणें हरिसी गाती ॥ १ ॥**

वेद शास्त्रादि हे सर्व हरीला गातात, कोणी म्हणेल हे कशावरून व त्यात इतर गोष्टी सांगितल्या आहेत. त्याची वाट काय ? ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, त्याचे तुला काय करावयाचे आहे. त्यातील (वेदशास्त्रांतील) सारभूत म्हणून जेवढा भाग असेल तेवढा तूं घे. उदा. दही घुसळल्यानंतर मनुष्य जसें त्यातील लोणीच घेतो, त्याप्रमाणे वेद,

शास्त्रें, पुराणें यांचे विवेकबुद्धीरूपी रवीने मंथन करून त्यातील नामस्मरणरूपी नवनीत घे. इतर वर्णनाचा स्वीकार करूं नको. म्हणजे त्यातील अर्थवादात्मक जो कथाभाग आहे; त्याचा स्वीकार करण्याची आवश्यकता नाही. तो मार्ग सोडून दे. ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या दुसऱ्या चरणांत सांगतात -

**मंथुनी नवनीता तैसें घे अनंता । वाया व्यर्थ कथा सांडी मार्गु ॥ २॥**

तुकाराम महाराज म्हणतात - **तरावया आधीं शोधा वेदवाणी । वांजट बोलणीं वारा त्याची ॥** तु. म. २८४०

**अर्थ :** - जर तुम्हाला तरावयाचें असेल तर वेदाज्ञेविषयीचा विचार करून योग्य अशा त्याच्या ज्या (आज्ञा) असतील, त्याप्रमाणे वागा आणि त्या वेदाची जी सकाम कर्माविषयी वायफळ भाषणे असतील, त्यांचा प्रथम त्याग करावा.

वेद जगाकरिता आहे, तो फक्त पामर, विषयी यांच्यापुरता नाही.

**जरी वेदें बहुत बोलिलें । विविध भेद सूचिले । तऱ्ही आपण हित आपुलें । तेचि घेपे ॥ जैसा प्रगटलिया गभस्ती । अशेषही मार्ग दिसती । तरी तेतुलेही काय चालिजती । सांगे मज ॥ कां उदकमय सकळ । जऱ्ही जाहलें असे महीतळ । तरी आपण घेपे केवळ । आर्तीचजोगे ॥ तैसे ज्ञानियें जें होती । ते वेदार्थातें विवरिती । मग अपेक्षित ते स्वीकारिती । शाश्वत जे ॥** ज्ञा.२-२६०-२६३

**अर्थ :-** जरी वेदांत पुष्कळ गोष्टी सांगितल्या आहेत; अनेक (विधिनिषेधांचे) प्रकार सुचविलें आहेत; तरी त्यापैकी जेवढे काही आपल्या हिताचे असेल, तेवढेच घ्यावें. ज्याप्रमाणें सूर्योदय होताच सगळे रस्ते दिसूं लागतात; म्हणून तितक्या सगळ्याच रस्त्यांनी का जावयाचें ? किंवा पृथ्वीच्या पाठीवर वाटेल तेवढे जरी पाणी असले, तरी त्यातून आपण आपल्या गरजेपुरतेंच घेतो. त्याप्रमाणे जें ज्ञानी आहेत, ते वेदार्थाचा विचार करतात; मग ज्यात शाश्वत व जे इष्ट आहे त्याचेंच ग्रहण करतात.



वेदांत पुष्कळ सांगितलें आहे, ते जर आपण सर्वच घेतले तर वेद मूर्ख ठरेल. परंतु वेद मूर्ख नाही तो तर जगाची आई आहे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**पैं अहितापासूनि काढिती । हित देऊनि वाढविती ।**
**नाही श्रुतीपरौती । माउली जगा ॥** ज्ञा. १६ - ४६२

**अर्थ :** - अकल्याणापासून काढणारी व हित देऊन वाढविणारी अशी श्रुतीशिवाय दुसरी कोणी माउली जगांत नाही.

तुझ्या दृष्टीनें बाकीची वाक्यें व्यर्थ आहेत असे वाटेल पण ते इतर उत्तम, मध्यम अधिकारी लोकांच्या दृष्टीनें योग्य आहे. उदा - वैद्याने अनेक रोगाकरिता अनेक प्रकारची औषधें ठेवलेली असतात. पण ज्याला ताप आहे त्याला पोटदुखीचे औषध व्यर्थ आहे. त्याप्रमाणें वेदवाक्यें वेगवेगळ्या अधिकाऱ्यांच्या दृष्टीनें योग्य आहेत.

आतां ज्ञानेश्वर महाराज आपल्या पूर्णपणें अद्वैती असण्याचा पुरावाच तिसऱ्या चरणांत सांगतात.

**एक हरी आत्मा जीवशिवसमा । वायां तूं दुर्गमां न घाली मन ॥ ३ ॥**

एकरूप अखंड आत्मा तो उपाधिभेद करून जीव - शिव - कूटस्थ ईश्वर - ब्रह्म इत्यादि नांवें प्राप्त झाली आहेत. उदा. एकच आकाश परंतु त्याला उपाधिपरत्वे पांच नांवें आलेलीं आहेत. **१) घटाकाश २) मठाकाश ३) जलाकाश ४) मेघाकाश ५) महाकाश.** त्याचप्रमाणे उपाधिपरत्वे परमात्म्याला सहस्र नांवें प्राप्त झाली आहेत, परंतु परमात्मा अखंड एक आहे. मुंडकोपनिषदामध्ये 'बुद्धिरूपी वृक्षावर दोन पक्षी

बसलेलें आहेत; ते म्हणजे जीव आणि शिव' असे रूपक केलेले आहे. एक पक्षी म्हणजे भोक्ता जीव आणि दुसरा पक्षी म्हणजे अभोक्ता किंवा दाता शिव इत्यादि सांगितले आहे.

**द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते । तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति ।।** मुंडकोपनिषद् ३.१.

**अर्थ :** - अविद्यारूपी कल्पनेने चैतन्य जीवदशेला प्राप्त होते आणि मायोपाधिमुळे ते शिव म्हणजे ईश्वर म्हटले जाते. जीव व शिव हे दोन्ही पक्षी आहेत. स्थूलदृष्टीने भेद आहे. उपाधि (अविद्या व माया) टाकून पहा, दोन्ही एकच आहेत. उदा.- 'तत्त्वमसि' म्हणजे तत् = ते; त्वं = तूं; असि = आहेस. ते ब्रह्म तूं आहेस.

**जीवशिवा होता चुका । तेथे तुका विनटला ।।** तु. म. ३९०५.

**अर्थ :** - तुकाराम महाराज म्हणतात, ज्यायोगानें जीवशिवाचा भेद झाला होता, त्या अज्ञानाचा त्याग करून उभयतांचे (जीवशिवांचे) तात्त्विक स्वरूप जे ब्रह्मचैतन्य त्याच्याशीं मी एकरूप झालो आहे.

**जीवशिवा शेज रचिली आनंदे । आउटाविये पदी आरोहण ।।** तु.म.४०२४

**अर्थ :** - जीव आणि ईश्वर यांच्या अविद्या व माया या उपाधिचा बाध करून त्या दोघांना एका ब्रह्माच्या शय्येवर आनंदाने झोपविले आहे आणि साडेतीन मात्रांचा जो 'ॐ' ज्याचे मूळस्वरूप जे ब्रह्म त्याच्याशी ऐक्य केले आहे.

**अल्प महदा नव्हे सरी । विटाळ तो भेद धरी ।।** तु.म.३५११

**अर्थ :** - थोडे व फार हे एकसारखें नाहीं, पुष्कळातून थोडे निवडलें गेलें कीं, तें विटाळास पात्र होतें (फार मोठें हे विटाळरहित असते).

अल्पमहद् हे उपाधिभेद आहेत. म्हणून भाग त्याग लक्षणा



करावी लागते. जीव अल्पज्ञ अल्पशक्तीमान्, शिव सर्वज्ञ सर्वशक्तीमान्; असे दोघांचे धर्म आहेत. त्या धर्मांचा त्याग सांगितला आहे. जीवशिवाचे ऐक्य जहद् - अजहद् लक्षणाने भागणार नाही; तर भाग त्याग लक्षणेने ऐक्य होते. उदा. एका गुरूने एका शिष्यास अद्वैत उपदेश पटण्याकरिता एक काम सांगितले; 'कमंडलूत गंगा घेऊन ये' त्या शिष्याने कमंडलूत गंगा आणलीं ती गुरूला दाखविली. गुरु म्हणाले, ''मूर्खा, यात नावा, घाट, नदीचा काठ व काठावरील घरे कोठे आहेत ?'' तेव्हा शिष्य म्हणाला, ''महाराज, नावा, घाट यांचा त्याग केल्याशिवाय पाणी येतच नाही.'' त्याचप्रमाणें आपण अवघड भाग टाकून मुख्य भाग घ्यावा. आतां **वायां तूं दुर्गमा न घाली मन ।** तात्पर्य-हरी जो एक आत्मा त्याची व्याप्ति मायोपाधिक शिवामध्ये व अविद्योपाधिक जीवामध्ये एकसारखीच आहे. त्या एका हरीलाच तूं घे. त्या हरीला सोडून दुसऱ्या समजण्यास कठीण अशा गोष्टींमध्ये (साधनामध्ये) आपले मन घालूं नको. अभंगाच्या चौथ्या चरणामध्ये ज्ञानेश्वर महाराज आत्मप्रतिती सांगतात.

**ज्ञानदेवा पाठ हरि हा वैकुंठ । भरला घनदाट हरि दिसें ।। ४ ।।**

प्रतिती तीन प्रकारची आहे. १) गुरुप्रतिती २) शास्त्रप्रतिती आणि ३) आत्मप्रतिती. या ठिकाणी ज्ञानेश्वर महाराज आत्मप्रतितीने सांगतात. 'ज्ञानदेवा पाठ' - पाठ म्हणजे मी नित्य अभ्यास केला.

**न लागती कष्ट नलगे सायास । करावा अभ्यास विठ्ठलाचा ।।**

**अर्थ :** - करावयाचाच असेल तर श्रीविठ्ठल या नामाचा अभ्यास करावा, त्यावांचून इतर सायास व श्रम करणे नको. (तु.म.२४५६)

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरि हाच वैकुंठ आहे म्हणजे

**वैकुंठ हे एक त्याचे नांव आहे. वैकुंठः पुरुषः प्राणः प्राणदः प्रणवः पृथुः ।। (विष्णुसहस्रनाम)**

त्याचेच मी निरंतर भजन करतो. तो मला पाण्याने भरलेल्या मेघांच्या दाट फळीप्रमाणे सर्वत्र दिसत आहे. 'भरला घनदाट हरि दिसे'

**अनंत रूपें अनंत वेषे देखिले म्यां त्यासी ।**
**बापरखुमादेवीवरू खुण बाणली कैसी ।। ज्ञा. म.**

**- भावार्थ समाप्त -**

**चहूं वेदीं जाण साही शास्त्री कारण । अठराही पुराणें हरिसी गाती ।। १ ।।**

**व्याख्यान :** - चार वेद, सहा शास्त्रें, अठरा पुराणें यापैकी वेद हे निर्गुण परमात्म्याचेच वर्णन करतात. आम्ही तेच घेतले असते पण त्यात कर्म, उपासना इत्यादि सांगितले आहेत. तसेच सहा शास्त्रांत तर आपापसांत फार लठ्ठालठ्ठी आहे. त्याचप्रमाणें त्यामध्ये पुन्हा प्रवृत्ति मुख्य आहे कीं निवृत्ति मुख्य आहे; असा वाद आहे. वेदांमध्ये काही प्रवृत्तिपर वाक्यें आहेत व कांहीं निवृत्तिपर वाक्ये आहेत, कांहीं वाक्यें कर्मफलाची स्तुती करून विषयासक्त पुरुषांची वैदिक कर्मांत प्रवृत्ति करतात, तर काही वाक्ये कर्मफलाचे अनित्यत्त्व सांगून त्यापासून पुरुषांस पराङ्मुख करवितात. अशा वाक्यांचा भगवान व्यासांनी सूत्रें करून विभाग केला आणि असे तात्पर्य काढले कीं, वेदांतील सर्व वाक्यांचे साक्षात् किंवा परंपरेनें निवृत्तिमध्ये तात्पर्य आहे. कोणत्याच वाक्यांचे प्रवृत्तिमध्यें तात्पर्य नाही. जीवांची स्वाभाविक दृष्ट सुखाकरिता निषिद्ध कर्मांत प्रवृत्ति असते. त्या निषिद्ध कर्मांपासून जीवांना पराङ्मुख करण्यासाठीच प्रवृत्तिबोधक वाक्ये आहेत. त्या विहित वाक्यांनी कर्मांत प्रवृत्ति होऊन अंतःकरणशुद्धिद्वारा जीवांना ज्ञाननिष्ठा प्राप्त व्हावी, एवढाच त्या वाक्यांचा हेतू आहे. अर्थवादवाक्यांनी कर्माची जी मोहक



फले सांगितली आहेत, त्या फलांसाठी कर्में करावी असे त्याचे तात्पर्य नसून, ''कडू काढा मुलांनी घ्यावा, त्यापासून त्याचे कल्याण आहे हे खरे, परंतु मुलांस कडू काढा घेण्यामध्ये स्वाभाविक प्रवृत्ति नसते.'' याकरिता काढा घेतला तर गुळ देईन, असे सांगून पाहिले असता त्या गुळाच्या मिषाने बाळक कडू काढा घेण्यास प्रवृत्त होते. याला 'गुडजिव्हान्याय' असे म्हणतात.

वेगळ्या उदाहरणानें पाहूं. एका मुलाच्या पोटांत गुळखाण्याने रोग झाला. परंतु औषध घेण्यास तयार होईना. आईने सांगितले कीं तुला गुळ देईन पण हे औषध अगोदर घे, यावर तो औषध घ्यायला तयार झाला.

**औषध द्यावया चाळविले बाळा । दावूनिया गुळां दृष्टीपुढें ।।** तु.म.२८४०

औषध घेतल्यानंतर मुलाने गुळ मागितला तर आई म्हणते गुळ कावळा घेऊन गेला व गुळ काखेत लपविते.

**झुगारूनि दुरी लपविलें काखें । तुका म्हणे बाखे कौतुकाचे ।।** तु.५२६

वरील उदाहरण हे रोचक वाणीचे दर्शक आहे. रोचक वाणीनें काम्य पुरुषांस निष्काम कर्मामध्ये प्रवृत्त करता येते. वेदामध्ये वाणीचे तीन प्रकार सांगितले आहेत. १) रोचक वाणी २) भयानक वाणी ३) यथार्थ वाणी

**१) रोचक वाणी :** १) एखादा उनाड मुलगा अभ्यास करीत नसेल तर त्याचा वडील म्हणतो तूं एक तास अभ्यास कर मग खुशाल खेळ. वास्तविक त्याने सतत उनाडपणें खेळत राहणे योग्य नाही; पण त्याला हे पटणार नाही म्हणून त्याचा वडील रोचक वाणीनें बोलतो. २) समजा एखादा मनुष्य रोज दारु पितो त्याकरिता त्याला सांगावे लागते अरे, श्रावण महिन्यांत तरी पिऊ नको, मांस खाऊ नको. असे प्रथम थोडे

बंधन सांगून नंतर मग कायमचा व्यसन निवृत्तीचा उपाय सांगतात.

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः ।**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ।।** गी.२-४२

**अर्थ :** - हे अर्जुना, वेदांच्या अर्थवादात रत झालेले अविवेकी (स्वर्गसुख व त्याचे साधन जे कर्म याखेरीज) दुसरे काही नाहीं असे म्हणणारे, पुष्पयुक्त वृक्षाप्रमाणे मनोहर अशी जी ही दिसतें अशा वेदवाणीच्या (वेदाची जी ही पुष्पित रोचक वाणी) आधारानें बोलतात.

२) **भयानक वाणी : - पातके करिता पुढे आहे पुसता । काय उत्तर देता होशील तूं ।। ३ ।। अनेक यातना यम करवील । कोण सोडवील तेथे तुजला ।। ४ ।।** ए. म. हरिपाठ ९

**अर्थ :** - तूं आता अनेक पापकर्म करीत आहेस पुढे त्याचा जाब विचारणारा यम आहे. त्याने विचारल्यावर तूं काय उत्तर देशील ? यम आपल्या दूतांकडून तुला अनेक प्रकारचा जाच करील, त्यातून तुला कोण सोडवील ?

**विषयाचे सुख येथे वाटे गोड । पुढे अवघड यमदंड ।। १ ।।**
**मारितीं तोडितीं झोडिती निष्ठूर । यमाचे किंकर बहुसाल ।। २ ।।**
**असिपत्र तरुवर खैराचे इंगळ । निघतील ज्वाळ तैलपाकीं ।। ३ ।।**
**तप्तभूमीवरी चालविती पायी । अग्निस्तंभ बाही कवटाळविती ।। ४ ।।**
तु. म.२६६३

**अर्थ :** - निषिद्ध तसेच पुत्र - गृह-दारादिक विषयसुख भोगतांना येथें बरें वाटते; पण पुढे यमाची शिक्षा भोगणें मोठे कठीण आहे. यमाचे ते निर्दय दूत द्रव्य, स्त्री व संतान याचे अपहरण करणारांस भयंकर मारतात. काठीनें, चाबकानें कसेहि झोडपतात; मांसभक्षण करणारांस कुऱ्हाडीने तोडतात. असे पुष्कळ प्रकारे फार वर्षे हालहाल करतात.



जे आपला धर्म सोडून पाखांड मार्गाने चालतात त्यांना असिपत्रवत् नरकांत टाकतात. तेथे मार मिळाल्यानंतर ते मार चुकविण्याकरिता इकडे-तिकडे पळतात तेव्हा तलवारीप्रमाणे पण दोन्ही बाजूंनी धार असणारी त्या वृक्षाची पानें त्यांना कापत असतात. त्यांना खैराच्या तप्त निखाऱ्यावर उभे करतात. पशुपक्ष्यांना मारून शिजवून खाणाऱ्यांना ज्वाळा निघत असलेल्या तापलेल्या तेलात शिजवितात. जे माता, पिता, ब्राह्मण, वेद यांचा विरोध करतात त्यांना यमदूत काळसूत्र नरकात नेतात व तेथे तांब्याच्या तप्त जमिनीवर त्याला चालवितात. तसेच परस्त्रीगमन व परपुरुषगमन करणाऱ्या स्त्रीपुरुषांना तप्तसूर्मि नामक नरकात नेऊन स्त्रीला पुरुषाच्या व पुरुषाला स्त्रीच्या लोखंडाच्या तापलेल्या प्रतिमेस आलिंगन द्यावयास लावतात. वरील सर्व बाबी भयानक वाणीने सांगितल्या जातात.

३) **यथार्थ वाणी : अमर आहां अमर आहां । खरें कीं पहा खोटें हे ।। १ ।। न म्हणा देह माझा ऐसा । मग भरंवसा कळेल ।। २ ।। कैचा धाक कैचा धाक । सकळीक हे आपुले ।। ३ ।। देवचि बरे देवचि बरे । तुका म्हणे खरे तुम्ही ।। ४ ।।** तु. म. ३८६२

अर्थ : - अहो जनहो, तुम्ही स्वरूपतः आत्मदृष्टीने अमर आहांत. (असे दोन वेळां सांगतात) हे खरे किंवा खोटे आहे, याचा अंतर्मुखदृष्टीने विचार करून पहा. असा हा पंचभूतात्मक देह मी नाही व देह माझा नाही अशा विचाराने पाहिलेत म्हणजे तुमची तुम्हालाच खात्री होईल. हे सर्व जगत् आपणच आहोत अशा स्वरूपस्थितीत भय कोठे आहे ? तुकाराम महाराज म्हणतात, अहो, तुम्ही परमार्थतः देवच आहांत

**लोके व्यवायामिषमद्यसेवा नित्यास्तु जन्तोर्न हि तत्र चोदना । व्यवस्थितिस्तेषु विवाहयज्ञसुराग्रहैरासु निवृत्तिरिष्टा ।।** ए.भा.५-११

**अर्थ :-** या भूलोकामध्ये प्राणिमात्रांना मैथुन, मांसाशन आणि मद्यपान ही कर्मे स्वाभाविक आहेत.त्याकरिता वेदाज्ञारूप प्रेरणेची आवश्यकता नाही. विवाह, यज्ञ व सौत्रामिणी विधी यांनी या कर्मांमध्यें सुंदर व्यवस्था लावली जाते. वैदिक मंत्राचा हेतू या कर्माविषयी प्रेरणा देणे हा नसून त्यापासून त्याने क्रमाक्रमाने निवृत्त व्हावे हाच आहे. (स्वैर विषयवृत्ति होऊ नये, तिचे नियमन व्हावे हाच वेदाज्ञेचा खरा अर्थ आहे.)

**वेदे न करिता प्रेरणा । विषयावरी सहज वासना । स्वभावें सकळ जना । सदा जाण सर्वांशी ॥ मांससेवना मद्यपाना । मिथुनिभत मैथूना । ये अर्थी सर्व जना । तीव्र वासना सर्वदा ॥** ए.भा.५-२०८,१

**अर्थ :** - वेदांनी प्रेरणा केली नसताहि सर्व लोकांची सदासर्वकाळ विषयांवर वासना सहजच असते. मांसभक्षण, मद्यसेवन व स्त्रीसंग याविषयी लोकांना सदासर्वकाळ तीव्र वासना असतेच.

**आवरावया योनिभ्रष्टा । मैथुनी विवाहप्रतिष्ठा । लावूनिया निजनिष्ठा । वर्णवरिष्ठा नेमिले ॥ ब्राह्मण जाता रजकीपार्शी । ते तव कडू नलगे त्यांसी । रजक जाता ब्राह्मणीपार्शी । तिखट त्यासी ते न लगे ॥ भलती स्त्री भलता नर । मैथुनी होय वर्णसंकर । तो चुकवावया प्रकार । विवाह निर्धार नेमिला वेदे ॥ धर्मपत्नी पाणिग्रहण । विवाह नेमिला सवर्ण । तेथे सप्तम पंचम त्यजून। स्वगोत्रीं लग्न करू नये ॥** ए. भा.५-२१९-२२२

**अर्थ :** - योनिभ्रष्टांना आळा घालावा म्हणून स्त्रीसंगासाठी लग्नसंस्काराचे बंधन घालून वर्णविशेष ठरविले व त्यांच्यावर नियंत्रण घातले. ब्राह्मण परिटिणींपासीं गेला तर ती काही त्याला कडू लागत नाही, किंवा परीट ब्राह्मणींपासीं गेला म्हणून ती काही त्याला तिखट लागत नाही. परंतु भलतीच स्त्री आणि भलताच पुरुष यांचा संग झाला तर वर्णसंकर होतो. (शुद्धबीज संस्कार मोडतात) तो प्रकार टाळण्याकरिता वेदाने विवाहाचा नियम लावून दिला आहे. धर्मपत्नी करण्यासाठी पाणिग्रहण करावयाचे तर सजातीयांचाच विवाह व्हावयास पाहिजे. असा निश्चय ठरविला आहे. त्यातहि स्वगोत्रामध्ये लग्न करूं नये. परगोत्रातहि सप्तम पंचम टाळून (म्हणजे बापापासून सात व आईपासून पाच पिढ्या सोडून लग्न करावे)



**करितां वधुवरा पाणिग्रहण । साक्षी द्विज देव हुताशन । इतर स्त्रियां मातेसमान । स्वदारागमन नेमिलें वेदे ॥ एवं नेमूनिया विवाहासी । वेद राये दिली आज्ञा ऐसी । सांडूनि सकळ स्त्रियांशी । स्वदारेपासी मैथुन ॥** ए. भा. ५-२२६-२७

**अर्थ :** - वधूवरांनी पाणिग्रहण करतांना ब्राह्मण, देव व अग्नि हे साक्षीला असतात; म्हणून इतर स्त्रिया मातेसमान मानल्या पाहिजेत. वेदाने स्वस्त्रीगमनच पुरुषाला नेमून दिले आहे. अशाप्रकारे विवाहाचा नेम लावून देऊन वेदराजाने अशी आज्ञा दिली आहे कीं, इतर सर्व स्त्रियांना वर्ज्य करून आपल्या स्त्रीशींच रममाण व्हावे.

**द्रव्य दारा कोणे स्थापियले धन । पिंडाचे पालन विषय भोग ।**
अर्थ : - (तु. म.३०३३) पूर्वी होऊन गेलेल्या ऋषींपैकी एखाद्या ऋषीनें, द्रव्य मिळवून स्त्रीपुत्रादिविषयांचा उपभोग घ्यावा व आपल्या देहाचे रक्षण करावे, असे प्रतिष्ठेचे मत स्थापित केले आहे काय ? तर नाही.

**ज्यांसी चढला विखाचा बासटा । त्यासीं पाजावी सूकरविष्ठा । तेवीं अतिकामी पापिष्ठा । म्यां स्वदारानिष्ठा नेमिली ॥** ए.भा.२१-१९३

**अर्थ :** - ज्याला विषाचा अमल चढलेला असतो त्याला डुकराची विष्ठा पाजतात, त्याप्रमाणें अत्यंत विषयलोलुप अशा पातकीं लोकांना मी स्वपत्नीनिष्ठत्वाची मर्यादा करून दिली आहे.

तात्पर्य, क्षणोक्षणी विषय त्यागार्थच वेदाची आज्ञा आहे. वेदाचा मुख्य विषय ब्रह्म आहे. ब्रह्मसूत्रामध्यें **''तत्तुसमन्वयात्''** या श्लोकामध्ये श्रीमदाद्यशंकराचार्यांनी फार सुंदर व्याख्यान केले आहे. त्याचा अर्थ असा - जगत्कारण हरि वेदांतशास्त्रांच्या द्वाराच कळतो. कारण सर्व वेदातांचा समन्वय जगत्कारण हरीमध्येच आहे. ब्रह्मसूत्रातील चतुःसूत्रीचा भाग मुख्य असल्यामुळे तीत हरी कसा गाईलेला आहे, हे सांगितले.

वेदामध्ये दोन विद्या सांगितलेल्या आहेत. **१) परा विद्या.** २) अपरा विद्या. त्यापैकी परा (ज्ञान) विद्या मुख्य आहे.

**साचचि बोलाचे नव्हे हे शास्त्र । पै संसारु जिणते हे शस्त्र ।**
**आत्मा अवतरविते मंत्र । अक्षरे इये ॥** ज्ञा.१५-५७६

**अर्थ :** - खरोखरच गीता हे (नुसते) शब्दपांडित्याचे शास्त्र नाही, तर ही गीता म्हणजे संसार जिंकणारे शस्त्र आहे. (फार काय सांगावे !) या गीतेची ही अक्षरें आत्म्याला प्रगट करणारे मंत्र आहेत.

सर्व वेदशास्त्राचे सार एकच ब्रह्म आहे. तु. म. म्हणतात,

**वेद अनंत बोलिला । अर्थ इतुलाचि शोधिला ॥ १ ॥**
**विठोबासी शरण जावे । निजनिष्ठा नाम गावें ॥ २ ॥** तु.म.२१३०

**अर्थ :** - वेदांनी अगणित वर्णन केलेले आहे. (अनेक विषय सांगितले आहेत) त्यात शोध करून पाहिले असता हाच मुख्य अर्थ निघाला आहे. तो असा कीं, विठोबारायाला सर्वभावाने शरण जाऊन त्याचे नाम निजनिष्ठेने (आत्मनिश्चयाने) घ्यावे.

आता काही शास्त्रे ईश्वर न मानणारे आहेत. ते म्हणजे **पूर्वमिमांसा, सांख्य इत्यादि. मग प्रश्न असा की त्यांचा हरिविषयी विचार**



काय ? याचे उत्तर म्हणजे त्या शास्त्रांची एकवाक्यता भक्तांनी लावली आहे. प्रत्येकाचा परमार्थांत कसा उपयोग आहे. हे सांगतो. १) न्याय व २) वैशेषिक या शास्त्रांमुळे बुद्धि तर्कपटु व सूक्ष्म होते आणि परमात्माहि सूक्ष्मच आहे.

**सूक्ष्मत्वात् तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ॥** गी. १३-१५

**अर्थ :** - ते भूतमात्रांच्या बाहेर आहे, आंत आहे. ते अचर आहे आणि चरहि आहे. सूक्ष्मत्वामुळे ते पूर्णपणे जाणण्याला अशक्य आहे. तसेच ते दूर आहे व समीपहि आहे.

पुरुष हा प्रकृतीपासून कसा अलिप्त आहे, हे सांख्यशास्त्र पुढील प्रमाणें सांगतात.

**हे रूप हे छाया । पैल जळ हे माया ।**
**ऐसा निवाडु धनंजया । जेवी की जे ॥** ज्ञा. १३ - १०३०

**अर्थ :** - हा देह व ही त्याची छाया. पलीकडे दिसतें ते खरें पाणी आहे व जेथे पाण्यासारखे दिसते ते खोटें मृगजळ आहे; अर्जुना याप्रमाणें जशी निवड करावी.

आता योगशास्त्राचा कसा उपयोग आहे. यमनियमांनी अंतःकरण शुद्ध होऊन निर्गुणाकडे कसे जावे हे योगशास्त्र सांगते. तसेच पूर्वमिमांसक सांगतात की चित्तशुद्धीद्वारा ज्ञानप्राप्ती होते.

**तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा ।**
**पूजा केली होय अपारा । तोषालागी ॥** ज्ञा.१८-९१७

**अर्थ :** - हे वीरा अर्जुना, त्या सर्वात्मक ईश्वराला स्वकर्मरूपी फुलांनी पूजा केली असता, ती पूजा त्याच्या अपार संतोषाला कारणीभूत होते.

आता उत्तरमिमांसा शास्त्राचा कसा उपयोग होतो ? उत्तरमिमांसा

शास्त्र हे सर्व शास्त्रांमध्ये श्रेष्ठ आहे; प्रत्यक्ष आत्मानुभव देणारे आहे. यांत प्रत्यक्ष ब्रह्माचेच वर्णन आहे. यांत जीवाला उपदेश आहे. की तूं प्रत्यक्ष ब्रह्म आहेस.

पुढे अठरा पुराणांचा विचार पाहूं गेलो असता असे दिसते की, अठराहि पुराणांमध्ये भगवंताच्या नामगुणचर्चेशिवाय काहीच नाही. तुकाराम महाराज सांगतात -

**अठरा पुराणांचे पोटीं । नामाविण नाही गोठी ।। तु.म.२४८३**

**अर्थ :** - अठरा पुराणांत देवावांचून दुसऱ्या गोष्टीच नाहीत. (मुख्यसारभूत नामच आहे) सर्व वेद, शास्त्रे व पुराणें यांचे मत परमात्म्याला शरण जावे असेच आहे.

**सकळशास्त्रांचा विचार । अंतीं इतुलाचि निर्धार ।**
**विठोबासी शरण जावें । निजनिष्ठा नाम गावें ।। तु.म.२१३**

म्हणून लोकांच्या अनुभवातील विषय वेद रोचक वाणीने सांगतात. ब्रह्मसुखरुप आहे, पण ते कसे आहे ? ते लोकांना एकदम कळत नाही. एवढ्याकरिता वेद प्रथम सकाम कर्म सांगतो पण ही रोचक वाणी आहे.

तूं तुझा प्रथम अधिकार पहा. नंतर वेदाभ्यास कर. परंतु वेदात निवृत्ति इष्ट आहे. म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ।**

तात्पर्य, भगवन्नामानें जीव आत्मलाभाला प्राप्त होतो. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझा हाच अनुभव आहे.

**ज्ञानदेवा पाठ हरि हा वैकुंठ । भरला घनदाट हरि दिसे ।**

**- समाप्त -**

## अभंग तिसरा

**त्रिगुण असार निर्गुण हें सार ।**
**सारासार विचार हरिपाठ ।। १ ।।**
**सगुण निर्गुण गुणाचें अगुण ।**
**हरिवीण मन व्यर्थ जाय ।। २ ।।**
**अव्यक्त निराकार नाहीं त्या आकार ।**
**जेथोनि चराचर हरिसी भजे ।। ३ ।।**
**ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं ।**
**अनंत जन्मोनी पुण्य होय ।। ४ ।।**

**अर्थ :** त्रिगुणात्मक जगत् अशाश्वत् व असार आहे. तीन गुणांच्या पलीकडे असलेलें निर्गुण निराकार परब्रह्मच शाश्वत व सार आहे. ह्या सारासाराचें रहस्य निरंतर हरिचिंतनात रत असणें हेंच आहे. ।। १ ।। जें गुणसहित साकार आहे तें सगुण व जे गुण रहित निराकार आहे तें निर्गुण होय. यासाठी भगवद्देह सगुण आहे कीं निर्गुण ही मिमांसा करीत न बसतां भगवच्चिंतन करण्यांतच गढून जा. त्यावांचून अन्य विषयांत जर तूं आपले मन गुंतविशील तर तो त्या मनाचा दुरुपयोग झाला असे समज. ।। २ ।। जें व्यक्त नाही, जें निराकार असल्यामुळें नामरुपजातिसंबंध यांच्या पलीकडे आहे, ज्यास आकार नाही, ज्याच्यापासून चर (चेतनयुक्त) व अचर = (जड) अशा उभयभावात्मक जगताची उत्पत्ति झाली त्या हरीचें तूं भजन कर. ।। ३ ।। ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझ्या ध्यानांत व मनांत निरंतर रामकृष्ण आहे व त्यायोगाने या जन्मात अनंत पुण्याईची जोड होत आहे.

**त्रिगुण असार निर्गुण हे सार । सारासार विचार हरिपाठ ।। १ ।।**

**विवरण :** प्रस्तुत अभंगात ज्ञानेश्वर महाराज, वेदांचे काय म्हणणे आहे, ते सांगतात. वेदांमध्ये ब्रह्मांचे दोन प्रकारचे वर्णन केले आहे.
१) मूर्त = (सगुण) आणि २) अमूर्त = (निर्गुण)

**द्वे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चैवामूर्तं च।** बृह. उप. २ - ३ - १

**अर्थ :** त्या ब्रह्माची दोन रूपें आहेत; मूर्त व अमूर्त म्हणजेच साकार- निराकार; सगुण-निर्गुण.

तसेच वेदांमध्ये प्रकृति व तिचे कार्य सांगितले आहे. त्या प्रकृतिपासून त्रिगुणांची उत्पत्ति झाली आहे. समस्त विश्व हे त्रिगुणाचे व्यक्त स्वरूपच आहे.

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।** गी. १४-५

किंवा

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥** गी. १८ - ४०

**अर्थ :** सत्त्व, रज, तम असे हे गुण आहेत व ही प्रकृति यांची जन्मभूमि आहे. या प्रकृतिजन्य तीन गुणापासून मुक्त असा कोणताहि प्राणी पृथ्वीमध्यें, स्वर्गामध्यें अथवा देवामध्यें नाही.

ज्ञानेश्वर महाराज सांगतात, प्रकृतीचे जे तीन गुण आहेत, ते म्हणजे सत्त्व, रज, तम हे असार आहेत; म्हणजे मिथ्या आहेत व या तीन गुणांहून अतीत असें जें निर्गुण ब्रह्म ते सार आहे. म्हणजे सत्य आहे. असार जे त्रिगुणात्मक जगत् याबद्दल मिथ्यात्व निश्चय करावा व सार जो परमात्मा त्याबद्दल सत्यत्व निश्चय करावा. वेदांमध्ये प्रकृति त्रिगुणात्मिका असे वर्णन केलें आहे; त्या गुणांचे तात्पर्य ज्ञानेश्वर महाराज प्रथम चरणात सांगतात -

**त्रिगुण असार निर्गुण हे सार । सारासार विचार हरिपाठ ॥ १**



ज्ञानेश्वर महाराजांचा हरिपाठ म्हणजे विषय अतिसंक्षिप्त करून सांगितला आहे. ज्ञानेश्वरीमध्ये सर्व विषय सविस्तर दिलेले आहेत. म्हणजे हरिपाठ ही 'तार' समजा व ज्ञानेश्वरी 'सविस्तर पत्र' समजा आणि सारासार (सारातील सार) भगवन्नाम समजा. दुसऱ्या चरणात सांगितले कीं, "**गुणाचे सगुण व निर्गुणाचे अगुण.**" पण दोन्हीचा जो साक्षी हरि आहे, तूं तिकडे लक्ष देत नाही तर व्यर्थ जाशील. असे दुसऱ्या चरणात सांगतात.

**सगुण निर्गुण गुणाचे अगुण । हरिवीण मन व्यर्थ जाय ॥ २ ॥**

वर सांगितल्याप्रमाणे सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण असार ( = मिथ्या ) आहेत आणि निर्गुण सार म्हणजे ब्रह्म सत्य आहे. या सारा-सारातील सार म्हणजे भगवन्नाम समजा.

**सार सार सार विठोबा नाम तुझे सार ।**
**म्हणोनि शूलपाणी जपताहे वारंवार ॥**

ज्ञानेश्वर महाराज तीन वेळा सार म्हणतात.

गुणाचे सगुण आहे व निर्गुणाचे अगुण = गुणरहित आहे. पण दोन्हीचा जो साक्षी तो हरि आहे. जो हरीकडे लक्ष देत नाही तो व्यर्थ जाईल. सगुण परमात्मा व निर्गुण परमात्मा एकच आहे. तुकाराम महाराज म्हणतात - (तु. म. २५१६)

**सगुण निर्गुण तुज म्हणे वेद । तुका म्हणे भेद नाहीं नामीं ॥**

**अर्थ :** तु. म.म्हणतात, देवा, तुम्हांस वेद सगुण व निर्गुण अशा दोन रूपात्मक म्हणतात. तथापि तुमच्या नांवामध्ये कोणताहि भेद नाही.

**तुज सगुण म्हणो की निर्गुण रे । सगुण निर्गुण एकु गोविंदु रे ॥ १ ॥**
**तुज आकारू म्हणो की निराकारू रे । आकारू निराकारू एकु गोविंदु रे ॥ २ ॥** - ज्ञा. म.

**दोन्ही टिपरी एकचि नाद। सगुण निर्गुण नाही भेद रे॥
कुसरी अंगे मोडीतील परी। मेळविती एकएकां छंदे रे॥ १॥** तु.म.२४१

**अर्थ :** दोन टिपऱ्यांच्या आघातात एक नाद उत्पन्न होतो. त्याप्रमाणे सगुण व निर्गुणामध्ये काही भेद नाही. चातुर्यानें जरी आपलें अंग हलविले तरी आपल्या वृत्ति एका श्रीहरीच्या छंदाच्या ठिकाणी मिळवितात.

**दो दांडी एक श्रुती। दोहों फुली एक दृति। दोहों दिवा दीप्ती। एकचि जेवी॥ दों ओठी एक गोठी। दो डोळां एकी दिठी।** अमृ.१-१८

अर्थ : दोन टिपऱ्या पण नाद जसा एक (सजातीय) ; फुले दोन परंतु सुगंध एक; दोन दिवे पण प्रकाश जसा एक; दोन ओठ पण गोष्ट (बोलण्याची) जशी एक; दोन डोळे पण दृष्टी जशी एक; तद्वत् सगुण आणि निर्गुण हे फक्त भेद परंतु परमात्मा एकच आहे.

**निर्गुणाहूनि सगुण न्यून। म्हणे तो केवळ मूर्ख जाण। सगुण निर्गुण दोन्ही समान। न्यून पूर्ण असेना॥ विघुरले ते तूप होय। थिजले त्यापरिस गोड आहे। निर्गुणपरिस सगुणीं पाहे। अतिलवलाहे स्वानंदु॥** ए.भा.११-१४५८-५९

**अर्थ :** निर्गुणापेक्षा सगुण हें कमी योग्यतेचें आहे असे जो म्हणेल, तो मूर्ख होय असे समज. कारण सगुण व निर्गुण ही दोन्ही सारखींच आहेत; त्यात एक कमी व एक अधिक असें मुळींच नाही. तूप पातळ असलें तरी ते तूपच पण जर तें थिजलें तर त्या पातळ तुपापेक्षा अधिक गोड होतें. त्याप्रमाणेंच पहा, निर्गुणापेक्षाहि सगुण स्वरूपानें मनाला त्वरीत आनंद होतो.

**जो नित्य शुद्ध सच्चिदानंदु। प्रकृतिरूप परमानंदू। सगुण जाला जी गोविंदू। स्वानंदकंदू स्वलीळा॥** ए. भा. ११-१४६३



**अर्थ :** जो नित्यसिद्ध, सच्चिदानंद, प्रकृतिहून भिन्न व परमानंद स्वरूप तोच स्वानंदाचा मूळकंद असा गोविंद आपल्याच लीलेने सगुण झाला.

**आनंद अद्वय नित्य निरामय। जे का निजध्येय योगियांचे॥ १॥
ते हे समचरण साजिरे विटेवरीं। पहा भीमातीरीं विठ्ठलरूप॥** तु.म.८१९

अर्थ : जें ब्रह्म आनंदरूप, एकटे, अविनाश, निर्मळस्वरूप (निरूपाधिक) अशा ज्या निजवस्तूचें योगीजन ध्यान करितात; तेच हे विठ्ठलाचे रूप भीमेच्या तीरीं समचरण जोडून, कटावर कर ठेऊन, विटेवर शोभिवंत दिसत आहे, ते तुम्ही पहा.

**अव्यक्त तें आकारले। रूपा आले गुणवंत॥** तु. म. ३७०२
**सगुणनिर्गुणांचा ठाव। विटे पाव धरियेले॥** तु. म. ३५१७

अर्थ : परमात्म्याचें जे अव्यक्त निराकार तेंच सगुण साकार झाले आहे; किंवा असे सांगतात कीं श्रीहरीनें सगुण-निर्गुणाचे जणू अधिष्ठान असलेले दोन चरण विटेवर समरूपानें ठेवले आहेत.

**दिसे सगुण हा स्वरूप सुंदर। परी व्यापोनि ठेला चराचर॥
बापरखुमादेवीवरू सगुण निर्गुण। रूप विटेवरी दाविलीं खूण॥**

एवढ्याकरिता भगवद्देह सगुण आहे कीं निर्गुण ही मिमांसा करीत न बसता भगवत्‌चिंतन करण्यात गढून जावे. त्याच्यावांचून अन्य विषयात तूं मन गुंतविलेस तर तो त्या मनाचा दुरुपयोग झाला असे समज. **"हरिवीण मन व्यर्थ जाय।"**

आता तिसऱ्या चरणांत ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, जे व्यक्त नाही, जे निराकार असल्यामुळे नामरूपजातिसंबंध याच्या पलिकडे आहे. ज्याला आकार नाही. ज्याच्यापासून चर (चेतनयुक्त) व अचर (जड) अशा उभयभावात्मक जगताची उत्पत्ती झाली; त्या हरीचे तूं भजन कर.

अव्यक्त निराकार नाही त्या आकार। जेथोनि चराचर हरिसी भजे ॥ ३॥

प्रस्तुत अभंगातील हे तिसरे चरण मुख्य आहे. परमात्मस्वरूपाचे ठिकाणीं नामरूप नाही.

**रंग नहि रूप नहि नहि वर्ण छाया।**
**निराकार निर्गुण तूहीं रघुराया ॥** कबीर महाराज

**बुद्धि बोध्या सोके। ते येवढी वस्तु चुके।**
**मना संकल्प निके। याही हूनि ॥** अमृ. ७-११०

**अर्थ :** बुद्धि सर्व विषयाला जाणण्याला समर्थ आहे, परंतु एवढ्या आत्मवस्तूला मात्र जाणत नाही. आत्मस्वरूपाखेरीज संकल्प करण्याला मन योग्य आहे; पण आत्मा नित्य असल्यामुळे आहे - नाही म्हणणे संकल्प विकल्पाचे कामच नाही.

**मनाची नखीं नलगे। बुद्धिची दृष्टी न रिघे।**
**इंद्रिया कीर जोगे। काई होईल ॥** ज्ञा. १२-४१

**अर्थ :** ज्या ब्रह्याच्या ठिकाणीं मनाचा प्रवेश होत नाही आणि बुद्धीची दृष्टी जेथे प्रवेश करीत नाही. ते इंद्रियांना खरोखरच गोचर होईल काय?

**आतां जो तो इहीं शब्दी। के मिळवू अनुमानाची मांदी।**
**हा प्रमाणाही ओं नेदी। कोणाही मा ॥** अमृ. २ - २७

**अर्थ :** ब्रह्मवस्तु अशी ज्ञेय होण्याजोगी नसल्यामुळे शब्दांनी किती अनुमाने किंवा तर्क केले तरी अनुमानादि कोणत्याहि प्रमाणांचा त्याच्या ठिकाणी लाग लागत नाही. किंवा, **साक्षीचेता केवलो निर्गुणश्च** असे श्रुति म्हणते म्हणून त्याला निराकार म्हणतात. **अव्यक्त निराकार नाही ज्या आकार। जेथोनि चराचर हरिसी भजे ॥ ३ ॥**

**जेणे हे विश्व निर्मियेले। महर्षि देवाते संस्थापिले। एकवीस स्वर्गातें धरिले। सत्तामात्रें आपुलिया ॥** तु.म.२५९०



**अर्थ :** ज्याने हे सर्व जगत् निर्माण करून सप्तमहर्षींची आणि ब्रह्मादिक सर्व देवांची स्थापना केली आहे व आपल्या (अद्वितीय) सत्तेने एकवीस स्वर्गांना धारण केले आहे.

कार्यापेक्षा कारण अधिक सूक्ष्म आणि व्यापक असावे लागते. उदा. घटापेक्षा पृथ्वी, पृथ्वीपेक्षा पाणी, पाण्यापेक्षा तेज, तेजापेक्षा वायू आणि वायूपेक्षा आकाश सूक्ष्म आणि व्यापक आहे आणि या सर्वांपेक्षा सूक्ष्म, व्यापक, अविनाशी आणि नित्य परमात्मा आहे. म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**सत्य ज्ञानानंत गगनाचे प्रावर्ण। नाही रूप वर्ण गुण जेथे ॥** ज्ञा. म. ६१०

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते।**
**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥** गी. ८.३

**अर्थ :** भगवान म्हणतात, जे परम अविनाशी आहे, ते ब्रह्म, ब्रह्माची (आकाशाच्या उत्पत्तीविनाशाबरोबर उत्पन्न व नष्ट न होणे ही) जी सहज स्वरूपस्थिती तिला अध्यात्म असे म्हणतात. (अक्षरब्रह्मापासून) भूत मात्रादि (चराचर) पदार्थांचा उत्पत्ती करणारा जो सृष्टीव्यापार त्याचे नांव कर्म.

ज्ञानेश्वर महाराजांची भावना किती व्यापक आहे. **जेथोनि चराचर हरिसी भजे।** त्याचप्रमाणे तुकाराम महाराजहि हेच सांगतात **व्यापक हा विश्वंभर। चराचर जयाचेनि** किंवा

**मग म्हणितले सर्वेश्वरें। जें आकारीं इये खोंकरे। कोंदले असत न खिरे। कवणे काळी ॥ एऱ्हवीं सपूरपण तयाचें पहावें। तरि शून्यचि नव्हे स्वभावें। परि गगनाचेनि पालवें। गाळूनि घेतलें ॥ जें ऐसेंहि परि विरूळें। इयें विज्ञानाचियें खोळें। हालविलेंहि न गळे। तें परब्रह्म ॥**

ज्ञा. ८ - १५, १७

**अर्थ :** मग सर्वेश्वर श्रीकृष्ण म्हणाले, जे या सर्व फुटक्या (नाशिवंत) आकारमात्रांत गच्च भरले असतांहि कोणत्याहि वेळी गळत नाही, एऱ्हवी त्याचा सूक्ष्मपणा पाहूं गेले तर ते शून्यच वाटेल; पण ते स्वभावाने शून्य नव्हे. (कारण ते मूळचे सत् आहे,) शिवाय ते इतके सूक्ष्म आहे कीं, सूक्ष्मांत सूक्ष्म जे आकाश, त्याच्या पदरातून ते गाळून घेतले आहे. जे इतकेहि सूक्ष्म असून झिरझिरीत असलेल्या प्रपंचरूप वस्त्राच्या गाळणींतून हालविलें तरी गळत नाही, ते परब्रह्म होय.

**शंका :** परंतु लोकांनी असा प्रश्न जर उपस्थित केला कीं ब्रह्म जर अव्यक्त निराकार आहे; तर तुमच्या ध्यानागनांत काय आहे ? त्याचे उत्तर ज्ञानेश्वर महाराज शेवटच्या चरणांत सांगतात -

**ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं । अनंत जन्मोनी पुण्य होय ।। ४।।**

महाराज सांगतात कीं निर्गुण व व्यापक परमात्माच जगाच्या उत्पत्तिस्थितीनाशाला कारणीभूत आहे. तोच परमात्मा माझ्या ध्यानामनात आहे. तात्पर्य, माझ्या ध्यानीमनी अखंड रामकृष्णच आहे, त्यायोगाने या जन्मात अनंत पुण्याची जोड होत आहे. नामस्मरणाशीं तुल्यबळ असणारे पुण्य जगात कोणतेच नाही.

**जन्मजन्मांतरी असेल पुण्यसामुग्री ।**
**तरीच नाम जिव्हाग्री येईल श्रीरामाचे ।।** ज्ञा. म. ३३

**बहुत सुकृताची जोडी । म्हणोनि विठ्ठली आवडी ।। १ ।।** ज्ञा.म.

**जयांचे वाचेपुढा भोजे । नाम नाचत असे माझे ।**
**जे जन्मसहस्री वोळगिजे । एकवेळ यावया ।।** ज्ञा. ९-२०६

**अर्थ :** जे माझे नाम एकवेळ मुखात यावयास हजारो जन्म सेवा करावी लागते, ते माझे नांव त्यांच्या (भक्तांच्या) वाचेपुढे मोठ्या प्रेमाने नाचत असते; असे भगवान सांगतात.



**ऐसी तुझी सुलभ भक्ति । तरी अवघेंचि का न करिती । देवो म्हणे भाग्येवीण माझी भक्ती । न घडे निश्चिती उद्धवा ।। कोटी जन्माची पुण्यसंपत्ती । जरी गाठी असेल आइती । तै जोडे माझ्या संतांची संगती । सत्संगे भक्ती उल्हासे ।।** ए. भा. ११-१५५०-५१

**अर्थ :** भगवान श्रीकृष्णास उध्दव विचारतात, देवा, एवढी जर तुमची भक्ती सुलभ आहे, तर सारेच लोक तुमची भक्ती कां करीत नाहीत ? तेव्हा देव म्हणाले, उद्धवा, भाग्याशिवाय ही माझी भक्ती कोणालाच घडावयाची नाही. कोट्यावधी जन्मात पुण्याची संपत्ती मिळविलेली जर आयती तयार असेल, तरच संतांची संगती घडते आणि सत्संगतीने भक्ती उत्पन्न होते. म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ।। धृ ।।**

**- भावार्थ समाप्त -**

**व्याख्यान :**

**त्रिगुण असार निर्गुण हे सार । सारासार विचार हरिपाठ ।। १ ।।**

ज्ञानेश्वर महाराज त्रिगुण असार म्हणतात, तर परमात्म्याव्यतिरिक्त संपूर्ण जगत् असारच आहे असे ठरते.

भगवान गीतेच्या चौदाव्या अध्यायात गुणांचा विचार सांगतात -

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।।** गी. १४.५

**अर्थ :** प्रकृतिपासून सत्त्व, रज आणि तम या त्रिगुणांची उत्पत्ती झाली आहे, समस्त विश्व हे या त्रिगुणांचे व्यक्त स्वरूपच आहे.

**मा'इये प्रकृती तंव । गुणमयी हेचि नांव ।**
**किंबहुना सावेव । गुण तेचि हे ।।** ज्ञा. १३ - ९८६

**अर्थ :** मग या प्रकृतीला तर गुणमयी हेच नांव आहे; फार काय सांगावे ! प्रकृती म्हणजे मूर्तिमंत गुणच होय.

**प्रकाराचे तीन। तुका म्हणे केले जन ॥** तु. म. ३१८४

**अर्थ :** तुकाराम महाराज म्हणतात, या जगात देवाने त्यांच्या गुणानुसार सात्त्विक, राजस, तामस असे तीन प्रकारचे जन निर्माण केले आहेत.

**ते सूक्ष्म प्रकृति कोडे। जै स्थूलाचिया आंगा घडे।**
**तै भूतसृष्टीची पडे। टांकसाळ ॥** ज्ञा. ७ - २२

**अर्थ :** तो सूक्ष्म प्रकृति (जीवरूपी प्रकृति) कौतुकाने स्थूल प्रकृतीच्या (अष्टधाप्रकृतीच्या) परिणामास जेव्हा पावते तेव्हा प्राणिवर्गरूपी नाणी पाडण्याची टांकसाळ सुरु होते.

तात्पर्य, जेवढे भूतकार्य तेवढे असार आहे म्हणजे नाशिवंत आहे.

**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधि दैवतम्।** गी. ८-४

**अर्थ :** (भगवान अर्जुनाला सांगतात) हे नरश्रेष्ठा, अधिभूत म्हणजे नश्वर पदार्थ.

**तैसे असतेपण आहाच। नाहीं होईजे हे साच।**
**जयातें रूपां आणिती पांचपांच। मिळोनिया ॥** ज्ञा. ८.३१

**अर्थ :** ज्यांचे अस्तित्व उगीच वरवर असते व न होणे हेच ज्यांचे खरे स्वरूप असते (आहे.) त्यांना पंचमहाभूते एकत्र होऊन व्यक्त दशेला आणतात.

**न्याहाळी पां केव्हडा। पसरलासे चवडा।**
**जो करूनिया माजिवडा। आकारगजु ॥** ज्ञा. १३ - ६४.

**अर्थ :** सर्व आकारमात्र पदार्थ हाच कोणी हत्ती, तो ज्याच्या



चवड्यामध्ये धरल्या गेला आहे तो काळरूपी सिंहाचा पंजा केवढा पसरला आहे ? (पहा.) तुकाराम महाराज म्हणतात.(तु. म. ३९१४)

**अवघाचि आकार ग्रासियेला काळें। एकचि निराळे हरीचें नाम ॥**

**अर्थ :** जेवढा म्हणून जगताचा आकार आहे, तेवढा सर्व काळाने ग्रासला आहे. एक हरीचे नाम तेवढे वेगळे आहे. आब्रह्मभुवनापर्यंत (ब्रह्मदेवापासून ते मृत्युलोकापर्यंत) सर्व नाश पावणारे आहे.

**अंडज जारज स्वेदज उद्भिज आटे। हरिनाम नाटे ते बरवे ॥ १ ॥**
**जे नाटे ते नाम चित्ती। रखुमादेवीपती विठ्ठलाचे।** ज्ञा.म. ५८२

**अर्थ :** अंडज = अंड्यापासून उत्पन्न होणारें; (पक्षी) जारज = जाराचे वेष्टन आहे असे; (गाय, वानर) स्वेदज = घामापासून उत्पन्न होणारे (उवा) आणि उद्भिज = जमिनीपासून उत्पन्न होणारे ( वृक्ष ) या चारहि खाणी नाश पावणाऱ्या आहेत. फक्त भगवंताचे नाम अविनाशी आहे आणि तेच भक्ताला अविनाश करते.

**येथें नाही उरो आले अवतार। येर ते पामर जीव किती।** तु. म.२७९९.

**अर्थ :** येथे = या मृत्युलोकात मत्स्यकूर्मादिक अवतार उरले नाहीत तर मग इतर सामान्य जीवांची काय किंमत आहे ?

या जगताच्या अनित्यतेविषयी भगवान गीतेत स्पष्ट सांगतात

. . . **अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥** गी. ९ - ३३

**अर्थ :** अनित्य व सुखहीन असा हा मर्त्य लोक प्राप्त झाला असता तूं माझीच भक्ति कर.

**जियें लोकींचा चंद्र क्षयरोगी। जेथ उदयो होय अस्तालागीं।**
**दुःख लेवूनि सुखाचीं आंगीं। सळित जगाते ॥** ज्ञा. ९ - ५०२

**अर्थ :** ज्या लोकातील चंद्र क्षयरोगाने ग्रासलेला आहे. तेथे मावळण्याकरिता सूर्याचा उदय होत असतो. जेथे दुःख हे सुखाचा पोषाख करून सारखे जगाला छळित असते.

शास्त्रांमध्ये तीन प्रकारचा नाश सांगितला आहे. १) परतः नाश २) आश्रय नाश ३) स्वभावतः नाश

**१) परतः नाश** :- जेव्हा वस्तुचा दुसऱ्याकडून नाश होतो तेव्हा त्याला परतः नाश असे म्हणतात उदा.काठीने मडके फोडणे.

**२) आश्रयनाश** :- जेव्हा एखाद्या वस्तुचा आश्रय नष्ट होतो तेव्हा त्यास आश्रय नाश म्हणतात.

**पडोनिया गेलिया भिंती। चित्राची केवळ होय माती॥**

**३) स्वभावतः नाश** :- जेव्हा वस्तु आपोआप नष्ट होते, तेव्हा त्यास स्वभावतः नाश असे म्हणातात. उदा. - आंबा जर आठ दिवस पेटीत ठेवला तर त्याचा नाश होतो. तसा देहाचा नाश स्वभावतःच आहे.

**शरीरजात आघवे। हे नाशिवंत स्वभावे॥**

**कहे तुका सबहि चलणार। एक रामबिन नहीं वो सार॥** तु. म. ४३६

**अर्थ :** तुकाराम महाराज म्हणतात, सर्व कांहीं नष्ट होणारे आहे. एका रामावांचून कांहीं सार नाहीं.

सर्व नाशिवंत आहे. मायाप्रकृति आणि तिचे कार्य जगत् हे सर्व नाशिवंत आहे. मग अविनाश कोण आहे ? तर तो परमात्मा कां ?

**अनादित्वान्निर्गुणत्वात् परमात्मायमव्ययः।**
**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते॥** गी. १३ - ३१

**अर्थ :** भगवान सांगतात, हे कौन्तेया, अनादि आणि गुणरहित असल्यामुळे मी परमात्मा अव्यय आहे व मी शरीराच्या ठिकाणी स्थित असलो तरी (काही कर्मे) करीत नाही. म्हणून सर्व कर्मांपासून अलिप्त आहे. मी - परमात्मा त्रिविधनाशरहित व गुणातीत आहे.



**शरीरजात आघवे। हे नाशिवंत स्वभावे॥**
**म्हणोनि तुवां झुंजावे। पंडुकुमरा॥** ज्ञा. २ - १३६

अर्थ : आणि शरीर म्हणून जेवढे आहे, तें सगळे स्वभावतः नाशिवंत आहे; म्हणून अर्जुना, तूं लढावेस हें योग्य आहे.

परंतु ब्रह्माच्या ठिकाणी अगोदर सांगितलेले तिन्ही नाश संभवत नाहीत.

**हा गुणत्रयारहितु। व्यक्तीसी अतीतु।**
**अनादि अविक्रतु। सर्वरूप॥** ज्ञा. २ - १५०

अर्थ : हा (सत्त्वादि) तीन गुणांच्या पलीकडचा, अनादि, विकार न पावणारा व सर्वव्यापी आहे.

अशाप्रकारचा अविनाशी, गुणातीत परमात्मा तुझ्या बुद्धीला कळणे कठीण आहे. म्हणून अंतःकरणशुद्धीकरिता नामस्मरण करणे योग्य आहे. म्हणून ज्ञानेश्वर महाराज लोकांना अत्यंत कळकळीने सांगतात -

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा।**
**पुण्याची गणना कोण करी॥ धृ॥**

**- समाप्त -**

*** * ***

## अभंग चौथा

भावेवीण भक्ति भक्तिवीण मुक्ति ।
बळेवीण शक्ति बोलूं नये ॥ १ ॥
कैसेनि दैवत प्रसन्न त्वरित ।
उगा राहे निवांत शिणसी वाया ॥ २ ॥
सायास करिसी प्रपंच दिननिशी ।
हरीसी न भजसी कोण्या गुणें ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे हरिजप करणें ।
तुटेल धरण प्रपंचाचें ॥ ४ ॥

अर्थ : जन्ममृत्युरूपी संसारदुःखापासून एक हरीच सोडविणारा आहे असा भाव (विश्वास) असल्यावांचून हरीची भक्ति म्हणजे हरीवर आत्यंतिक निर्निमित्त प्रेम बसणार नाही व अशा निर्निमित्त भक्तीवांचून संसारातून मुक्तता केव्हांहि होणार नाही, असा नियम आहे. वास्तव हरीच्या ठिकाणीं भाव असल्यावांचून भक्ती होईल व भक्तिवांचून मुक्ती मिळेल असे जें म्हणतात; त्यांचें तें म्हणणे आपल्या अंगात कांहीं एक बळ नसतांना मी अमुक एक शक्तीची गोष्ट करीन असे म्हणण्याप्रमाणे व्यर्थ होय. म्हणून तसे बोलू नये. ॥ १ ॥ देव लवकर कशानें प्रसन्न होईल असा जर तुझा प्रश्न असेल तर कांहीं एक व्यर्थ शीण न करतां आपल्या चित्तास विषयवासनेच्या ओढाताणींतून सोडवून स्थिर कर आणि निजबोधाने शांत रहा. ॥ २ ॥ देहस्त्रीपुत्रगृहधनादिकांच्या प्राप्तीविषयीं व रक्षणाविषयीं प्रापंचिक खटाटोप तूं रात्रंदिवस करीत आहेस व हरीचें भजन मात्र मुळीच करीत नाहीस तें कां बरें ? ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरीचें भजन कर म्हणजे जो हा जन्ममरणरूप संसार, तुझ्यामागें कायमचा लागला आहे त्याच्यातून तूं सुटशील. ॥ ४ ॥



विवरण :

**भावेवीण भक्ति भक्तिवीण मुक्ति । बळेवीण शक्ति बोलूं नये ॥ १ ॥**

हरिपाठाच्या दुसऱ्या अभंगात परमात्मप्राप्तीचे साधन भक्ति आहे असे जे सांगितले, ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ते मीच सांगतो असे नाही, तर वेदशास्त्रेंहि तेच सांगतात. कारण सगुण, निर्गुण रूपाने तोच नटलेला आहे.

सगुण निर्गुण तुज म्हणे वेद । तुका म्हणे भेद नाही नामी ॥ तु. २५१६

निर्गुणाहुनि सगुण न्यून । म्हणे तो केवळ मूर्ख जाण ।
सगुण निर्गुण दोन्ही समान । न्यून पूर्ण असेना ॥ ए.भा.११-१४५८

अर्थ : निर्गुणापेक्षा सगुण हे कमी योग्यतेचे आहे, असे जो म्हणेल तो मूर्ख आहे असे समज कारण सगुण व निर्गुण ही दोन्ही सारखीच आहेत. त्यात एक कमी व एक जास्त असे मुळीच नाही.

(ज्ञानेश्वर महाराजांनी तिन्ही अभंगांचा शास्त्रांत समन्वय केला.)
उदा. एकनाथ महाराज म्हणतात -

(सोन्याची लगड हे निर्गुण ब्रह्म व सोन्याचे दागिने हे सगुण ब्रह्म)

**लावूनिया कसवटी । उत्तम सुवर्णाची खोटी । बांधल्या नववधूच्या कंठी । तेणे ते गोमटी दिसे काय । ए. भा. ११ - १४६५**

अर्थ : कसोटीला लावून उत्तम ठरलेल्या सोन्याची लगडच्या लगड घेऊन ती जर नव्या नवरीच्या गळ्यात घातली (बांधली) तर त्यामुळे ती नवरी सुंदर दिसेल काय ?

**त्यांचीच करूनिया भूषणे । अंगी प्रत्यंगी लेविता लेणे । नववधू अत्यंत शोभली तेणे । निंबलोणे उतरिती ॥ ए.भा.११ - १४६६**

**अर्थ :** पण त्याच सोन्याचे दागिने करून जर मस्तक, कंठ (गळा) हात इ. निरनिराळ्या अवयवांवर घातले तर तीच नवरी अत्यंत शोभू लागलेली दिसते आणि लोक तिच्यावरून निंबलोण उतरतात.

**आता प्रस्तुत अभंगात** साधन जी भक्ती तिचे महत्त्व सांगतात व ती केल्यावांचून जीवाची सुटका होणे शक्य नाही, असे प्रथम चरणातून सांगतात.

**भावेवीण भक्ति भक्तिवीण मुक्ति । बळेवीण शक्ति बोलूं नये ॥ १ ॥**

व्यवहारातील लोक पैशाकरिता हाडाची काडे करितात, मग परमात्म्याकरिता कष्ट केल्याशिवाय भागणार नाही. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, भावावांचून भक्ति नाही व भक्तिवांचून मुक्ति नाही. भाव हा शब्द श्रद्धा, प्रेम, विश्वास या अर्थी वापरला जातो आता या अभंगात भाव हा शब्द प्रेमार्थी घेतला पाहिजे. **''भावेवीण भक्ति''** म्हणजे प्रेमरहित भक्ति व्यर्थ आहे.

**प्रेमेवीण श्रुतिस्मृतिज्ञान । प्रेमेवीण ध्यानपूजन । प्रेमेवीण श्रवणकीर्तन । वृथा जाण नृपनाथा ॥** ए.भा. २-३३३

अर्थ : हे राजा, प्रेमाशिवाय श्रुतिस्मृतींचे ज्ञान, प्रेमाशिवाय ध्यान, पूजन, प्रेमाशिवाय श्रवण-कीर्तन ही सर्व व्यर्थ होत हे लक्षांत ठेव.

**प्रेमावीण भजन नाकावीण मोती । अर्थावीण पोथी वाचून काय ॥**

**अर्थ :** प्रेमाशिवाय भजन, नाकाशिवाय मोती व अर्थाशिवाय पोथी वाचणे हे फुकट नव्हे काय ? केलेला नियम अखेरपर्यंत टिकविणे यालाच भाव असे म्हणतात.

**निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुकों नये ॥** तु.म.३५९७

**अर्थ :** हरीच्या ठिकाणी दृढभाव ठेवणे हाच भक्तांचा स्वधर्म आहे.



अशाप्रकारच्या (निर्धार) निश्चयाचे वर्म भक्तजनांनी नेहमी हृदयांत वाळगावे. त्यांत अंतराय (विसर) येऊ देऊं नये.

**देवा पायीं नाही भाव । भक्ति वरी वरी दाव । समर्पिला जीव । नाही तो हा व्यभिचार ॥** तु. म.२९११

अर्थ : देवाच्या पायीं खरा भाव नसून बाह्यात्कारानें पोकळ भक्ति करतो पण जोपर्यंत हरीला जीव समर्पण करीत नाही, तोपर्यंत त्याची ही भक्ति व्यभिचारी (एकनिष्ठ भाव नसणारी) आहे.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, आपल्या अंगी बळ नसतांना व्यर्थच शक्तीच्या गोष्टी बोलू नये. त्याप्रमाणें मनांत परमेश्वराविषयी एकनिष्ठ प्रेम नसेल तर भक्तीची आणि भक्ति नसेल तर मुक्तीची वायफळ बडबड करू नये. हेच अभंगाच्या प्रथम चरणांत सांगितले आहे.

**भावेंवीण भक्ति भक्तिवीण मुक्ति । बळेवीण शक्ति बोलू नये ॥ १ ॥**

आता देव चटकन आणि सहज कसा प्रसन्न होईल ? निष्ठावंत भक्तिवांचून तूं इतर साधनांची व्यर्थ खटपट करू नकोस. आता स्वस्थ रहा व चित्त शांत ठेव हेच अभंगाच्या दुसऱ्या चरणांत सांगतात.

**कैसेनि दैवत प्रसन्न त्वरित । उगा राहे निवांत शिणसी वाया ॥ २ ॥**

लोक परमार्थव्यतिरिक्त विषयामध्ये आपला देह अक्षरशः झिजवतात. हाडाची काडे करतात. देहस्त्रीपुत्रगृहधनादिकांसाठी आपले आयुष्य वेचतात. पण परमार्थाकरिता, ईश्वराकरिता एवढी मेहनत करीत नाहीत.

**एकोत्तरेचिया वाढी । जळतिये आगी घालिती उडी । ते अनायासे स्वर्गो...**

अर्थ : शंभराला ... जळत्या ...

कष्टावांचून मिळणारी स्वरूप सुखाची गोडी कशी टाकतील ?

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, इतर साधनांची व्यर्थ खटपट कर नकोस. **उगा-राहे निवांत शिणसी वाया ॥**

इतर साधने, इतर खटपट टाकून मन शांत व स्थिर कर

**साधनांची सिद्धि । मौन करा स्थिर बुद्धी ॥** तु म. २७१३

**अर्थ :** तुम्ही आपली बुद्धी स्थिर करून मौन धारण करा, हीच सर्व साधनांची सिद्धि आहे. इतर साधनें काळाच्या मुखीं घालणारी आहेत.

**साधनें घालिती काळाचिये मुखी । गर्भवास सेखी न चुकती ॥** तु. म.५

**अर्थ :** ह्यातून इतर साधनांचा आश्रय केल्यानें ती अखेरीस तुला काळाच्या तोंडी नेऊन घालतील तसें झाल्यानें पुन्हा जन्म घेणे चुकणार नाही.

हे प्रापंचिक लोक कोणाच्या आधारावर बाजीराव झाले आहेत ?

**कोण दम ऐसा आहे यांचे पोटी ।**
**येईल शेवटी कोण कामा ॥** तु. म.२७०३

**अर्थ :** तुकाराम महाराज म्हणतात, यांचे अंतःकरणांत कोणाचा विश्वास आहे ? आणि आयुष्याच्या शेवटी यांच्या उपयोगास कोण येणार आहे ?

**कां हीं विसरलीं मरण बापुडी ।**
**काय यांसी गोडीं लागलीसे ॥** तु. म.२७०३

**अर्थ :** जी विषयाच्या आसक्तीने दीन झालेली आहेत, ती पुढे येणाऱ्या मृत्यूस कां विसरली आहेत ? व त्यांना विषयांची गोडी कशी लागली आहे ?

साधूंचे हृदय कोवळे असते व त्यांच्या पोटांत अपार दया भरलेली असते.



**भूतांची दया हे भांडवल संता । आपुली ममता नाहीं देही ॥** तु. म.२९९५

**अर्थ :** भूतमात्रांवर दया करणे हे संतांचे भांडवल आहे. त्यांना आपल्या देहाची ममताच नाही. भगवान अर्जुनाला नवव्या अध्यायात सांगतात.

**तरी झडझडोनि वहिला नीघ । इये भक्तिचिये वाटे लाग ।**
**जिया पावसी अव्यंग । निजधाम माझे ॥** ज्ञा. ९ - ५१६

**अर्थ :** तरी या मृत्युलोकाच्या रहाटीतून झटकन् मोकळा हो आणि या भक्तीच्या मार्गाला लाग कीं, त्या भक्तीच्या योगानें माझे निर्दोष स्वरूप पावशील.

किंबहुना देवापेक्षाहि साधु काकणभर जास्तच दयाळू असतात. श्री संत ज्ञानेश्वर महाराज मोठ्या कळकळीने सांगतात. या लोकांनी अनित्य शतजर्जर अशा फुटक्या शरीररूपी नावेचा आश्रय घेऊन ते स्वस्थ कसे बसले आहेत ? लोक मरायला टेकले तरी विषयाचा संग सोडीत नाहीत.

**यालागी शतजर्जरे नांवे । रिगोनि केवीं निश्चिंत होआवे ।**
**कैसेनि उघडिया असावे । शस्त्रवर्षी ॥** ज्ञा. ९ - ४९०

**अर्थ :** शेकडो ठिकाणी खिळखिळ्या झालेल्या नावेत बसून स्वस्थ कसे व्हावे ? व शस्त्रांचा वर्षाव होत असतांना उघड्या अंगानें कसे असावे ?

**अगा माते न भजावयालागी । कवण बळ पा आपुल्या आंगीं । काइ घरी की भोगी । निश्चिंती केली ॥ ४९३ ॥ नातरी विद्या कीं वयसा । या प्राणियांसि हा ऐसा । मज न भजतां भरंवसा । सुखाचा कोण ॥ ४९४ ॥** ज्ञा. ९

**अर्थ :** माझे भजन न करण्याला असे प्राण्यांच्या अंगी कोणते सामर्थ्य आहे ? हे घराच्या जोरावर कां भोगाच्या जोरावर बेफिकीर झाले

आहेत ? कीं विद्येने अथवा तारुण्याने हें बेफिकीर होऊन बसले आहेत ? माझे भजन न करता बेफिकीर होऊन बसण्यासारखी प्राण्यांना सुखाची खात्री कोणाची आहे ?

**वनी सिंह वसतां गजी मदु केवीं धरावा। वन्हि दग्ध बीज त्यां अंकुर केंवीं फुटावा। वज्रपाणि कोपलिया गिरि उदधि कें लंघावा। वदनी हरी न उच्चारी तेणे संसार केंवीं भुंजावा।। ज्ञा.**

तारुण्यात लाथ मारीन तेथे पाणी काढीन अशी मनुष्या अवस्था असते. त्यावेळी मनुष्याला काही सुचत नाही. पुढे म्हातार आल्यानंतर शरीर जीर्ण होते. त्यावेळी परमार्थ होत नाही श्रीमदाद्यशंकराचार्य म्हणतात -

**अंगं गलितं पलितं मुंडं दशनं विहिनं जातं तुंडं।**
**भज गोविंदं भज गोविंदं भज गोविंदं मूढ मते।।**

अशी शरीराची अवस्था झाल्यानंतर, ज्ञानेश्वर महाराज सांगता

**भांबावसी झणें हें शरीर कर्दळी स्तंभ। भस्म कृमी विष्ठा अं आहे तो सुशोभ। भाविता कीटकी झाली भृंगी तया क्रमिले नभ भावे भक्ति सुलभ बोळगा बोळगा पद्मनाभ।। ज्ञा. म.**

सामान्य माणसे विद्येचा अभिमान धरतात पण आपली वि काय तुटपुंजी आहे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, विद्येच्या बाबती वेदापेक्षा कोणी श्रेष्ठ आहे काय ?

**पाहे पां जाणिवेचेनि बळें। कोण्ही वेदापासोनि असे आगळे की शेषांहुनी तोंडागळे। बोलके आथी।। ज्ञा. ९ - ३७०**

**अर्थ :** ज्ञानसंपन्नतेच्या बाबतीत वेदापेक्षा कोणी तरी श्रेष्ठ आहे काय किंवा शेषापेक्षा अधिक तोंडानीं बोलणारा कोठे आहे काय ?



सर्व मन, बुद्धि, इंद्रियांचा प्रकाशक हा आत्मा परमात्माच आहे; पण मन व बुद्धि त्याला जाणू शकत नाही.

**बुद्धि बोध्या सोकें। ते एवढी वस्तु चुकें।**
**मना संकल्प निके। याही हूनि।। अमृ. ७ - ११०**

मोठमोठे विद्वान, दूरदर्शी पाश्चात्य व आपल्याकडील विद्वानसुद्धा त्या ब्रह्मापुढे हात टेकतात. म्हणजे त्यांना ब्रह्माचा अंत लागत नाही. त्यांची विद्वत्ता तेथें थोकडी पडते. भगवानच स्वतः अर्जुनाला सांगतात -

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीनां च सर्वशः।। गी. १० - २**

**अर्थ :** देवांना किंवा महर्षींना माझी उत्पत्ती माहीत नाही, कारण देव आणि महर्षी या सर्वांचे आदिकारण मी आहे.

**एथ वेद मुके जाहलें। मन पवन पांगुळलें। रातीवीण मावळले। रविशशी।। उदरीचा गर्भु जैसा। नेणे मायेची वयसा। देवासीं मी तैसा। चोजवेना।। जळचरां उदधिचे मान। मशकां नोलांडवे गगन। तैसे महर्षींचे ज्ञान। नेणें मातें।। ज्ञा.१०-६४-६५-६६.**

**अर्थ :** या माझ्या स्वरूपीं वेदांना बोलता येईना, मन आणि प्राण यांची गती माझ्या स्वरूपी चालेना, सूर्य व चंद्र हे माझ्या स्वरूपीं रात्रीशिवाय मावळले. (ते माझ्या स्वरूपाचे प्रकाशन करू शकत नाहीत.) पोटात असलेला गर्भ ज्याप्रमाणें आपल्या आईचें वय जाणूं शकत नाही; त्याप्रमाणें देवांना माझे ज्ञान होत नाही आणि ज्याप्रमाणें पाण्यात राहणाऱ्या प्राण्यांना समुद्राचे माप कळत नाही किंवा चिलटास आकाश ओलांडता येत नाही त्याप्रमाणे मोठमोठ्या ऋषींचे ज्ञान मला जाणूं शकत नाही. परमात्मा जाणण्याला इतका कठीण आहे, म्हणून सामान्य विद्वानांनी अहंकार बाळगू नये. प्रापंचिक माणसें घर सोडण्यास तयार

नसतात, ''अरे बाबा तूं घरकोंबड्यासारखा जरी राहिलास तरी हे वैभव तुझ्याबरोबर येणार नाही.''

भोगी जीवनातील लोकांना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, कीं तूं मृत्यु टाळण्यासाठी कितीहि शरीराबद्दल नियमावली पाळलीस तरी एक दिवस तुला मरायचेच आहे आणि जर मृत्यु अटळ आहे तर मग -

**सायासें करिसी प्रपंच दिननिशी । हरिसी न भजसी कोण्या गुणे ॥**

रात्रंदिवस ज्यात काही लाभ नाही अशा संसारात तूं सतत राहतोस. पण जीवन कृतार्थ करणाऱ्या हरीचे भजन मात्र तूं कां करीत नाहीस ? तद्वतच नाथ महाराज सांगतात -

**द्रव्यालागीं भावार्थता । जैसे कष्टती सर्वथा । तैसा जरी करे परमार्था । तै ब्रह्म तत्त्वता खेळणें होय ॥** ए.भा.२३-१९३

**अर्थ :** द्रव्यासाठी लोक जसे मनोभावाने सर्वप्रकारे कष्ट करतात. तसाच जर कोणी परमार्थांत झटेल, तर ब्रह्म हे त्याचे खरोखरच खेळणे होऊन राहील.

जे खरे मुमुक्षु आहेत ते संसाराला कंटाळतात. ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

**पै भवस्वर्गा उबगलें । मुमुक्षु योगज्ञानां वळघलें ।**
**पुढती न यो या निगाले । पैजा जेथ ॥** ज्ञा. १५ - २७७

**अर्थ :** संसार व स्वर्ग यास कंटाळलेले आणि अष्टांग योग व ज्ञान यांचा आश्रय केलेले मुमुक्षु लोक पुन्हा स्वर्ग व संसार यांच्याकडे येणार नाहीत; अशा प्रतिज्ञेने त्या आत्मस्वरूपाकडे जाण्यास निघाले.

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥** गी. २ - २७



**अर्थ :** कारण कीं उत्पन्न झालेल्याला निःसंशय मृत्यु आहे आणि मेलेल्याला निःसंशय जन्म आहे. म्हणून अटळ अशा गोष्टीविषयी (अर्जुना) तूं शोक करणे योग्य नाही.

त्याला कारण देहाहंकार आहे. हा मरू देत नाही आणि मारतहि नाही.

**जो न मोकली मारूनि । जीवों नेदी उपजवोनि ।**
**विचंबवी खोडां घालूनि । हाडांचिया ॥** ज्ञा. १८ - १०५१

**अर्थ :** जो (देहांहकार) जीव घेऊन सोडून देत नाही. (तर पुन्हा जन्म देतो) आणि जन्माला घालून जगू देत नाही. (तर पुन्हा जीव घेतो) याप्रमाणे देहाच्या हाडांच्या खोड्यात घालून कुचंबत ठेवितो (वासना ही ब्रह्मज्ञानानेच मरते) शरीर पडले तरी वासना मरत नाही. कारण वासनेमुळेच जन्म घ्यावा लागतो. **जन्म घेणे लागे वासनेच्या संगे ।** संसाराची समर्पक व्याख्या शंकराचार्यांनी केलेली आहे -

**पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननी जठरे शयनम् ।**
**इह संसारे खलु दुस्तरे भज गोविंदम् ॥**
**अगा उपजणें आणि निमणें । हें साचचि जें का मानणें ।**
**तो जीवलोकु मी म्हणे । संसारु हन ॥** ज्ञा. १५ - ३४७

**अर्थ :** अर्जुना, शरीर उत्पन्न झाले असतां मी जन्मास आलो व ते नाहीसे झाले म्हणजे मी गेलो याला खरें समजणे या समजुतीस मी जीवलोक अथवा संसार म्हणतो.

**मातेचिया उदरकुहरीं । पचोनि विष्ठेच्या दाथरीं ।**
**उकडूनि नवमासवरीं । जन्मजन्मोनि मरती ॥** ज्ञा. ९ - ३३१

**अर्थ :** आईच्या उदररूपी गुहेत, नरकाच्या उकडीतील थरात नऊ महिनेपर्यंत उकडून पुन्हा पुन्हा जे जन्माला येऊन (पुन्हा) मरतात.

**किती वेळा जन्मा यावे । नित्य व्हावे फजीत ॥** तु. म. १९९

**येणे मज भोगविल्या खाणीं । नसता छंद लाविला मनी ।**

**माजलो मी माझे भ्रमणीं । झाली बोडणी विटंबना ॥** तु. म. ७२३

**अर्थ :** किती वेळा जन्माला यावे व या त्रिविध दुःखांनी नित्य फजित व्हावे. या संसारानेच मला अनेक योनीत फिरावयास लावले. तत्त्वतः देहादि प्रपंचाचा नसलेला छंद माझ्या मनाला लावला. त्या योगाने मी देह व देहसंबंधी माझे, या अभिमानाने, भ्रमाने मी उन्मत्त झालो. त्याचे फळ हे कीं त्यायोगानें माझी पुष्कळ विटंबना झाली.

आपल्याला ही गोष्ट पटणे मोठे कठीण आहे. परंतु या संसारबंधनातून सोडविणारा एक उपाय आहे; हेच अभंगाच्या शेवटच्या चरणात सांगितले आहे.

**ज्ञानदेव म्हणे हरिजप करणे । तुटेल धरणे प्रपंचाचे ॥ ४ ॥**

हरिनामाचा जप केला म्हणजे हा जो संसार मागे लागलेला आहे तो कायमचा सुटेल. प्रपंचाचे धरणे तुटणे म्हणजेच मोक्ष. यासच आत्यंतिक दुःखाची निवृत्ति आणि परमानंदाची प्राप्ती असे म्हणतात. हा मोक्ष हरिनामानेच सिद्ध होतो. या हरिनामानेच माया तुटते असे तुकाराम महाराज म्हणतात.

**हरि हरि तुम्ही म्हणा रे सकळ। तेणे मायाजाळ तुटईल ॥** तु. म. २७०८

**अर्थ :** अहो सकळ जनहो, तुम्ही हरि हरि म्हणा म्हणजे त्यायोगाने तुमच्या सर्व मायाजाळाचा नाश होईल.

**नाशिवंत देह नासेल हा जाणा। कारे उच्चाराना वाचे नाम ॥ १ ॥**

**नामेंचि तारिले कोट्यान हे कोटी। नामें हे वैकुंठी बैसविलें ॥** तु. २४७६

**अर्थ :** अहो जनहो, हा देह नाशिवंत असल्याकारणानें नष्ट होणार



असे समजूनसुद्धा तुम्ही श्रीहरीचे नामाचा वाणीने उच्चार कां करीत नाहीत ? आजपर्यंत नामस्मरणानेच कोट्यावधी जीवांना तारलें आहे व कित्येकांना वैकुंठलाभ झाला आहे.

**यासाठीच ज्ञानेश्वर महाराज शेवटच्या चरणातून सांगतात कीं,** हरीचे भजन कर म्हणजे या जन्ममरणरूपी संसारचक्रातून तुझी कायमची सुटका होईल; कारण हरिनामाच्या पुण्याची सर दुसऱ्या कोणत्याच साधनाने प्राप्त होणाऱ्या पुण्याला येणार नाही.

हरि **मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥**

**- भावार्थ समाप्त -**

व्याख्यान :

भावेवीण **भक्ति भक्तिवीण मुक्ति । बळेवीण शक्ति बोलू नये ॥**

भावावांचून भक्ति नाही आणि भक्तिवांचून मुक्ति नाही असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, पण ते बरोबर नाही असे वाटते. कारण ज्ञानावांचून मोक्ष नाही. दुसऱ्या कोणत्याहि उपायाने मोक्ष मिळणार नाही. असा वेदान्ताचा सिद्धान्त आहे.

**जे ज्ञान जयाच्या हातीं । तोचि समर्थु मुक्ति ।**

**जैसा शतमख संपत्ती । स्वर्गीचिये ॥** ज्ञा. १५ - ३०

**अर्थ :** ज्याप्रमाणें शंभर यज्ञ केलेला माणूस स्वर्गाचे ऐश्वर्य (इंद्रपद) मिळविण्यास समर्थ होतो; त्याप्रमाणे ज्ञान ज्याच्या हस्तगत झालेले आहे, तोच मोक्ष मिळविण्यास समर्थ होतो. **''ज्ञानेन मुक्तिर्नतु मुण्डणेन''** म्हणजे मुक्ती केवळ संन्यासाने मिळत नाही, तर ज्ञानानेच मोक्ष मिळतो.

**म्हणोनि जन्मक्षया । अतीत ते धनंजया ।**
**मी जाले ज्ञाना यचा । अनुसरोनि ।।** ज्ञा. १४ - ५९

**अर्थ :** अर्जुना, म्हणून ते पुरुष या ज्ञानाचा मार्ग स्वीकारून जन्मक्षयातीत असे मद्रूप झाले.

**ज्ञानेवीण मोक्ष नाही हा सिद्धान्त । वेद बोले हात उभारोनी ।।**

ज्ञानाने मोक्ष मिळत असतांना मग येथे ज्ञानेश्वर महाराज भक्तीने मोक्ष मिळतो असे कां सांगतात; तर महाराजच म्हणतात, ज्ञानाने मोक्ष मिळतो पण त्याकरिता चित्तशुद्धी पाहिजे.

**तैसें मोक्ष देईल ज्ञान । येथ कीर नाहीं आन ।**
**परि तेंचि थारें ऐसें मन । शुद्ध होआवें ।।** ज्ञा. १५-३५

**अर्थ :** त्याचप्रमाणे ज्ञान मोक्ष देईल, यात खरोखरच अन्यथा नाही. पण ते ज्ञान टिकेल असे मन शुद्ध पाहिजे.

**पैं तोंड भरो कां विचारा । आणि अंतःकरणीं विषयासीं थारा ।**
**तरीं नातुडें धनुर्धरा । त्रिशुद्धीं मी ।।** ज्ञा. १५-३९३

**अर्थ** - अर्जुना, कितीहि विचाराने (ज्ञानाने) तोंड भरलेले असेना कां परंतु जर अंतःकरणामध्ये विषयांना आश्रय मिळत असेल; तर मी निश्चयेकरून सांपडणार नाही.

मग धार्मिक ग्रंथ छापखान्यात छापतात ते छापणारे लोक सुद्धा उद्धरून गेले असते. तात्पर्य, अनुभवापर्यंत जे ज्ञान टिकेल, त्या योगानेच मोक्ष मिळेल. नुसत्या बडबडण्याने मिळणार नाही.

**नव्हे ब्रह्मज्ञान बोलता हे सिद्ध ।**
**जंव हा आत्मबोध नाही चित्तीं ।।** तु.म.२८०३



**अर्थ :** जोपर्यंत चित्तामध्ये आत्मबोध दृढ झाला नाही, तोपर्यंत ब्रह्मज्ञानाचे कितीहि प्रतिपादन केले. तरी ते सिद्ध होत नाही. अरे बाबा, नुसत्या पांडित्याने मोक्ष मिळणार नसून त्याला भक्तीची जोड पाहिजे. ज्ञानानेच मुक्ति मिळत असती तर मग भक्ति कशाला ? याविषयी एकनाथ महाराज म्हणतात -

**भक्तीच्या उदरी जन्मले ज्ञान । भक्तीने ज्ञानासी दिधले महिमान ।। १ ।। भक्ती मूळ ज्ञान ते फळ । वैराग्य केवळ तेथीचे फूल ।। २ ।। भक्तीवीण ज्ञान गिवसिर्ती वेडे । मूळ नाही तेथे फळ केवींजोडे । । ३ ।। भक्तीयुक्त ज्ञान तेथे नाही पतन । भक्ती माता तया करीतसे जतन ।। ४ ।। एका जनार्दनी शुद्ध भक्तिक्रिया । ब्रह्मज्ञान त्याच्या लागतसे पाया ।। ५ ।।** ए. म.२९१२

चित्तशुद्धीविषयीं भक्ति मोठी उपकारी - हितकारी आहे.

**अंतर शुद्धीचे कारण । मुख्यत्वे हरिकीर्तन ।**
**नामापरतें साधन । सर्वथा आन असेना ।।** ए. भा. ५-३५३

**अर्थ :** अंतःकरणाच्या शुद्धीला मुख्यत्वेकरून हरीकीर्तन हेंच कारण आहे. चित्तशुद्धीला नामापरते दुसरे साधन नाहीच. नामाने अंतःकरणातील सर्व दोष नाहीसे होतात. श्री संत तुकाराम महाराज सांगतात.

**महामळें मन होतें जें गादलें । शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसें ।।** तु.म.२०६५

**अर्थ :** माझे मन मोठ्या (महामळे =) वासनेने भरलेले होते, ते स्फटिकाप्रमाणें स्वच्छ झाले.

**जिव्हें गोड तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिकें पुढें ।।** तु.म.२०६५

**अर्थ :** माझ्या जिव्हेला विठ्ठल या तीन अक्षरांचा रस गोड लागला आहे. त्याच्यापुढे प्रत्यक्ष स्वर्गीय अमृतहि फिकें आहे.

**नाम घेता मन निवे । जिव्हे अमृतचि स्रवे ।**

होतार्ती धरवें । ऐसे शकुन लाभाचे ॥ तु. म. १८६६

**अर्थ :** हरीचे नाम घेण्यानें मन हे त्रिविध तापांपासून शांत होते व जिव्हेवर हरिनामाचा ( स्राव =) वर्षाव होतो. अशा प्रकारचे उत्तम लाभदायक शकुन होतात.

तात्पर्य, चित्तशुद्धीकरिता भक्तीच पाहिजे. भक्तीने परमात्मा संतुष्ट होऊन मोक्ष देतो.

मुर्खी नाम हाती मोक्ष । ऐसीं साक्ष बहुतांची ॥ तु.म.२५३४

आपण भक्ती करतो पण भाव नसल्यामुळे भक्तीचे फळ मिळत नाही. नारद सांगतात -

**यत्प्राप्य न किंचित् वांच्छति न शोचति ।**
**न द्वेष्टि न रमते नोत्साही भवति ॥** नारद भक्तिसूत्र

हे लक्षण इतर लोभी भक्ताकडे दिसणे शक्य नाही. जावत्कालापर्यंत वासना कमी होत नाही, तावत्कालापर्यंत भक्ती खरी चालली असे समजू नये. तुकाराम महाराज म्हणतात -

**कामनेच्या त्यागे भजनाचा लाभ । झाला पद्मनाभ सेवाऋणी ॥**

**अर्थ :** ( तु.म.२०९६ )आम्हाला भजनाचा जो लाभ झालेला आहे. तो केवळ कामनेच्या त्यागानें (इच्छेच्या अभावाने) होय आणि त्यायोगाने पद्मनाभ हा आमच्या सेवेचे ऋण घेतले आहे; असा आमचा ऋणकरी झालेला आहे.

**भक्त म्हणविता वाटे गोड । भजन मुद्रा अतिअवघड ।**
**भक्तीचे अंतर अति गूढ । न कळे उघड श्रुतिशास्त्रां ॥** ए. भा. १४-२४१

**अर्थ :** भक्त म्हणऊन घेतांना मोठे गोड वाटते. परंतु भजनाचे स्वरूप फार बिकट आहे. भक्तीचे रहस्य अत्यंत गूढ आहे. ते श्रुतिशास्त्रांना सुद्धा स्पष्ट कळत नाही, देव मुख्य म्हणजे भाव पाहतो -



**अंतरीची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥ १ ॥ देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥ २ ॥** तु. म. ३६८५

**अर्थ :** देव हा आपणांविषयी भक्तांच्या अंतःकरणात असणाऱ्या गोडीचे ग्रहण करतो आणि आपणाविषयीं त्याच्या अंतःकरणात भक्ति प्रेमाची जोड किती आहे, हे पाहतो. खरोखर देव हा एकच दीनांचा खरा दयाळ आप्त आहे. (असे त्रिवार सांगतात) भाव कसा पाहिजे तर

**निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म ।**
**निर्धार हे वर्म चुको नये ॥** तु.म.३५९७

निष्ठापूर्वक जे भजन करतील तेच कृतार्थ होतील.

**भाव सर्व कारण मूळ बंदु । सदा समबुद्धि नास्तिक्य भेदु । भूतकृपा मोडी द्वेषकंदु । शत्रु मित्र पुत्र समकरी बंधु रे ॥** तु.म.२१८७

**अर्थ :** अरे, हे अशांच्या भेटीविषयी सर्वथैव भावाचे बंधन हेच एक कारण आहे. सर्वकाळ सर्वांविषयीं सारखी बुद्धी ठेव. नास्तिकपणाचा नाश, भूतांविषयी मोठी दया, हृदयात असणारा जो द्वेषाचा कांदा त्याचा नाश करून टाक. शत्रू, मित्र, पुत्र, भाऊ यांच्याविषयी सारखी बुद्धी ठेव.

**''पत्रं पुष्पं फलं तोयम्''** या श्लोकावर ज्ञानेश्वर महाराजांनी बहारदारीचे व्याख्यान केले आहे.

**मग निस्सीमभावउल्हासें । मज अर्पावयाचेनि मिसें ।**
**फळ एक आवडे तैसें । भलतयाचे हों ॥** ज्ञा. ९-३८२

**अर्थ :** मग अमर्याद भक्तिभावाच्या उत्कर्षाने मला अर्पण करण्याच्या निमित्ताने एखादे फळ वाटेल तसले कसल्याहि झाडाचे असेना, भगवंत म्हणतात, मी त्याचा आनंदाने स्वीकार करतो.

श्रद्धा म्हणजे तरी काय तर आपण सन्मार्गाने चाललो आणि ज्या ज्या प्रसंगी दुःखें प्राप्त होतील ती सर्व देवाची कृपा समजणे याला श्रद्धा म्हणतात. भानुदास महाराज पैठणकर यांची गोष्ट सांगणे.

**जरी हे आकाश वरपडो पाहे । ब्रह्मगोळ भंगा जाये ।**
**वडवानळ त्रिभुवन खाये । तरी मी तुझीच वाट पाहे गा विठोबा ॥**

त्याचप्रमाणें जयदेव स्वामींचे हातपाय तोडण्यात आले तरी त्यांचा भगवंतावरील भाव कमी झाला नाही. संत मिराबाईंना विषाचा प्याला पाजण्यात आला तरी त्यांचे प्रेमयुक्त भजन थांबले नाही. भगवान श्रीकृष्ण साक्षात् जवळ असतांनाहि पांडवांना दुःख भोगावे लागले. पण त्यांनी आपले भजन सोडले नाही.

**पहा ते पांडव अखंड वनवासी ।**
**परि त्या देवासी आठविती ।** तु. म. १०८३

याला निष्ठावंत भाव म्हणतात. कोणी कांहीं निंदा केली किंवा कोठल्याहि प्रकारचा दबाव आणला तरी ज्याची निष्ठायुक्त भक्ती आपल्या कर्तव्यकर्मापासून तसूभरहि च्युत होत नाही. भगवंताच्या भेटीसाठी निष्ठावंत भक्त अनेक संकटे सोसण्यास तयार असतो. त्याला मरणाची तमा नसते; पण भगवंताच्या पायाशीं लीन होण्यासाठी त्याचे मन सतत अधीर झालेले असते. तात्पर्य : अशाप्रकारे जो भजन करतो तो खरा भक्त म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी॥**

**- समाप्त -**

✼ ✼ ✼

## ✼ अभंग पांचवा ✼

**योगयागविधी येणें नोहे सिद्धी ।**
**वायांचि उपाधी दंभधर्म ॥ १ ॥**
**भावेंवीण देव न कळे निःसंदेह ।**
**गुरुवीण अनुभव कैसा कळे ॥ २ ॥**
**तपेंवीण दैवत दिधल्यावीण प्राप्त ।**
**गुजेंवीण हित कोण सांगे ॥ ३ ॥**
**ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात ।**
**साधूंचे संगती तरणोपाय ॥ ४ ॥**

अर्थ : - अष्टांगयोग व यज्ञ यांचे यथाविधी आचरण केल्यानें हरीची प्राप्ती होणार नाही. कारण ही सर्व हरिप्राप्तीविषयीं बहिरंग (दूरची) साधनें आहेत. यांचे अनुष्ठान करणारामध्यें मी मोठा योगी आहे, याज्ञिक आहे, माझी सर्वत्र ख्याती व्हावी अशी वासना उत्पन्न होते व ती वासना पूर्ण होण्याच्या इच्छेनें तो योग, यज्ञ वगैरे करतो. त्यामुळें खरा धर्म न होऊन पीडा करणारा व्यर्थ दांभिकधर्म मात्र होतो. ॥ १ ॥ भावावांचून साधकास देव केव्हांहि निःसंशय कळावयाचा नाही. गुरुकृपेविना देवाचा अनुभव कसा येईल ? ॥ २ ॥ तपावांचून दैवत प्रसन्न होणार नाहीं व दिल्यावांचून काही मिळणार नाही. (म्हणजे कर्म करावे तसे फळ मिळते.) प्रेम असल्यावांचून हिताची गोष्ट कोण सांगेल. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, सर्व जीवांना संसारातून तरण्याचा उपाय साधूंची संगत करणें हाच होय असे माझ्या अनुभवावरून मी जाहीर करतो. ॥ ४ ॥

**योगयागविधी येणे नोहे सिद्धी । वायांचि उपाधी दंभधर्म ॥ १ ॥**

विवरण : हरिपाठाच्या पहिल्या अभंगात अनुबंध सांगितला, दुसऱ्या अभंगात त्याला वेदाचा आधार दिला. तिसऱ्या अभंगात वेदाचे काय म्हणणे आहे ते सांगितले. चौथ्यात हरिपाठाचा मुख्य विषय जी भक्ति ती थोडक्यात सांगितली.

उदा. - चितारी म्हणजे चित्रकार जसे प्रथम चित्र नुसते रेखाटून त्याच्या बाह्य कक्षा नक्की करतो आणि मग प्रसंगानुसार रंग भरतो; तसे ज्ञानेश्वर महाराजांनी सर्व मार्ग थोडक्यात सांगितले. १) कर्मयोग २) भक्तियोग ३) ज्ञानयोग ४) अष्टांगयोग इ. सर्वच सांगितले आहेत.

आता भक्ति म्हणजे नुसती क्रिया नव्हे, तर तिला भावाची म्हणजे प्रेमाची जोड पाहिजे. उदा - नुसत्या शून्याला किंमत नाही. त्याच्यामागे एकाचा आकडा पाहिजे.

**एके दाखविले दहा । फांटा पहा पुसून ॥** तु. म. ३९४६

या अगोदर भक्तीला भावाची गरज आहे, असे सांगितले. आता या अभंगात अष्टांगयोग किंवा यज्ञयागादिक कर्मे यांनी परमात्म्याची प्राप्ती होत नाही. तें व्यर्थ त्रासदायक तर आहेतच पण त्यांच्यापासून जरी किंचित लाभ झालाच तरी माणसाच्या मनात दंभाची निर्मिती करणारे ते धर्म होत; हा विचार प्रथम चरणात सांगितला आहे.

**योगयागविधी येणे नोहे सिद्धी । वायांचि उपाधी दंभधर्म ॥ १ ॥**

अष्टांगयोगशास्त्रामध्ये योगाची आठ अंगें सांगितली आहेत. त्यापासून प्राप्ती थोडी पण दंभधर्म उपाधी मात्र वाढते.

योगाची आठ अंगें येणेप्रमाणे - १) यम २) नियम ३) आसन ४) प्राणायाम ५) प्रत्याहार ६) धारणा ७) ध्यान ८) समाधी

**'योगश्चित्तवृत्तिनिरोधः''** असे योगाचे फलहि सांगितले आहे.



**अष्टांग योगे न शिणिजे । यम नियम निरोध न कीजे रया ॥ १ ॥ वाचा गीत गाईजे वाचा गीत गाईजे । गाता वाता श्रवणीं ऐकिजे रया ॥ धृ ॥ गीता छंदे अंग डोलिजे । लीला विनोदें संसार तरिजे रया ॥ ३ ॥ बापरखुमादेवीवरु विठ्ठल नामे । जोडे हा उपाय कीजे रया ॥ ४ ॥** ज्ञा. म.

योग म्हणजे अष्टांगयोग; याग म्हणजे वेदांत सांगितलेले नाना प्रकारचे यज्ञ; तसेच अनेक प्रकारचे कर्मविधी इत्यादि साधनांनी सिद्धी म्हणजे मोक्ष प्राप्त होत नाही. या साधनांचे आचरण करणे म्हणजे एक व्यर्थ उपाधी आहे. म्हणजे ही साधने अवलंबितांना शारीरिक तसेच मानसिक कष्ट फार सोसावें लागतात. परंतु फळ मात्र काहीच नाही. म्हणून त्यांना ''वायाचि उपाधी'' म्हटले आहे. कदाचित् या योगादिअभ्यासाने आणिमादि एखाद्या सिद्धीचा लाभ झाला तर त्यायोगाने लौकिक साधून दंभ मात्र वाढेल. बाकी काही नाही.

**.......वायाचि उपाधी दंभधर्म ॥ २ ॥**

**मज वश करावयालागी । सामर्थ्य नाही अष्टांगयोगी । नित्यानित्य विवेक जगी । आंगोआंगी मज न पवे ॥ प्रकृतिपुरुषविवंचना । अखंड आलोडितां मना । पावावया माझिया स्थाना । सामर्थ्य जाणा त्या नाही ॥ धर्म अहिंसादिसहित । सत्य त्यांचेनि मी नव्हे प्राप्त । मुख्य वेदाध्ययनेंही मी अप्राप्त । साङ्ग समस्त जरी पढिले ॥ तेथ तपें कायसी बापुडीं । पंचाग्नी असार परवडी । कृच्छ्रचांद्रायणे झालीं वेडी । त्यांचे जोडी मी न जोडें ॥ देहगेह सांडूनि उदास । विरजाहोमीं हर्वी सर्वस्व । साधनीं अतिश्रेष्ठ संन्यास । त्यासी मी परेश नातुडें ॥ करिता श्रौतस्मार्तकर्मांसी । कर्मठें झाली पानपिसीं । तरि मी नाकळे त्यांसी । क्लेश होमेसीं कष्टता ॥** ए.भा.१२-२४-२९

**अर्थ :** - अष्टांगयोगामध्यें मला वश करून घेण्याचें सामर्थ्य नाही.

जगातील नित्यानित्य विचारसुद्धा (टिकणारे कोणते व नाशिवंत कोणते हा) आपण होऊन माझ्यापर्यंत येऊ शकत नाही किंवा निरंतर मनामध्यें प्रकृतिपुरुषांचा विचार करीत राहिलें असतांनाहि माझ्या स्थानापर्यंत पोहोचण्याचें सामर्थ्य त्या मानसाला प्राप्त होत नाही; हे लक्षांत ठेव. अहिंसासहित जें सर्व धर्म, तसेच जे सत्य, त्याच्या योगानेहि मी प्राप्त होत नाही. वेदाध्ययन हे मुख्य समजतात, पण ते सर्व वेद सांगोपांग पठण केले, तरीहि माझी प्राप्ती होत नाही. मग त्यांच्यापुढे बिचाऱ्या तपाचा काय पाड ? पंचाग्निसाधनाचा प्रकार तर निरर्थकच आहे. कृच्छ्रचांद्रायणें तर वेडीं ठरली. कारण ती करूनहि मी प्राप्त होत नाही. जो घरदार सोडून विरक्त होतो; किंवा विरजाहोम (= संन्यास घेण्यापूर्वी करावयाचा यज्ञ ) करून त्यात आपल्या सर्वस्वाचे हवन करतो. किंवा सर्व साधनांत श्रेष्ठ असा संन्यास जो घेतो; त्यालाहि मी परमेश्वर वश होत नाही. श्रौतस्मार्तकर्में करतां करतां कर्मठ लोक वेडें बनून राहिले. तरीहि मी त्यांना सांपडत नाही. होम करतांना बिचाऱ्यांना कष्ट मात्र भोगावे लागतात.

**आणि अष्टांगादि संकटी । योगी शिणतातीं किरीटी ।**
**अवसर नाही भेटी । जयाचियें ॥** ज्ञा. ११-६७७

**अर्थ –** अर्जुना, योगी हे अष्टांग योगासारख्या संकटांना तोंड देऊन शिणतात. परंतु या विश्वरूप दर्शनाचा प्रसंग त्यांना देत नाही.

तात्पर्य, योगयागादिक सर्व कर्में हरिप्राप्तीसाठी केवळ निष्फळ आहेत. त्यांच्या योगाने व्यर्थ शीण व वेळेचा अपव्यय मात्र होतो. भगवंताला प्राप्त करून घ्यायचे असेल तर भावयुक्त भक्तीच दुसरा उपाय नाही, हे अगदी निश्चित आहे आणि भगवत्प्राप्तीनंतर होणारा जो निरतिशय सुखाचा आनंद तो सद्गुरुवांचून कसा कळेल ? हेच अभंगाच्या दुसऱ्या चरणात सांगितले आहे.



**भावेवीण देव न कळे निःसंदेह । गुरुवीण अनुभव कैसा कळे ॥ २ ॥**

भावावांचून साधकास देव केव्हाहि निःसंशय कळावयाचा नाही आणि देवाचा अनुभव गुरुकृपेविना घेता येणार नाही. म्हणून भाव आणि सद्गुरुकृपा मुख्य सांगितली आहे. कारण ज्याने देवाचा अनुभव घेतला आहे; तोच दुसऱ्याला सांगू शकेल. संसारातील सुख हे ब्रह्मचाऱ्याला सांगता येणार नाही. नुसते अद्वैतपर ग्रंथसुद्धा लिहिता येतील. पण त्या देवाचा अनुभव येणे कठीण आहे. त्यासाठी सद्गुरुकृपाच पाहिजे. ज्ञानेश्वर महाराज आपल्या एका अभंगात हाच विचार विस्तृत मांडतात.

**वेदशास्त्र जाणितलें । आगमीं पूर्ण ज्ञान झाले । पुराणमात्र धांडोळिलें । आहे तें राहिलें वेगळेचि ॥ १ ॥ शब्दब्रह्में होसीं आगळा । म्हणसीं न भिये कळिकाळा । बोधेंविण सुखसोहळा । आहे तो जिव्हाळा वेगळाचि ॥ २ ॥ याकारणें श्रीगुरुनाथु । जव मस्तकी न ठेवी हातु । निवृत्तिदास असे विनवितु । तव निवांतु केवीं होय ॥ ३ ॥** ज्ञा. म. १९८

म्हणून याच आशयाने ज्ञा. म. म्हणतात, **गुरुवीण अनुभव कैसा कळें ।**

तप म्हणजे साधना केल्यावांचून देव प्राप्त होत नाही. देवाला एकनिष्ठ भाव द्या म्हणजे तो तुम्हाला त्याची कृपा देईल. हेच अभंगाच्या तिसऱ्या चरणांत सांगतात.

**तपेवीण दैवत दिधल्यावीण प्राप्त । गुजेवीण हित कोण सांगे ॥**

परंतु तपाला कष्ट फार आहेत.

**तप म्हणजे नव्हे स्नान । तप म्हणजे नव्हे दान । तप नव्हे शास्त्रव्याख्यान । वेदाध्ययन नव्हे तप ॥ तप म्हणिजे नव्हे योग ।**

**तप म्हणिजे नव्हे याग । तप म्हणिजे वासना त्याग । जेणे तुटे लाग कामक्रोधांचा ।। शरीरशोषणा नांव तप । ते प्रारब्धभोगानुरुप । हरि ह्रदयी चिंतनी चिद्रूप । तप सद्रूप त्या नांव पै ।। जेणे दंभ लोभ निःशेष आटे । अहंममता समूळ तुटे । यांसचि नांव तप गोमटे । मानीं नेटे पाटे विधातया ।।** चतुःश्लोकी भागवत ओ. १०६ ते १०८

त्याचप्रमाणे ज्ञा. म. ज्ञानेश्वरीमध्ये तपाची व्याख्या सांगतात :

**तैसा स्वरूपाचिया प्रसरा -। लागी प्राणेंद्रिया शरीरा । आटणीं करणें जे वीरा । तेचि तप ।। तैसे देह जीवाचिये मिळणीं । जो उदयजत सूये पाणी । तो विवेक अंतःकरणीं । जागविजे ।।** ज्ञा.१६-१०८

**अर्थ :** - अर्जुना, त्याप्रमाणे आत्मानुभवाच्या विकासाकरिता प्राण इंद्रियें व शरीर यांची जी आटणीं करावयाची (म्हणजे प्राण व शरीर यांस आत्मप्राप्तीच्या मार्गांत जे झिजविणे) तेच तप होय. त्याप्रमाणे जो विचार उत्पन्न होताच देह व आत्मा यांच्या कालवाकालवीत हात घालतो तो (व पाण्यापासून हंसाची चोंच ज्याप्रमाणे दुधास अलग करते. त्याप्रमाणे आत्म्यास देहापासून समजूतीने अलग करतो) आत्मानात्म विचार जागृत ठेवावा. **'दिधाल्यावीण प्राप्त'** देवाला एकनिष्ठ भाव द्या म्हणजे तो तुम्हाला कृपादान देईल. **''गुजेवीण हित कोण सांगे ।''** ज्याच्याशी आपला प्रेमाचा संबंध असतो, त्यासच कोणीहि आत्यंतिक हिताची गोष्ट सांगत असतो. सांगणारा व ऐकणारा या उभयतांमध्ये खरे प्रेम पाहिजे. तर त्या उपदेशाचा योग्य परिणाम होतो, नाहीतर होत नाही. भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात -

**यालागी सुमनु आणि शुद्धमती । जो अनिंदकु अनन्यगती । पै गा गौप्यही तयाप्रतीं । चावळिजे सुखे ।। तरी प्रस्तुत आता गुणीं इहीं । तूं वांचून आणिक नाही । म्हणोनि गुज तरी तुझ्या ठायीं । लपवूं नये ।।**

ज्ञा.९-४०,४१



**अर्थ :** - याकरिता चांगल्या मनाचा व शुद्ध बुद्धीचा आणि निंदा न करणारा आणि एकनिष्ठ असा मिळाला तर त्यास आपली गोष्ट गुह्य असली तरी खुशाल सांगावी. तर आता सध्या या गुणांनी युक्त तुझ्यावांचून दुसरा कोणी दिसत नाही. म्हणून जरी गुह्य गोष्ट असली तरी तुझ्याठिकाणीं ती लपवून ठेवता येणार नाही. आता शेवटच्या चरणात ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात । साधूचे संगती तरणोपाय ।। ४ ।।**

ज्ञानेश्वर महाराज दृष्टांताची (स्वानुभवाची) गोष्ट सांगतात (मात = गोष्ट) ती कोणती ? तर साधूच्या संगतीशिवाय - तरणोपाय नाही.

भगवान गीतेच्या सातव्या अध्यायात सांगतात -

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ।।** गी. ७-१४

**अर्थ :** - ही माझी त्रिगुणात्मिका दैवी माया तरून जाण्यास दुस्तर आहे. जे मलाच शरण येतात ते ही माया तरून जातात. दुस्तर माया तरावयाची असेल तर मलाच शरण यावायास पाहिजे.

**जया सद्‌गुरु तारु पुढे । जे अनुभवाचिये कासे गाढे ।**
**जया आत्मनिवेदन तरांडे । आकळले ।।** ज्ञा. ७-९८

**अर्थ :** - ज्यांस सद्‌गुरु हा पुढे तारणारा (नावाडी) आहे. ज्या साधकांनी आत्मानुभव रूपी कासोटा घट्ट बांधला आहे व ज्यांना आत्मनिवेदनरूपी तापा प्राप्त झाला आहे. तेच या मायानदीतून तरून जाऊ शकतील.

खरे निष्काम भजन कसे करावें हे साधूच्या संगतीनेच कळते. कदाचित् देवाचा साक्षात्कार जरी झाला आणि देव जरी भेटला तरीपण

त्याचे वर्म कळणार नाही. कारण तो देव आपणाहून आपली महती सांगणार नाही. उदा. - वसुदेव नारदाजवळ आपला परिहार देतात-

**म्यां पूर्वी आराधिलें देवराया । तें भजन ममता गेले वाया।**
**प्रलोभविलो देवराया ! पुत्रस्नेहालागोनि ॥** ए.भा.२-८६.

**अर्थ :** मीहि पूर्वी देवाधिदेवाची आराधना केली होती. पण ते भजन ममतेमुळे वाया गेले. पुत्रलोभामुळे देवाच्या मायेने मी अगदी भुलून गेलो.

**मज देव तुष्टला प्रसन्नपणे । मागसी ते देईन म्हणे । तेथे मायेने ठकिले मजकारणे । माझा पुत्र होणे मी मागे ॥ तो हा माझा पुत्र श्रीकृष्ण ! परी मज न सांगे ब्रह्मज्ञान । तोचि वंदी माझे चरण। म्हणे बालक पूर्ण मी तुझे ॥ यापरी श्रीकृष्णापासी । ज्ञानप्राप्ती नव्हे आम्हांसी । कृष्ण परमात्मा हृषीकेशी । हे निश्चयेसी मी जाणे ॥ श्रीकृष्ण जन्मला माझे कुशी । म्हणोनि श्रद्धा आहे मजपासी । तेणेचि तूं तुष्टलासी देवऋषी । तरी निजकृपेसी उद्धरी ॥ तुम्ही अच्युतात्मे निजनिर्धारी । म्हणोनि देव तुमचा आज्ञाधारी । तुम्ही म्हणाल त्यांते उद्धरी । एऱ्हवी हाती न धरी आनातें ॥** ए. भा.२ - ८७ - ९१

**अर्थ :** - वसुदेव पुढे सांगतात - देवाला संतोष होऊन तो माझ्यावर प्रसन्न झाला आणि तूं मागशील ते देईन म्हणाला, त्यावेळेस मायेने मला फसविले. त्यामुळे 'माझा पुत्र हो' हे मागणे मी मागितले. तोच हा माझा पुत्र श्रीकृष्ण होय. पण तो मला ब्रह्मज्ञान सांगत नाही. तोच माझ्या चरणावर मस्तक ठेवतो आणि 'मी खरोखर तुझे लेकरू आहे' असे म्हणतो. त्यामुळे श्रीकृष्णापासून आम्हाला ज्ञानप्राप्ती होत नाही. खरोखरच हृषीकेशी परमात्मा आहे हे मला माहीत आहे. नारदा, तुम्ही अच्युत जो परमात्मा त्याचे आत्मे आहात आणि तुमचा तो आज्ञाधारक आहे. आता तुम्हीच मला ब्रह्मज्ञान सांगा. तो तर सांगत नाही. तुम्ही



ज्यांचा उद्धार करा म्हणाल त्यांचाच तो उद्धार करतो. नाहीतर इतरांना हातातसुद्धा धरीत नाही. नंतर नारदांनी वसुदेव देवकीला ब्रह्मज्ञान सांगितले व त्यांचा उद्धार केला.

**धरतील हातीं संत कृपावंत ।**
**पाळी पंढरीनाथ लळा त्यांचा ॥** निळोबाराय

देव हा आरसा किंवा प्रतिध्वनीसारखा आहे. उदा. आरशांत जसे पहावे तसे दिसते. आपण नमस्कार केला तर प्रतिबिंबहि नमस्कार करते. आपण पाठ फिरवली तर प्रतिबिंबहि तसेच दिसते.

**भाव जैसा माझ्या ठायी तुम्ही धरा । तैसाचि मी खरा तुम्हालागी ॥**

**अर्थ :** ( तु. म. १८ ) अगे गौळणींनो, तुम्ही जसा भाव माझ्या ठिकाणी ठेवाल तसा मी तुम्हाला खरोखर प्राप्त होईन.

हिरण्यकश्यपूला देव प्रसन्न झाला. म्हणाला, 'वरंब्रूहि' हिरण्यकश्यपू म्हणाला, "मला मरण नको. आंत नको बाहेर नको वैगरे" देव म्हणाले, तथास्तु. पण असे म्हणाले, नाहीत कीं तूं कधीतरी मरणार आहेस मग अमरपद कां मागून घेत नाहीस ? पण ते मागणाऱ्याला कळत नाही. देणाऱ्याला कळते. देवाजवळ काय मागावे हे फक्त संतच शिकवितात. म्हणूनच नाथ महाराज सांगतात -

**हरि प्राप्तीसीं उपाय । धरावे संताचे तें पाय ॥ १ ॥ तेणें साधतीं साधनें । तुटतीं भवाचीं बंधने ॥ २ ॥ संतावीण प्राप्ती नाही । ऐसें वेद देती ग्वाही ॥ ३ ॥**

ज्ञानेश्वर महाराज अमृतानुभवात सांगतात -

**आतां उपायवनवसंतु । जो आज्ञेचा आहेवतंतू ।**
**अमूर्तचि परी मूर्तु । कारुण्याचा ॥** अमृ. २-१

**अर्थ :** - आता श्रीगुरूचे यथार्थ स्वरूप विश्वाच्या रूपाने दिसणारी तत्त्वें जी शिवशक्ति त्याचे वर्णन केल्यानंतर उपाय म्हणजे साधन हेच कोणी एक वन (बाग) या बागेला फलद्रूप करणारे सद्गुरु हेच कोणी एक वसंत आहेत. तसेच सद्गुरु हे ब्रह्मविद्येचे आहेवतंतु (मंगळसूत्र) आहेत. ब्रह्मविद्या ही सद्गुरुंच्या अस्तित्त्वावर आहे. ते स्वरूपाने अमूर्त आकाररहित परंतु कारुण्याची मूर्तिमंत प्रतिमा आहेत. म्हणजेच दीनांचा उद्धार करण्याकरिता दयेने आकार धारण केलेले आहेत.

म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज सांगतात कीं, माझा स्वानुभव असा आहे कीं, भगवत्प्राप्ती सफल होण्यासाठी संतांची ( सद्गुरुंची) संगती करणे आवश्यक आहे.

ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात । साधूंचे संगती तरणोपाय ॥ ४ ॥

- भावार्थ संपला -

व्याख्यान :- ज्ञानेश्वर महाराज या अभंगांत सांगतात कीं, योगयागाने परमात्मा प्राप्त होणार नाही. परंतु काही ठिकाणी मोक्षास योग व ज्ञान ही दोन साधनें सांगितली आहेत. खुद्द ज्ञानेश्वरांनी सांगितले आहे कीं

आतां ईश्वर प्राप्तीलागी । प्रवर्तता ज्ञानयोगी ।
थिंवसेयाचि आंगीं । उणीव नोहे ॥ ज्ञा. १६-१९५

**अर्थ :** - आतां ईश्वरप्राप्तीचे दोन मार्ग जे ज्ञान व योग (अष्टांगयोग) यांचे आचरण करीत असता अंगामध्ये धैर्याचा कमीपणा नसतो. ज्ञानावांचून मोक्ष मिळणार नाही ही गोष्ट निर्विवाद आहे. ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

जे ज्ञान जयाचां हातीं । तोचि समर्थु मुक्ती ।
जैसा शतमख संपत्ती । स्वर्गीचिये ॥ ज्ञा. १५-३०



**अर्थ :** - कीं ज्याप्रमाणें शंभर यज्ञ केलेला माणूस स्वर्गाचे ऐश्वर्य (इंद्रपद) मिळविण्यास समर्थ होतो. त्याप्रमाणे ज्ञान ज्याच्या हस्तगत झालेले आहे. तोच मोक्ष मिळविण्यास समर्थ होतो.

योग हा बहिरंग साधनांपैकी आहे. त्यायोगानें चित्ताची स्थिरता होईल, पण ज्ञानाशिवाय मोक्ष मिळणार नाही. शिवाय योगाचे कष्ट फार आहेत.

तया महेंद्रादि पदे । करितातीं वाटवधें ।
आणि ऋद्धिसिद्धींची द्वंद्वे । पडोनि ठाती ॥ ज्ञा.१२-६१

**अर्थ :** त्यास (त्या योग्यास) इंद्रपदादि पदे वाटमारेपणा करतात. व ऋद्धिसिद्धींपासून निर्माण होणारी सुखदुःखें या योग्याच्या ब्रह्मप्राप्तीच्या आड येऊन राहतात.

नागिणी उत्साहे नवही द्वारे निरोधुन । नाडित्रयामाजी सुषुम्ना संचरण । न साधे हा मार्ग ऐसें बोलती मुनिजन । नरहरी चिंतने अहर्निशी मुक्तिस्थान ॥ मोडिसी करचरण तेणे पावसी अंतसमो । मोहों तृष्णा न तुटे ब्रह्मविद्या केवी गमो मोठा हा अन्यावो जे हरिचरणीं नाही नमो । मोक्षाची चाड तरी मुकुंदी मन रमो ॥

अष्टांग योगें न शिणिजे । यम नियम निरोध न कीजे रया ॥ वाचा गीत गाईजे वाचा गीत गाईजे । गातां वातां श्रवणीं ऐकिजे रया ॥

योगाभ्यास करतांना ऋद्धिसिद्धी आडव्या येतात. ऋद्धि = स्वर्गादिक ऐश्वर्य; सिद्धि = अष्टमहासिद्धि. या पुढीलप्रमाणे आठ आहेत. १) अणिमा २) महिमा ३) लघिमा ४) गरिमा ५) प्राप्ति ६) प्राकाम्य ७) ईशित्व ८) वशित्व

अणिमा महिमा चैव गरिमा लघिमा तथा ।
प्राप्तिः प्राकाम्यमीशत्वं वशित्वं चाष्टसिद्धयः ॥

करून घ्यायची आहे, तर तूं एकनिष्ठतेचा शुद्ध भाव त्याच्याठिकाणी ठेव. पुन्हा याबद्दल महाराज शपथेवर सांगतात -

**कांहीं न लगे एक भावचि कारण । तुका म्हणे आण विठ्ठलाची ॥**

- तु. म. २६५५

**अर्थ :** - तुकाराम महाराज म्हणतात, देवाच्या ठिकाणीं भावावांचून दुसऱ्या कोणत्याहि वस्तुची जरुरी नाही. हे मी विठ्ठलाची शपथ घेऊन सांगतो. पण जर तुम्ही भाव ठेवला नाही तर भवसागराच्या पुरांत वाहून जाल.

**करिता भरोवरी दुरावसी दुरी । भवाचिये पुरी वाहावसी ॥** तु.म.२६५५

भाव उत्पन्न होण्याकरिता साधुची संगती पाहिजे आणि साधूंची संगती नामस्मरणाच्या योगाने मिळते. कारण साधूंना नामस्मरणच आवडते.

**आम्हा आवडे नाम घेता । तोही पिता संतोषे ॥** तु.म.११७२

**अर्थ :** - आम्हांस हरीचे नाम घेणे आवडते व त्यामुळे तो आमचा पिता देवहि संतुष्ट होतो.

ज्ञानेश्वर महाराज तर स्वानुभवाने सांगतात -

**ज्ञानदेव म्हणे तरलो तरलो । आता उद्धरलो गुरुकृपे ॥** ज्ञा. म.

सद्‌गुरूंच्या कृपेशिवाय तरणोपाय तर नाहीच. पण त्यांची भेटहि नामस्मरणाशिवाय शक्य नाही. म्हणून ज्ञानेश्वर महाराज अति कळवळ्याने सांगतात कीं, हे जनहो, तुम्ही मुखाने नामोच्चार करा.

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥**

**- समाप्त -**

* * *

## * अभंग सहावा *

**साधुबोध झाला तो नुरोनियां ठेला ।**
**ठायींच मुराला अनुभव ॥ १ ॥**
**कापुराची वाती उजळली ज्योती ।**
**ठायींच समाप्ती झाली जैसी ॥ २ ॥**
**मोक्षरेखें आला भाग्ये विनटला ।**
**साधूंचा अंकिला हरिभक्त ॥ ३ ॥**
**ज्ञानदेवा गोडी संगती सज्जनीं ।**
**हरि दिसे जनीं वनीं आत्मतत्त्वीं ॥ ४ ॥**

**अर्थ :** योग्य अधिकाऱ्यांस साधुने उपदेश केला म्हणजे तो नुरून उरतो. साधुच्या उपदेशानें उत्पन्न झालेला अनुभव (समजूत) जागच्या जागींच मुरतों (नाहींसा होतो) साधनचतुष्टय संपन्न अधिकाऱ्यास श्रीगुरुरूपी साधूंनी 'तत्त्वमसि' वाक्याचा बोध केल्यानंतर देहेंद्रियातीत मी ब्रह्म आहे. असा अनुभव होतो, पण तोहि अनुभव स्फुरणरहित ज्ञानरूप ब्रह्ममध्ये नाहीसा होतो. मग तो अधिकारी देहबुद्धीनें देहातीत जीवबुद्धीने जीवातीत शिवबुध्दीनेहि न उरून ज्ञानाज्ञानातीत सहज निर्धर्म ब्रह्मस्थितीने असतो. ॥ १ ॥ जसे कापूररूपी वात अग्नीच्या ज्योतीनें पेटली म्हणजे कापूर व अग्नी ह्यापैकी कांहीं एक शिल्लक राहात नाही. ॥ २ ॥ तसें साधूंच्या अंकित झालेल्या हरिभक्ताच्या अविद्येची व विद्येची निवृत्ति होऊन तो सत्य निर्धर्म मोक्षभूमिकेवर प्राप्त होऊन परमऐश्वर्यरूप मोक्षाने सुशोभित होतो. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मला साधुसंतांच्या संगतीत असण्यात गोडी वाटते आणि मला सर्व जनांत व वनांत आत्मतत्त्वरूप हरि दिसत आहे. ॥ ४ ॥

विवरण :

**साधुबोध झाला तो नुरोनिया ठेला । ठायींच मुराला अनुभव ॥ १ ॥**

पूर्वी सांगितल्याप्रमाणे हरिपाठ हा काही स्फुट सत्तावीस अभंगांचा संग्रह नसून जसे सत्तावीस मणि एका सूत्रांत गोवावेत तसे हें अभंग असल्याने यांची एक साखळी आहे. या सहाव्या अभंगाच्या पूर्वीचा जो पांचवा अभंग आहे; त्याच्या शेवटच्या चरणांत ज्ञानेश्वर महाराज आपण पुढे काय सांगणार आहोत याची सूचना करतात; मागील अभंगाच्या शेवटी सांगितले -

**ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात । साधूंचे संगती तरणोपाय ॥ ४ ॥**

म्हणजे साधूंच्या संगतीने साधक तरतो, हें स्वानुभवाचा दृष्टांत देऊन सांगितले. मग साधक तरतो म्हणजे नेमकी त्याची काय अवस्था होते ? व साधु तारतो म्हणजे नेमके काय करतो ? याचा सविस्तर खुलासा या प्रस्तुत अभंगांत केला आहे.

**साधुबोध झाला तो नुरोनिया ठेला । ठायींच मुराला अनुभव ॥ १ ॥**

**साधकांस साधु संसारांतून तारतात म्हणजे काय देतात ?** तर तें त्याला बोध देतात. आतां काही व्यवहारीक साधुहि देतात, पण तें जरा वेगळे देतात. इस्टेट वाढवून देतात, गाडीघोडे, मुलेबाळे वाढवून देतात, रोगराई बरी करून देतात, नौकरी वगैरे लावून देतात. खरे साधु यातील काहीच देत नाहीत आणि जर देत असतील तर ते खरे साधु नसून ढोंगी समजावे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझ्या गुरूंनी मला काय दिले ?

**ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण । दिधलें संपूर्ण माझे हाती ॥**

माझे सद्गुरु हे गुणत्रयापलीकडील निर्गुण आहेत व त्यांनी आपला बोध माझ्या स्वाधीन केला.



**निवृत्ति जया नांव । निवृत्ति जया बरव ॥
जया निवृत्तिची राणीव । निवृत्तिची ॥ अमृ. २-७०**

अर्थ : ज्यांचे नांव निवृत्ति आहे व निवृत्ती हीच ज्यांची शोभा आहे आणि त्या निवृत्तीनाथांचे राज्य पाहिलें तर निवृत्तीच आहे. म्हणून या निवृत्तिनाथांच्या ठिकाणीं मठमठिका कशा असणार म्हणून बोध देतात.

**शिष्यशास्त्रादि विलासे । मठादि मुद्रेचेनि मिसें ।
घातलें आहार्ती फांसें । निःसंगा जेणे ॥ ज्ञा. १८-१०६४**

अर्थ : ज्या परिग्रहानें शिष्यशास्त्रादिक मिळविण्याच्या क्रीडेने व मठ बांधणे. खेचरी वगैरे मुद्रा लावणे इत्यादि लक्षणाच्या निमित्तानें निःसंग पुरुषाला (संगाच्या) पाशांत घातले आहे म्हणून ते खरे साधु नाहींत, मग खरे साधु काय देतात, तर बोध देतात.

**बोध दिला मज सांगाते मार्ग दाविला नीट । भ्रांति हे समूळ गेली दिसू लागली वाट । नाचत प्रेमछंदे चालू लागलो सपाट । एका जनार्दनी पावलो पंढरी पेठ ॥ ए. म.**

साधु बोध देतात पण तोहि अधिकारपरत्वे देतात. नाहीतर असे होईल कीं - **मुंगीवरी भार गजाचे पालान ।**

**घालिता तो कोण कार्यसिद्धी ॥ तु.म.३५१४**

अर्थ : जर हत्तीवर घालण्याचे अंबारीचे ओझे जर मुंगीवर घातले. तर त्यापासून कोणते काम साध्य होईल ?

ज्याप्रमाणें उत्तम वैद्य जसा रोग त्याप्रमाणेच औषध देतो - **नव्हो वैद्य आम्ही अर्थाचे भुकेले । भलते द्यावे पाले भलत्यासी ॥ तु. म.३५१६**

अर्थ : जे वैद्य लोभाने रोग्याला औषध देण्याच्या निमित्ताने भलत्या रोगासाठी भलतीच वनस्पती ( औषधी ) देऊन पैसे

मिळवितात. तसे आम्ही ( अर्थाचे = ) पैशाचे आशेखोर नव्होत.

अधिकाऱ्यामध्ये तीन वर्ग आहेत. १) कर्माचा अधिकारी २) उपासनेचा अधिकारी ३) ज्ञानाचा अधिकारी

**१) कर्माचा अधिकारी :-** ज्याच्या अंतःकरणात मल, विक्षेप आणि आवरण हे त्रिदोष असतात व तो पूर्णतः विषयासक्त असतो तो कर्माचा अधिकारी त्याला पुढीलप्रमाणे उपदेश सांगितला आहे.

**जोडोनिया धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेच करी ॥** तु. म. २६५२

अर्थ : अहो जनहो, तुम्ही चांगल्या व्यवहाराने द्रव्य मिळवा आणि त्याचा उदासवृत्तीने विचारपूर्वक खर्च करा.

म्हणोनि फळीं लागु । सांडोनि देह संगु ।
कर्मे करावी हा चांगु । निरोप माझा ॥ ज्ञा. १८-१७६

अर्थ : म्हणून फळाची इच्छा सोडून व देहाचा अहंकार टाकून कर्मे करावीत. हा माझा सर्वांना चांगला निरोप आहे. असा उपदेश कर्माधिकाऱ्यांना करतात.

२) उपासनेचा अधिकारी :- ज्याच्या चित्तात विक्षेप हा दोष शिल्लक असतो म्हणजे तो पूर्ण विरक्तहि नसतो व पूर्ण आसक्तहि नसतो. असा मधल्या वर्गातील अधिकारी हा उपासनेचा अधिकारी असतो. याला पुढीलप्रमाणे उपदेश करतात -

**घार्यी आडकलें फळें । ते पानपेना उपचारबळें । तेवीं विषय दोष भोग मेळें । कदाकाळे शमेना ॥ येतां देखोनियां मरण । स्वयें होय कंपायमान । तेवीं विषयभोग दर्शन । देखोनि आपण चळी कांपें ॥** ए. भा. २०-८२,८३



**अर्थ :-** शस्त्राच्या प्रहारांत बाणांचे लोखंडी पाते अडकून बसले; तर ते उपटून काढल्याखेरीज ती जखम बरी करण्याकरीता नुसत्या झाडपाल्याचा उपयोग होत नाही, त्याप्रमाणे विषयातील दोष विषय भोगून कधीच नष्ट व्हावयाचे नाहीत. ॥ ८२ ॥ मरण येत असलेलें दिसले कीं मनुष्य जसा थरथरा कापूं लागतो त्याप्रमाणे विषयभोग पाहिले कीं तो (खरा साधक) थरथर कापू लागतो. विषय नकोसे वाटतात, पण वासना मात्र सुटत नाही. ॥ ८३ ॥

भय वाटे पर । न सुटे हा संसार ।
**ऐसा पडिलो काचणी । करी धांवा म्हणूनि ॥** तु. म.-१५०३

**अर्थ :** या संसाराचे मला मोठे भय वाटते परंतु हा संसार सुटता - सुटत नाही. आता मी मोठ्या पेचात सांपडलो आहे. एवढ्याकरिता देवा तूं माझ्याकडे धांव घे.

**सांभाळी सांभाळी आपुली हें माया ।
आम्हांसीं कां वाया भयाभीत केले ॥** तु. म.-१५९५

**अर्थ :** देवा, आपल्या या मायेस तुम्ही नीट आवरून धरा (असे द्विवार सांगतात.) ह्या मायेच्या योगाने आम्हाला तुम्ही उगीच भयभीत कां केले आहे ? उदा. दगडाखाली हात सांपडला आहे. आपल्या पुरुषार्थाने हात निघत नाही. त्याला जशी दुसऱ्याची मदत लागते. म्हणून त्याला ध्यान - भजन सांगतात.

**३) ज्ञानाचा अधिकारी :-** ज्याने प्रयासाने अंतःकरणातील मल, विक्षेप हे दोन दोष नष्ट केलेले आहेत. याला 'तत्त्वमसि' महावाक्याचा उपदेश करतात. तो ज्ञानाचा अधिकारी होय, याला कर्म उपासना सांगत नाहीत कारण -

**तीर्थे बाह्यमळु क्षाळें । कर्मे अभ्यंतर उजळे ।**

**एवं तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्मेंचि ॥** ज्ञा. अ. १८-१६०

**अर्थ :** तीर्थांच्या योगाने बाहेरील (शरीरावरील) मळ धुतला जातो व कर्माने चित्तशुद्धी होते. याप्रमाणे सत्कर्मे हीच पवित्र तीर्थे आहेत, असे समज.

म्हणून जो ज्ञानाचा अधिकारी आहे त्याला या प्रस्तुत अभंगातून उपदेश करतात. **साधुबोध झाला तो नुरोनिया ठेला ।**

आणि मग बोध दिल्यानंतर शिष्याची अवस्था कशी होते. साधूच्या बोधाने, ज्ञानाने ब्रह्मभावाचा अनुभवहि ब्रह्मांतच विलीन होऊन जातो. तो देहावर आहे हेहि म्हणता येत नाही आणि देहावर नाही हेहि म्हणता येत नाही. म्हणूनच माउली सांगतात -

**.......ठायींच मुराला अनुभव ॥ १ ॥**

मी ब्रह्म आहे ही वृत्तीसुद्धा त्याच्या ठिकाणीं मावळली. मी देह व मी ब्रह्म या दोन्ही वृत्ती आज्ञानातीलच आहेत. या ज्ञानी भक्ताच्या ठिकाणीं या दोन्ही वृत्ती नाहीशा झालेल्या आहेत. परंतु हा सिद्धांत समजणें कठीण आहे. म्हणून ज्ञानेश्वर महाराज पुढील चरणांत दृष्टांत देऊन सांगतात.

**कापुराची वाती उजळली ज्योती । ठायींच समाप्ती झाली जैसी ॥ २॥**

कापुराची ज्योत पेटली म्हणजे ती पूर्ण जळाल्यानंतर शेवटी कापूरहि उरत नाही, राखहि उरत नाही आणि अग्नीहि उरत नाही त्याप्रमाणे ज्ञान्याला देहभाव तर उरत नाहीच पण ब्रह्मभावहि उरत नाही. कार्य संपले कीं कारणहि जेथल्या तेथेच मावळते.

**म्हणे परिसणेंयांचया राया । आइकें बापा धनंजया ।**
**ऐसी जळो सरलिया माया । तेथ जाळितें तेहीं जळे ॥** ज्ञा. ८-५८



**अर्थ :** श्रीकृष्ण भगवान म्हणाले, श्रोत्यांतील श्रेष्ठा, अर्जुना, बाबा ऐक, याप्रमाणें माया जळण्याची संपली कीं तिला जाळणारें जें ज्ञान तेहि त्याप्रसंगी जळून नाहीसें होतें.

मी देह किंवा मी ब्रह्म या दोन्ही वृत्ती विरल्यानंतर तो साधक कोणत्या हद्दीवर जाऊन पोहोचतो, हे अभंगाच्या तिसऱ्या चरणांत सांगतात .

**मोक्षरेखें आला भाग्यें विनटला । साधूंचा अंकिला हरिभक्त ॥ ३ ॥**

अशारितीने साधूने ज्याला आपलेसे करून बोध दिला तो साधक मोक्षाच्या सीमेवर येऊन पोहोचतो आणि सर्वांत श्रेष्ठ असा भाग्यानें तो शोभतो. हा वैराग्यशील साधक मोक्षाच्या हद्दीवर आला खरा पण संसार त्याचा पाठलाग करतो पण तो प्रतिज्ञा करून संसाराच्या जाळ्यात सांपडत नाही.

**संसाराचिया पायां पुढां । पळती वीतराग होडा ।**
**ओलांडोनि ब्रह्मपदाचा कर्मकडा । घालिती मागा ॥** ज्ञा.१५-७८

**अर्थ :** वैराग्यशील पुरुष (संसार त्याचा पाठलाग करीत असतांना) त्या संसाराच्या पायापुढे प्रतिज्ञेने पळतात व कर्माचा शेवट जो सत्यलोक हाच कोणी कडा, त्या कड्याचे उल्लंघन करून त्यास मागे टाकतात.

परमार्थांत शेवटपर्यंत पोहोचण्यांस फार मोठे भाग्य पाहिजे कारण मध्ये कितीतरी अडचणी व विघ्नें असतात.

**जे तो विषयाची मोट झाडीं । मार्जीं कामक्रोधांची सांकडीं। चुकावूनि आला पाडी । सद्वासनेचिया ॥ १२७ ॥ मग साधुसंगें सुभटा। उजू सत्कर्माचिया वाटा । अप्रवृत्तीचा आव्हाटा । डावलूनि ॥ १२८ ॥** ज्ञा. ७

**अर्थ :** कारण तो विषयांच्या दाट झाडीतून कामक्रोधांची संकटें टाळून,

चांगल्या वासनारूपी डोंगरावर आला. अर्जुना, मग संतांच्या संगतीनें विहित कर्माच्या सरळ मार्गानें, निषिद्ध आचरणाचा आडमार्ग टाकतो.

भाग्यवान पुरुष मोक्षाच्या हद्दीवर येतो. या ऐश्वर्यावर कोण येतो ? ते याच चरणाच्या उत्तरार्धात सांगतात **साधूंचा अंकिला हरिभक्त।**

जो हरिभक्त आहे व साधूंनी ज्याला आपले म्हटले आहे, त्यालाच हे मोक्षरूपी भाग्य प्राप्त होते. आता या अभंगाच्या शेवटच्या चरणांत मागीलप्रमाणेंच पुन्हा आत्मप्रतिती सांगतात -

**ज्ञानदेवा गोडी संगती सज्जनी । हरि दिसें जनी वनी आत्मतत्त्वीं ॥ ४ ॥**

ज्ञानेश्वर महाराज सांगतात कीं, या संतसज्जनांच्या संगतीत मला गोडी वाटते. त्यांच्या कृपेने मला सर्व लोकांत, वनांत म्हणजेच सर्वत्र व्यापक असणारा परमात्मा आत्मस्वरूपींसुद्धा दिसत आहे. माझ्या ठिकाणी एक हरीच भरून राहिला आहे असे दिसते. ही ज्ञानेश्वर महाराजांची आत्मप्रतिती आहे.
शास्त्रामध्ये प्रतितीचे तीन प्रकार सांगितले आहेत.

१) गुरुप्रतिती - म्हणजे सद्‌गुरु सांगतात म्हणून
२) शास्त्रप्रतिती - म्हणजे शास्त्र सांगते म्हणून
३) आत्मप्रतिती - म्हणजे स्वानुभवाने माहीत आहे म्हणून

या सर्व प्रतितींमध्ये आत्मप्रतिती श्रेष्ठ आहे. तुकाराम महाराज सांगतात - **अनुभवे आले अंगा। ते या जगा देतसे ॥** तु. म. ३४१४

उदा. : सूर्य उगवला तर अंधार पडतो असे सांगितले तर लोकांना पटेल काय ? तर नाही, कारण लोकांचा अनुभव वेगळा आहे कीं सूर्य उगवला म्हणजे अंधार जातो व जग प्रकाशमय होते.

ज्ञानेश्वर महाराज आपल्या अनुभवाने सांगतात कीं या संतांचे देणे अपार आहे.



**या संतांचे हें देणें । कल्पतरुहुनि दुणें ।**
**परिसापरिस अगाध देणें । चिंतामणी ठेंगणा ॥** ज्ञा.म.

**कृपाकटाक्षें न्याहाळिलें । आपुल्या पदी बैसविलें ।**
**बाप रखुमादेवीवरू विठ्ठले । भक्ता दिधले वरदान ॥** ज्ञा. म.

ज्ञानेश्वर महाराजांना या ठिकाणी जे सज्जन अभिप्रेत आहेत ते म्हणजे व्यवहारी सज्जन नसून आत्मस्वरूपाच्या ठिकाणी तद्रूप झालेले सज्जन होत. आता शेवटच्या चरणात संतसंगतीचा परिणाम म्हणजेच फल सांगतात. **हरि दिसे जनीं वनीं आत्मतत्त्वी ॥ ४ ॥**

संतांच्या संगतीचा परिणाम म्हणून त्यांना हरि सर्वत्र दिसूं लागला. एखाद्या देवळाच्या कोपऱ्यात नव्हे तर जनांत, वनांत आत्मस्वरूपात भगवंत दिसू लागला आणि भगवंत कसा दिसतो तर -

**अनंत रूपें अनंत वेषें देखिले म्या त्यासी ।**
**बापरखुमादेवीवरू खुण बाणली कैसी ॥** ज्ञा. म.

**जें जें दृष्टी दिसे तें तें हरिरूप । पूजा ध्यान जप नाही त्यांसी ॥**

**जनीं वनीं अवघा देव । वासनेचा पुसावा ठाव ।**
मग वोळगा तो वासुदेव । **ऐसा मनीं वसूं द्या भाव गा ॥** तु.म.३३९

**अर्थ :** सर्व जनावनांच्या ठिकाणीं व्यापक असा एक देवच आहे. तो पाहण्यासाठी वासना ही समूळ नाहीशी करा व मग त्या वासुदेवाला शरण जावे, असा भाव तुम्ही आपल्या मनात बळकट धरा.

**पाहे तिकडे मायबाप । विठ्ठल आहे रखुमाई ॥** तु. म. ४०२०

**अर्थ :** जिकडे पहावे तिकडे विठ्ठल बाप व आई रुक्मिणी भरलेली आहे. असे अनुभवाअंती दिसते.

**दर्पणी पाहता रूप न दिसे आपुले ।**
**बाप रखुमादेवीवरू विठ्ठलें मज ऐसें केले ।।** ज्ञा. म.

**एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसें । दोनी डोळस आरिसे ।**
**परस्पर पाहतां कैसें । मुकले भेदा ।।** चांगदेव पासष्टी ६२

**अर्थ :** (या ओवीत आरशाच्या रूपकाने ज्ञानेश्वर महाराज व चांगदेव म. या दोघांची स्थिती काय झाली, तिचे वर्णन केले आहे.) दोन स्वच्छ आरसें एकमेकासमोर धरले असता त्यापैकी कोणता आरसा कोणत्या आरशात आपले प्रतिबिंब पहात आहे, हे जसे सांगता येत नाही. म्हणजे त्यांच्यामध्ये पाहणारा व दाखविणारा हे भेद नाहीसे होतात. परंतु आरसे हे निर्जीव आहेत. त्याच्यामध्ये पाहणे ही क्रिया संभवत नाही. म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज मुद्दाम 'डोळस' हे विशेषण वापरतात.

ज्ञानदेव आणि चक्रपाणी (= चांगदेव) हे शुद्ध आत्मज्ञानसंपन्न डोळस आरसे एकमेकांस पहात असता एकमेकांच्या देहदृष्टीने असणाऱ्या भेदास मुकले.

**तया आत्मयाच्या भाखा । न पडेचि दुसरी रेखा ।**
**जरी विश्वा अशेखा । भरला आहे ।।** अमृ.७-१४६

**अर्थ :** जरी ही आत्मवस्तु अखिल विश्वामध्ये ओतप्रोत भरून राहिली आहे, तरी तिच्या नांवासंबंधी दुसरी रेषा उमटत नाही, म्हणजे द्वैताची भाषाच उत्पन्न होत नाही.

**प्रकाशु तो प्रकाश कीं । यासीं न वंचे घेईं चुकी ।**
**म्हणौनि जग असेकी । वस्तुप्रभा ।।** अमृ. ७-२८९.

**अर्थ :** प्रकाशरूप (ज्ञानरूप) आत्मा प्रकाशच (ज्ञानच) आहे. प्रकाशक चैतन्य व प्रकाश्य जगत् ही एकच आहेत; यात अन्यथा नाही.



या गोष्टीविषयीं फसू नये म्हणून जग हे समस्त आत्मप्रकाशच आहे. तो वस्तूचा प्रकाशच (स्फूर्तिविलास) आहे. तूं याला अज्ञान म्हणतोस. ही आपली चूक पदरात घे व जगत् हे वस्तुप्रभाच आहे असे समज.

वरील दोन तीन ओव्यांमध्ये ज्ञानेश्वर महाराजांनी आपला व्यापक आत्मानुभव सांगितला आहे. तरी असा अनुभव येण्यासाठी सद्गुरूंना शरण जाऊन; त्यांची कृपा प्राप्त करून घेऊन बाबांनो तुम्ही अखंड हरिभजन करा. हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।

**- भावार्थ समाप्त -**

**साधुबोध झाला तो नुरोनिया ठेला । ठायींच मुराला अनुभव ।। १ ।।**

**व्याख्यान :-** आतां :- १) साधु कोणाला बोध करतात ? २) काय बोध करतात ? ३) व ज्याला बोध केला तो नुरून कसा उरतो ? यासंबंधी विचार करणे आवश्यक आहे.

त्या साधकानें पूर्वीच आत्मज्ञानासाठी लागणारी सर्व सामुग्री मिळविलेली असते.

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ।।** गी.१८-५१

**अर्थ : शुद्ध बुद्धीने युक्त (सात्त्विक) धैर्याने स्वतःचे मन व इंद्रियें यांचे नियमन करून, शब्दादि विषयांचा त्याग करून, प्रीति आणि द्वेष सोडून, शरीर व मन यांचे नियमन केलेला असा साधक ब्रह्मरूप होण्याला योग्य होतो.**

**तरी गुरु दाविलिया वाटां । येऊनि विवेकतीर्थतटां ।**
**धुवूनिया मळकटां । बुद्धीचा तेणे ।।** ज्ञा. १८-१०११

**अर्थ :** तर गुरूंनी दाविलेल्या वाटेने विवेकरूपी तीर्थाच्या काठावर

येऊन तेथे त्या साधकाने आपल्या बुद्धीचा मळ धुवून टाकल्यावर,

**पुत्र वित्त कलत्र । हे झालियाही स्वतंत्र ।**
**पै माझे न म्हणे पात्र । विषाचे जैसे ।।** ज्ञा. १८-९५८

**अर्थ :** - ज्याप्रमाणे वाढलेल्या ताटांतील विषयुक्त अन्नाला कोणी माझे म्हणत नाही. त्याप्रमाणे पुत्र, धन व कुटुंब ही सर्व त्याच्या मनाप्रमाणे वागणारी असली तरी त्यांना माझे असे म्हणत नाही.

ज्ञानी भक्ताच्या ठिकाणी पूर्ण वैराग्य असते.

**तें हें विषय वैराग्य । जें आत्मलाभाचे भाग्य ।**
**येणे ब्रह्मानंदा योग्य । जीव होती ।।** ज्ञा.१३-५२

**अर्थ :-** वर सांगितलेले विषयाविषयीचे वैराग्य हे आत्मप्राप्तीचे दैवच म्हटले पाहिजे. याच्यामुळे साधक ब्रह्माचा आनंद घेण्यास योग्य होतो. वैराग्य उत्पन्न होणे हेच खरे भाग्य आहे. त्यायोगाने साधूंची भेट होते.

**वैराग्याचे भाग्य । संतसंग हाचि लाग ।। १ ।।**
**संतकृपेचे हे दीप । करी साधका निष्पाप ।। २ ।।** तु. म. गाथा २३३६

**अर्थ :-** वैराग्याचे खरे भाग्य म्हणजे संतसंगती हेच होय. संत हे कृपेचा दिवा आहेत. ते साधकांना निष्पाप करतात.

वैराग्याचे दोन प्रकार आहेत १) जिहासा २) जिज्ञासा तसेच नाथांनी चिरंजीवपदांत वैराग्याचे तीन प्रकार सांगितले आहेत. ते म्हणजे **१) राजस वैराग्य २) तामस वैराग्य आणि ३) सात्त्विक वैराग्य**

**नाही वेदविधी आचार । नेणे सत्कर्म साचार ।**
**कर्मींधर्मी भ्रष्टाकार । तो अपवित्र तामस ।।** चिरंजीवपद ६

**अर्थ :-** वेदविधी, आचारविचार, सत्कर्म इ. ज्याला माहीत नाही व



जो भ्रष्टाचार करतो तो पुरुष अथवा त्याचे वैराग्य हे **तामस वैराग्य होय.**

**त्याग केला पूज्यते कारणे । सत्संग सांडोनि पूजा घेणे ।**
**शिष्यममता धरोनि राहणे । ते जाणणें राजस ।।** चिरंजीवपद ७

**अर्थ :-** लोकांनी आपल्या नादी लागावे म्हणून व आपली पूजा करावी या हेतूने (बाह्यतः) त्याग करणे व संतसंगती सोडून पूजा घेणे व शिष्यममता धरून राहणे. हे **राजस वैराग्य** समजावे.

**आतां वैराग्य शुद्ध सात्त्विक । जे मी जगद्वंद्य मानी यदुनायक । ते तूं सविस्तर ऐक । मनी निष्टंक बैसावया ।। भोगेच्छा विषयक । ते तो सांडी सकळीक । प्रारब्धे प्राप्त होता देख । तेथोनि निष्टंक अंग काढी ।।** एकनाथ महाराज चिरंजीवपद ८ व ९

**अर्थ :-** आतां शुद्ध **सात्त्विक वैराग्य** जे मी यदुनायक जगद्वंद्य मानतो. ते सविस्तर सांगतो, मनांत नीट ठसण्याकरिता लक्षात ठेव. विषयाची सर्व भोगेच्छा तो टाकून देतो. प्रारब्धानुसार भोग प्राप्त झाले तरी त्यातून तो अंग काढून घेतो. लिप्त होऊन राहात नाही.

**तिन्ही अवस्थाचेनि द्वारे । उपाध्युपहिताकारे । भावाभाव स्फुरे । दृश्य जे ।। तें हें आघवेचि मी दृष्टा । ऐसिया बोधाचा माजिवटां । अनुभवाचा सुभटा । थेंडा तो नाचे ।।** ज्ञा.१८-११८६-८७

**अर्थ :-** (जागृती, स्वप्न, सुषुप्ती) या तिन्ही अवस्थांच्या द्वाराने व (स्थूल, सूक्ष्म, कारण) या तिन्ही प्रकारच्या उपाधिच्या व विश्व, तेजस आणि प्राज्ञ या तीन उपहितांच्या (अभिमानी जीवांच्या) आकाराने व भावरूपाने जे (जागृती, स्वप्न या दोन अवस्थेमध्ये नसणेपणाने) जे हे दृश्य (संपूर्ण विश्व) अनुभवास येते, हे चांगल्या योद्ध्या अर्जुना, तें हे सर्व मी द्रष्टा आहे अशा या बोधाच्या भरात तो ज्ञानी भक्त, लग्नामध्ये जसा थेंडा नाचतो, तसा अनुभवाने नाचू लागतो.

**आतां अन्यथा ज्ञानी । या दोन्हीं अवस्था जयाजर्नीं ।**
**तया हारपती घर्नी । अज्ञानतत्त्वीं ।। ज्ञा.१५-५२५**

**अर्थ :-** आतां लोकांमध्ये अन्यथा (विपरीत) ज्ञानाच्या दोन (जागृती आणि स्वप्न) अवस्था आहेत. ज्या गाढ अज्ञानरूपी तत्त्वामध्ये (सुषुप्तीत) नाहीशा होतात.

अन्यथा ज्ञान हे अन्याचे अन्य रूपाने भासते. उदा. - मयासुराच्या सभेतील दुर्योधनाची फजिती, रज्जूसर्प, शुक्तिकारजत इ. असावे एक आणि दिसावे एक यालाच अन्यथा ज्ञान म्हणतात. त्याप्रमाणे सर्वत्र एक परमात्मा असतांना त्याच्या ठिकाणी चित्रविचित्र जगत् दिसणे (याचे विशेष स्पष्टीकरण मांडुक्योपनिषदांत आलेले आहे. अज्ञान आणि तत्कार्य प्रपंच ब्रह्मामध्ये मुळीच नाही. तर ते वृत्तीत जगत असते. पुढे ज्ञानाने वृत्तीचा लय झाल्याबरोबर जिकडे तिकडे परमात्मा दिसूं लागतो. आता अन्यथा ज्ञानी झोपेतून जागे झाल्याबरोबर अंतःकरण विक्षिप्त मूढ असे असते व समाधीतून उत्थान होणाऱ्याची प्रसन्न मुद्रा असते. पुढे ज्ञानाने अज्ञानवृत्ती नाहीशी होते व तो साधक 'अहंब्रह्मास्मि' अशा बोधावर येतो. परंतु हेहि घातकच आहे.

**जिती अविद्या ऐशी । अन्यथा बोधातें गिंवसी ।**
**तेचि यथार्थबोधेंसी । निमाली उठी ।।** अमृ.३-१०

**अर्थ :-** अविद्या ही जिवंत असतांना 'मला काही कळत नाही' अशी प्रतीत होणारी म्हणजे अन्यथा बोधाला कारणीभूत होते. विपरीत ज्ञान दाखविते आणि जेव्हा ती मरते तेव्हा पुन्हा यथार्थ बोधाने म्हणजे सोहं बोधाने जिवंत होऊनहि बांधते.

**परि जिती ना मेली । अविद्या हे जाकळी ।**
**बंध मोक्षीं घाली । बांधोनिया ।।** अमृ. ३-११



अर्थ :- परंतु अविद्या जिवंत असो कीं मेलेली असो, ती बंधन हे करतेच, जिवंत अविद्या जीवाला बंधात जखडून टाकते आणि मेलेली अविद्या त्याला मोक्षात अडकविते. यावरून हे सिद्ध होते कीं मोक्ष हे अविद्या कार्यच, त्यामुळे तोहि बंधच.

मी देह म्हणणे ही अविद्या व मी ब्रह्म म्हणणे ही यथार्थ बोधरूपी मृत अविद्याच. 'मी देह आहे ही वृत्ती जाण्याकरिता' 'मी ब्रह्म आहे' ही वृत्ती आणावी लागते . परंतु 'मी ब्रह्म आहे' ही वृत्ती सुद्धा घातकच आहे, हे वर सांगितले आहेच. उदा. - एका गृहस्थाच्या पायात काटा मोडला. तो काढण्यासाठी त्याने दुसरा काटा आणला. काट्याने काटा काढून झाल्यानंतर जर तो दुसरा काटा खिशात ठेवला तर तो बोचेल. म्हणून तोहि फेकून द्यावा लागतो. तात्पर्य, वर उल्लेखिलेल्या दोन्ही वृत्त्या घातकच आहेत. म्हणून त्या दोन्हीना मारण्याची गरज आहे. त्याशिवाय जीव सुखी म्हणजे पर्यायाने मुक्त होऊं शकत नाही.

'अहं ब्रह्मास्मि' ही वृत्ती घालवण्याचा उपाय ज्ञा. म. सांगतात -

**तें ऋण शेष वाचा इया । न फेडवे मरोनियां ।**
**तें पाया पडोनि मियां । सोडविलें ।।** अमृ.३-३२

अर्थ :- 'अहंब्रह्मास्मि' हे वाचेचे ऋण, तें मरूनहि फिटत नाही. ज्याच्याकडून आले त्याच्या पाया पडूनच फेडावे लागते.

**म्हणे परिसणेयांचया राया । आइके बापा धनंजया ।**
**ऐसी जळों सरलिया माया । तेथ जाळितें तेही जळे ।।** ज्ञा.८-५८

अर्थ :- भगवान अर्जुनाला सांगतात, हें श्रोत्यांतील श्रेष्ठा, बाबा ऐक, याप्रमाणे माया जळण्याची संपली कीं तिला जाळणारे जे ज्ञान तेहि त्या प्रसंगी जळून नाहीसे होते. उदा. स्त्री कल्पना गेली कीं पुरुष कल्पना जाते.

**तेवीं समूळ अविद्या खाये । ते ज्ञानहीं जैं बुडोनि जाय ।**

**तरी जे नाही कीर नोहे । आणि न साहे असणेही ॥** ज्ञाने.१५-४४०

**अर्थ :-** त्याप्रमाणे संपूर्ण अविद्येला नाहीसे करणारे जे ज्ञान तें देखील जेव्हां नाहीसे होते, तेव्हां तें (आत्मरूप) नाही असे खरोखर नाही. (मग आत्मरूप आहे असे म्हणा) त्याला आहे म्हणणेहि सहन होत नाही.

आतां त्या स्वरूपाच्या ठिकाणी मी जीव, मी ईश्वर, मी ब्रह्म इत्यादि भावना राहत नाहीत.

तेथ ब्रह्म आत्मा ईशु । यया बोला मोडा सौरसु ।
**न बोलणेयाहि पैसु । नाही तेथ ॥** ज्ञा. १८-१२१३

**अर्थ :-** त्या स्वरूपी ब्रह्म, आत्मा, ईश या शब्दांचा काहीच लाग लागत नाही आणि न बोलण्यालाहि तेथें अवकाश रहात नाही.

**ऐक्याचे एकपण सरे । जेथ आनंदकणुही विरे ।**
**काहींच नुरोनि उरे । जे कांहीं गा ॥** ज्ञा.१८-१००५

**अर्थ :-** ऐक्याचे एकपण ज्याठिकाणी संपते व आत्मदर्शनांत प्रथम होणारा आनंदकण तोहि ज्या ब्रह्मस्वरूपांत विरून जातो व काही न उरता जें काही शिल्लक असते. म्हणजे असणे व नसणे या दोन्ही सापेक्ष धर्म विरहीत शुद्ध असणे हें ब्रह्माचे स्वरूप आहे.

**मग आगीं लागलिया कापूरा । ना काजळी ना वैश्वानरा ।**
**उरणें नाहीं वीरा । जयापरी ॥** ज्ञा.१५-४३९

**अर्थ :-** कापूराला अग्नी लावला असता ज्याप्रमाणे काजळी अथवा अग्नी (काहीच) उरत नाही, त्याप्रमाणे संपूर्ण अविद्येला नाहीसे करणारे जें ज्ञान तें देखील नाहीसे होते.

त्याप्रमाणे 'मी देह' हें अज्ञान नाहीसे झाल्यावर 'मी ब्रह्म' हें ज्ञानहि उरत नाही.

**कापुराची वाती उजळली ज्योती । ठायींच समाप्ती झाली जैसी ॥**



मग जेथे कांहीं नाही तर तेथे शून्य तरी असेल ? परंतु तसे नाही. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**शून्य सिद्धांत बोधु । कोणे सत्ता होय सिद्धु ।**
**नसतां हा अपवादु । वस्तूसी जो ॥** अमृ.४-२७

**अर्थ :-** "सर्वं शून्यं शून्यं" असा शून्यवादाचा जो सिद्धांत आहे त्या सिद्धांताचे ज्ञान कोणाच्या सत्तेवर होते ? शून्यत्व हा वस्तूवर खोटा आरोप आहे.

**सोऽहं तेही अस्तवलें । जेथ सांगतेचि सांगणे जाले ।**
**द्रष्टत्वेंसीं गेले । दृश्य जेथ ॥** ज्ञा.१५-५४१

**अर्थ :-** ज्याठिकाणी मी ब्रह्म अशी समजूत देखील मावळली, ज्या स्वरूपी सांगणाराच सांगणे झाला व जेथे दृश्य ही कल्पना द्रष्टा या कल्पनेसह नाहीशी झाली.

**आगीं पोतासाचेनि मिसे । आपणपें जाळिले जैसे ।**
**ज्ञानाज्ञान नाशे । तैसें जहाले ॥** अमृ. ४-५

**अर्थ :-** कापूरास जाळण्याच्या निमित्ताने अग्नी स्वतःसच जसा जाळून घेतो, त्याप्रमाणे अज्ञानाचा नाश करण्याच्या निमित्ताने ज्ञान आपलाहि नाश करून घेते.

अग्नी-कापूराचा परस्परनाशाचा व्यवहार झाल्यानंतर उभयातीत साक्षी आकाशमात्र उरते. (कारण अग्नीकापूराचा नाशव्यवहार आकाशांत झाला व तें दोन्ही नाहीसे झाल्यावर आकाश उरते.) त्याप्रमाणे ज्ञान व अज्ञान दोन्ही नाहींसे झाल्यावर शेवटी ब्रह्म तेवढेच शिल्लक राहते.

जें उरले तें ब्रह्म त्याचा बोध साधु साधकास करतात.

**साधुबोध झाला तो नुरोनिया ठेला । ठायींच मुराला अनुभव ॥**

**मोक्षरेखे आला भाग्यें विनटला । साधूंचा अंकिला हरिभक्त ॥**

परंतु हा मोक्ष बंधसापेक्ष मोक्ष नव्हे, तर

**किंबहुना ऐसैसें । मुक्तकैवल्यसुदिवसें ।**
**सदा लाहिजे कां प्रकाशें । जयाचेनि ॥** ज्ञा.१६-१३

**अर्थ :-** फार काय सांगावे ! ज्याच्या (श्रीगुरुसूर्याच्या) प्रकाशानें अशा अशाप्रकारे मुक्तकैवल्य (केवलस्वरूपभाव) रूपी उत्तम दिवस सदा प्राप्त होतो.

**यया ब्रह्मत्वासिची सार्थी । सायुज्य ऐसी व्यवस्था ।**
**या नांवें चौथा । पुरुषार्थ गा ॥** ज्ञा.१४-४०१

**अर्थ :-** अर्जुना, या ब्रह्मतत्त्वालाच सायुज्य असे म्हणतात व चौथा पुरुषार्थ यालाच नांव आहे. अशा प्रकारचे ज्ञान प्राप्त होणे हेच भाग्य होय.

**ज्ञानाचा डोळा डोळसा - । माजी डोळसु तो वीरेशा ।**
**हें स्तुती नव्हे बहुवसा । भाग्याचा तो ॥** ज्ञा.१३-१०६७

**अर्थ :-** अर्जुना, ज्ञानाच्या दृष्टीने जे चांगले डोळस आहेत, त्यांच्यामध्ये तो डोळस आहे. ही त्याची स्तुती नसून तो भाग्यवान आहे.

**तुका म्हणे भाग्य या नांवें म्हणिजे ।**
**संसारी जन्मीजे याचिलागीं ॥** तु. म. ४०२७

**अर्थ :-** अशी जीवदशा नष्ट होऊन ब्रह्मस्थिति प्राप्त होणे यालाच खरे भाग्य म्हणतात व ह्याकरिताच मनुष्याने संसारांत जन्म घ्यावा.

ज्ञानेश्वर महाराज सांगतात कीं, संतसंगतीने मला हाच लाभ झाला.

**ज्ञानदेवा गोडी संगती सज्जनीं । हरि दिसे जनीं वनीं आत्मतत्त्वी ॥**

आतां जिकडे तिकडे आम्हीच (हरीच आहे) आहोत असे आम्हाला दिसते.



**आणि पूर्ण अहंता वेठलो । सैंघ आम्हीच दाटलो ।**
**मा लोपलो ना प्रगटलो । कोण्हा होऊनि ॥** अमृ.१०-१५

**अर्थ :-** आम्ही पूर्ण स्थितीला प्राप्त झालो आहोत. जे पूर्णब्रह्मस्वरूप त्या बोधाने आम्ही जिकडे तिकडे घनदाट भरलो आहोत. आम्ही कोणाला लोपलो नाहीत, किंवा प्रगटलोहि नाहीत.

**तैसें आमुचेनि नांवें । अज्ञानाचें ज्ञानही नव्हें ।**
**आम्हालागीं गुरुदेवें । आम्हीच केलो ॥** अमृ.८-१

**अर्थ :-** अज्ञानाचा अभाव सिद्ध झाल्यानंतर अज्ञान सापेक्ष ज्ञान कल्पनाहि आमच्या आत्मस्वरूपी नाही, अशा या अज्ञान वृत्तिशून्य, नित्यज्ञानारूप आत्मभावाच्या ठिकाणी श्रीगुरु निवृत्तिदेवांनी आमची स्थापना केली.

वरील दोन्ही ओव्यांमध्ये ज्ञानेश्वर म. त्यांची सद्गुरु बोधाने झालेली स्थिती सांगतात. म्हणजे या स्थितीत येण्यासाठी श्रीगुरूंच्या बोधाची नितांत गरज आहे. तु. महाराजहि स्वानुभव निवेदन करतात

**येणें बोधें आम्ही असो सर्वकाळ । करूं हें निर्मळ हरिकथा ॥** तु. म.२०९२

**अर्थ :-** आम्ही या (वर उल्लेखिलेल्या) बोधाने सर्वकाळ राहून नेहमी निर्मळ हरिकथा करू. तात्पर्य, संतांच्या संगतीनें साधक शुद्ध ब्रह्मस्थितीला नक्कीच प्राप्त होतो यांत संशय नाही. पण यासाठी संतांचा (सद्गुरूंचा) बोध आवश्यक आहे. बोधासाठी सद्गुरूंची कृपा संपादन करणे गरजेचे आहे आणि ती कृपा जर मिळवायची असेल तर सद्गुरूंनी, संतांना अत्यंत आवडणारे जे हरीचे नामस्मरण तें अखंड केले पाहिजे तेव्हांच या अलभ्य लाभाची प्राप्ती होते.

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥**

**- समाप्त -**

## अभंग सातवा

**पर्वताप्रमाणें पातक करणे ।**
**वज्रलेप होणें अभक्तांसी ।। १ ।।**
**नाहीं ज्यासी भक्ति तो पतित अभक्त ।**
**हरिसी न भजत दैवहत ।। २ ।।**
**अनंत वाचाळ बरळती बरळ ।**
**त्यां कैसेनि गोपाळ पावे हरी ।। ३ ।।**
**ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान ।**
**सर्वांघटीं पूर्ण एक नांदे ।। ४ ।।**

**अर्थ :** - ज्यांनी पर्वतांसारखीं मोठमोठीं पातकें केली असून जे हरिविषयीच्या आत्यंतिक प्रेमरूपी भक्तिविषयी विन्मुख आहेत, म्हणजे जें अभक्त आहेत. त्यांचे तें पातक कोणत्याहि अन्य उपायांनी नाहीसे होत नाहीं. ।। १ ।। ज्याला हरीची प्रेमलक्षणा भक्ति नाहीं तो पतित (पातकानें अधोगतीत सांपडलेला) अभक्त आहे. तो करंटा हरीचे भजन कसे करील ? ।। २ ।। जे वायफळ बडबड करणारे झोपेत बरळल्याप्रमाणे अमर्याद बडबड करतात असल्यांना गोपाळ हरि कसा प्राप्त होईल ? ।। ३ ।। ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, सर्व देहांमध्ये एक परिपूर्ण असणारा आत्मा हाच कोणी ठेवा मला मान्य आहे; हाच माझे सर्वस्व आहे.।। ४ ।।

### विवरण :

**पर्वताप्रमाणें पातक करणे । वज्रलेप होणे अभक्तांसी ।।**

प्रस्तुत अभंगामध्ये ज्ञानेश्वर महाराज सांगतात कीं, मोठा घोर पातकी





का असेना पण साधूंच्या संगतीत उद्धरून जातो. तुकाराम महाराज म्हणतात **पुनीत केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ।। १ ।।** तु. म.२२३७

**अर्थ :** - विष्णुदासांनी आपल्या संगतीने अनेक पातक्यांना पवित्र करून पातकांपासून मुक्त केले.

**निमिषार्ध संतसंगती । वास वैकुंठीं कल्पांतीं ।**
**मोक्षपदें येती । तें विश्रांती बापुडी ।।** तु. म. २३२२

**अर्थ :** - वैकुंठात कल्पांतापर्यंत राहण्यांत जे सुख प्राप्त होते; तें सुख ज्याला अर्धा निमिष संतसंगती घडली आहे, त्याला मिळतें इतकेच नव्हे तर संतसंग करणाराचे ठिकाणी सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता ह्या चारहि मुक्ति दीन होऊन विश्रांतीस येतात.

उदा. - पावरी बाबा उर्फ पवनहारी बाबांच्या आश्रमामध्ये चोरी करण्याच्या हेतूने गेलेल्या चोरांस पावरी बाबांनी स्वहस्ते प्रेमाने जेऊं घातले. त्यांच्या किंचितमात्र स्पर्शाने त्याला वैराग्य प्राप्त झाले. नंतर तो हिमालयात तपश्चर्येसाठी गेला. खूप तप झाल्यानंतर तो ब्रह्मानंदांत लीन होत असे. एकदा त्याची आणि स्वामी विवेकानंदांची भेट झाली. तेव्हां विवेकानंदांनी त्यास विचारले कीं, तुम्ही या ब्रह्मानंदाचा प्रचार का करीत नाहीं. त्यावर तो म्हणाला, कीं आम्ही ठरविले तर तुमच्यासारखे हजारो विवेकानंद निर्माण करूं शकतो. हे ऐकून विवेकानंदांना आश्चर्य वाटले. त्यांनी विचारले, ''आपण कोण आहांत.'' तेव्हां तो म्हणाला, ''मीच तो पवनहारी बाबांच्या आश्रमात चोरी करण्याच्या हेतूने गेलेला चोर. परंतु त्यांच्या निमिषमात्र संगतीने माझी ही पूर्णावस्था झाली आहे. माझ्या बुद्धीत पालट होऊन मी या मार्गाप्रत येण्यास ही सत्संगतीच कारण आहे.'' हा साधूंच्या क्षणमात्र संगतीचा (प्रताप =) महिमा आहे.

**जयाचें नांव तीर्थरावो । दर्शनें प्रशस्तीसि ठावो ।**
**जयाचेनि संगें ब्रह्मभावो । भ्रांतासी ।।** ज्ञा.६-१०२

**अर्थ :** - ज्याचे नांव तीर्थराज आहे व ज्याचे दर्शन घेतले असता समाधान होते व ज्याचे संगतीने भ्रमलेल्या जीवास ब्रह्मता मिळते.

प्रस्तुत हरिपाठाच्या मागील सहाव्या अभंगात ज्ञानेश्वर महाराज सांगतात - **साधूंचे संगती तरणोपाय ।** वाल्मिक महर्षींना नारदांची संगती ही अशीच कांहीं क्षण लाभली. पण तेवढ्यानेच तें किती मोठ्या अधिकाराला प्राप्त झाले. ही कथा सर्वपरिचित आहेच. अमृतानुभवामध्ये संतसंगतीचे महात्म्य सांगताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**जयाचेनि सांवाये । जीवु ब्रह्म उपर लाहे ।**
**ब्रह्म तृणातळी जाये । उदासें जेणे ।।** अमृ.२-१६

**अर्थ :** - ज्या सद्‌गुरूंच्या कृपेच्या सहाय्याने म्हणजेच सद्‌गुरु त्याचा अनुग्रह करतील तर, जेथे ब्रह्मसंज्ञेचा व्यवहार होत नाही; असे ज्ञानमात्र निर्विषय ब्रह्म ते तो होतो. परंतु ते जर उदास असतील म्हणजेच त्यांची कृपा नसली तर तो जीव तृणापेक्षाहि हीन दर्जाला पोहोचतो.

मागील अभंगामध्ये अखंड हरिनामस्मरण करणाऱ्या भक्तांची काय स्थिती होते, हे सांगितले. आतां प्रस्तुत अभंगात हरिभजन विमुख अभक्तांची करुणास्पद स्थिती सांगतात.

अभक्ताचे लक्षण व त्याच्या अभक्तीचे फळ हे प्रथम चरणांत सांगितले आहे. अभक्त हा मोठमोठी पर्वतप्राय पापें करतो. हे त्याचे लक्षण व ती पापें वज्रलेप होतात; म्हणजे कधीच नष्ट होत नाहीत. हे अभक्तीचे फल आहे.

पर्वताप्रमाणे पातके करणे म्हणजे काय ? तर पंचमहापातके सांगितली आहेत.



**ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं गुर्वींगना गमः ।**
**महंति पातकान्याहुः तत्संसर्गश्च पंचमः ।।**

पहिली चार पातके तर महाभयंकर आहेतच, परंतु त्यांच्या संगतीत राहणारा सुद्धा तितकाच महापातकी मानला जातो.

तुकाराम महाराज दुर्जनांच्या संगतीचा परिणाम सांगतात

**बैसतां चोरापाशी तैसी होय बुद्धि ।**
**देखतांचि चिंधी मन धांवे ।।** तु.म.३१५९

म्हणून साधकाने शिश्नोदर परायणाच्या संगतीत राहूं नये.

**रसनाशिश्नाचे अंकित । तुका म्हणे वरदळ स्फीत ।।** तु. म. २८३३

अर्थ : - तुकाराम महाराज म्हणतात, जे केवळ रसना - शिश्नाचे अंकित झाले आहेत; अशा गुरूंचे परमार्थदृश्य हे (वरदळ =) बाह्यात्कारी असून केवळ (स्फीत =) कीर्तिकरिता आहे.

रसना आणि शिश्न ज्यांच्या ताब्यात नाहीं तें केवळ उदर भरण्याकरिताच राहिलेले आहेत. त्यांची संगती करू नये. एकनाथ महाराज सांगतात -

**स्त्रीसंगाच्या मोहमदा । सुटका आहे यदाकदा । परी स्त्रैणसंगतीची बाधा । ते आपदा अनिवार ।।** ए. भा.१४-३७६

**अर्थ :** - स्त्रीच्या संगतीने प्राप्त होणाऱ्या मोहमदापासून कदाचित् पुरुषाची सुटका होईल, परंतु स्त्रीलंपट पुरुषाच्या संगतीची जी बाधा असते ती केवळ अनिवार असते.

**चुडाला स्त्रियेचे संगतीं । तरला शिखिध्वज भूपती । नातरी मदालसेचे संगती । तरला नृपती कुवलयाश्व ।।** ए.म.भा.१४-३७७

अर्थ : - चुडाला स्त्रीच्या संगतीने शिखिध्वज राजा व मदालसेच्या संगतीने कुवलयाश्व राजा तरून गेल्याचे उदाहरण आहे.

अशा प्रकारचा मोठा महापातकी कां असेना पण त्याला जर पापाचा अनुताप झाला तर तो भगवन्नामाने पवित्र होतो.

**तुका म्हणे महापातकीं पतित । ऐसियाचे हित हेळा मात्रे ॥** तु. म.८०१

अर्थ : - तुकाराम महाराज म्हणतात, अशाप्रकारे कोणी जर महापातकी पतित असतील, तर नंतर नामाने त्यांचे हित हेळमात्रे म्हणजे एका क्षणांत होईल.

परंतु या अभंगात निर्देशिलेला मनुष्य हा अभक्त आहे. सारखी पापें करणारा आहे. भक्ती न करणारा आहे. **पर्वताप्रमाणे पातक करणे । वज्रलेप होणे अभक्तांसि ॥ १ ॥** ह्याची पापें वज्रलेपाप्रमाणे कायमची आहेत. याला भक्ती आवडत नाहीं. तो म्हणतो, ईश्वर कोठला ? धर्म कोठून आणला ? हे सर्व थोतांड आहे.

**म्हणे ईश्वरातें खायें । तया वेदा विष सूयें ।**
**गौरवामार्जी त्राये । भंगीत असे ॥** ज्ञा. १६-२३३

अर्थ : - तो म्हणतो, मी ईश्वराला खाईन, त्या वेदाला विष घालीन, आपला मोठेपणा मिरविण्यात तो आपले बळ खर्च करतो.

**गांवींचे देवळेश्वर । नियामकचि होती साचार ।**
**तरी देशींचे डोंगर । उगे कां असती ॥** ज्ञा.१८-५७०

**अर्थ :** - गांवातील देवाळांतले देव, तेच जर खरोखर सृष्टीचें नियामक असतील तर देशातले डोंगर गुपचूप कां राहतील ?

**जेणें चैतन्या ईश्वरा ब्रह्मा । देहचि केलें परमसीमा ।**
**तया आत्मा कर्ता हे प्रमा । अलोट उपजे ॥** ज्ञा. १८-३८२



अर्थ : - ज्याने चैतन्य, ईश्वर आणि ब्रह्म यांना केवळ देहाच्याच मर्यादित आनून ठेविले तो देहच आत्मा व कर्ता आहे अशी दृढ समजूत करून घेतो. त्याचे मत असे असते कीं -

**जीव तोचि देव । भोजन ते भक्ति ।**
**मरण तेचि मुक्ति । पाषांड्याची ॥** तु. म.२८४२

अर्थ : - असे नास्तिक हे जीव ( देह ) हाच देव मानतात आणि भोजनादिकांचे सेवन हीच भक्ती मानतात. तसेच मरणास मुक्ती असे समजतात.

**जे देहखंडा नाम आत्मा । ईश्वर पाषाणप्रतिमा ।**
**ययापरौती प्रमा । ढळों नेणे ॥** ज्ञा.१८-५६७

अर्थ : - कारण हा साडेतीन हाताचा देह म्हणजेच आत्मा व पाषाणाची मूर्ति हाच ईश्वर यापलीकडे तामस ज्ञानाची समजूत जात नाहीं.

मग देवाचे भजन, प्रार्थना वैगरे तो कशाला करील ? ईश्वराचे नामसुद्धा ऐकायला तो तयार होत नाहीं. म्हणून ज्ञानेश्वर महाराज अशांना 'पतित अभक्त' म्हणतात -

**नाही ज्यांसी भक्ति ते पतित अभक्त । हरिसी न भजत दैवहत ॥ २ ॥**

असे भक्त कोण तर ज्याला भक्तीची चाड नाहीं, जो दुर्दैवी मनुष्य हरीचे भजन करीत नाही, तो अभक्त समजावा. उदा - एखाद्या रोगग्रस्त मनुष्यास वैद्याने सांगितले कीं, कुपथ्य करूं नको, पण तो कांहीं ऐकत नाहीं. कुपथ्य केल्याशिवाय राहत नाहीं. असा कुपथ्य करणारा रोगी जगणे अशक्य आहे. त्याचप्रमाणे अभक्ताचा उद्धार होणे अशक्य आहे. म्हणून ज्ञानेश्वर महाराज त्याला दैवहत म्हणजे दुर्दैवी म्हणतात. कांहीं ठिकाणी त्यास करंटा म्हटले आहे.

**करंटे कपाळ ज्याचे नाम नये वाचे । रामकृष्ण वासुदेव सदास्मरे वाचे ॥**

साधुसंतांना जीवाविषयी फार कळकळ असते.

**केलें होतें याचि जन्में । अवघें विठोबाच्या नामें ।**
**तुका म्हणे वर्मे । जाणोनियां तरती ॥** तु. म.२४५९

**अर्थ :** - तुकाराम महाराज म्हणतात, अरे या मनुष्यजन्मामध्येच विठोबाच्या नामचिंतनाने जे केले तें सर्व पूर्ण होईल. म्हणून हे वर्म जाणून जे वागतील तेच तरतील.

**नरदेह निधान लागलें हातीं । उत्तम सार उत्तम गती ।**
**देवचि होईन म्हणती ते होती । तरि कां चित्तीं न धरावें ॥** तु. म. ७१८

**अर्थ :** - नरदेहरूपी साधनाचा ठेवा हस्तगत झाला आहे; तो उत्तम सारभूत आहे व परलोकी उत्तम गती देणारा आहे व मी देव होईन असे कोणी या देहांत म्हटले आणि त्याने श्रीहरीची योग्य भक्ती केली तर तो देवच होईल.

असे जर आहे तर मग श्रीहरीच्या प्राप्तीकरिता तशी चित्तांत दृढता धरून, प्रेम धरून प्रयत्न कां करूं नये ?

**हे चोविसांही तत्त्वांचें । कुटुंब घर वस्तीचें ।**
**तुटे बंधमोक्षाचें । गुंतलें येथ ॥** ज्ञा. १८-३१९

**अर्थ :** - चोवीसहि तत्त्वरूपी कुटुंबाचे राहण्याचे देह हे घर आहे आणि या देहांत बंधमोक्षाची गुंतागुंत उलगडली जाते.

**आतां उघडी डोळें । जरी अद्यापि न कळें ।**
**तरी मातेचिया खोळे । दगड आला पोटासी ॥** तु. म.२६६१

**अर्थ :** - अरे, मागे चौऱ्यांशी लक्ष योनीत, पशुपक्ष्यांच्या जन्मात



अज्ञानामुळे डोळे उघडणे शक्य नव्हते. परंतु आतां तूं नरदेहांत आत्मज्ञानाचे डोळे उघण्याची वेळ आली आहे. तरी तूं डोळे उघड. मरण जवळ आले तरी अजूनपर्यंत तुला कांहीं कळले नाहीं तर मला असे वाटते कीं, तूं खरोखरच आईच्या खोळीतून दगड जन्माला आलास.

या नरदेहामध्ये इतकी सर्वांगसुंदर नरतनू प्राप्त होऊन देखील त्याचा लोक वाईट उपयोग करतात म्हणूनच त्यांना 'करंटे' म्हटले आहे.

**दुर्लभो मानुषो देहो देहिनां क्षणभंगुरः ।**
**तत्रापि दुर्लभंमन्ये वैकुंठप्रियदर्शनम् ।** ए. भा. २-२९

**अर्थ :** - प्राणिमात्रांचा देह क्षणभंगूर असून त्यातून मनुष्य देह जीवाला दुर्लभ आहे. त्यातहि भगवंताला प्रिय असणाऱ्या भक्ताचे दर्शन-भेट होणे दुर्लभ आहे.

परंतु हा दैवहत मनुष्य फुटक्या कपाळाचा असतो. श्रद्धाहीन असतो.

**अश्रद्धधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥** गी.९-३

**अर्थ :** - भगवान सांगतात, हे शत्रुतापना (अर्जुना) या (आत्मज्ञानरूपी) धर्मावर श्रद्धा न ठेवणारे पुरुष माझी प्राप्ती न होता मृत्युरूप संसाराच्या मार्गावर परत येतात.

**एऱ्हवीं मी तरी कैसा । मुखाप्रति भानु कां जैसा ।**
**कहीं नसे न दिसे ऐसा । वाणीचा नव्हें ॥** ज्ञा.९-६३

**अर्थ :** - तसे पाहिले तर मी कसा ( सुलभ ) आहे ? तर तोंडासमोर जसा सूर्य तसा मी सर्वांना सदा समोर आहे. पण तो सूर्य केव्हां केव्हा रात्री अथवा दिवसा दिसत नाही. असा कमीपणा त्याच्यात आहे. परंतु तो कमीपणा माझ्यांत नाहीं.

जवळी असता जगर्जीवन । कां धांडोळिसी वन ।
एकाग्र करी मन । तेणे होईल समाधान रे ।। ज्ञा. म.

माणसे दिवसभर संसाराच्या गोष्टी बोलतात पण देवाचे नामस्मरण करीत नाहीत. त्यांना नाथ महाराज म्हणतात -

**हरिनाम सांडोनि करंटीं । मिथ्या करिताती चावटी ।**
**जेवी हगवणी पिटपिटी । तैशा गोठी जल्पती ।।** ए. भा. १९-१२२०

**अर्थ :** - करंटी माणसे हरीचे नाम सोडून देऊन वायफळ चकाट्या पिटतात. ज्याप्रमाणे हगवणीची पिरपिर असते तशाच गोष्टी ते बडबडतात; असे [illegible].

विषयी लोक तर नरकाला जातातच परंतु लोभाने परमार्थ करणारेहि नरकाला जातात.

**पन्नासअक्षरी करिसी भरोवरी । शेखी तुझें तोंड तुज वैरी रया ।** ज्ञा. म.

परमार्थाव्यतिरिक्त वायफळ विषयासक्त बडबड करणाऱ्यांना कधीच हरीची भेट होणार नाहीं हेच तृतीय चरणात सांगतात.

**अनंत वाचाळ बरळती बरळ । त्या कैसेनि गोपाळ पावे हरि ॥**
**बोले अबोलणें बोलें । जागें बाहेर आंत निजेलें ।**
**कैसें घरात घरकुल केले । नेणो अंधार ना उजेडलें गा ।।** तु.म.३३८

**अर्थ :** - कांहीं अज्ञानी मुखाने अनिर्वाच्य शब्दांच्या गोष्टी सांगतात. (कांहीं शब्दज्ञानी बोलण्याचा विषय नसलेल्या ब्रह्मसंबंधाने पुष्कळ बोलतात.) पण ते बाहेर सावध आहेत, अंतरांत मात्र झोपलेले आहेत. असे त्यांनी जगत्‌रूपी घरांत घरकुल केले आहे. मग त्यांच्या ठिकाणी अंधार आहे कीं प्रकाश आहे हे कळत नाहीं.

आत्मानुभवाशिवाय मनुष्य मुक्त होत नाहीं. पण ज्यांना आत्मानुभव नसतो ते नुसती बडबडच करतात.



**एक परि बहिरे बरे । परी तीं ढोरें ग्यानगंडें ।।** तु. म.३८३

**अर्थ :** - एका दृष्टीने बहिरी, मुकी असलेली माणसे बरी परंतु ग्यानगंडे म्हणजे ज्ञानाभिमानी माणसें केवळ पशूच ( अव्हा सव्हा वागत असतात ) असतात.

तुकाराम महाराज म्हणतात, नुसती कोरडी बडबड नको. त्यामध्ये कांहीं ओलावा पाहिजे. ज्याप्रमाणे एखाद्या झाडाला फळे कमी पण पानेच जास्त असावीत. त्याप्रमाणे यांच्या बडबडण्याने लोक उद्धरतील पण हा नरकाला जाईल.

**जेवीं गुळ उसांचा घाणा । तोंडाचा रसु भरे भाणा ।**
**शब्द चोपटें भरोनि वदना । परिभ्रमणा करकरितु ।।** ए.भा.३-२८१

**अर्थ :** - गुळ करण्याकरिता घातलेला उसाचा घाणा ज्याप्रमाणे तोंडातला रस खालच्या भांड्यामध्ये भरीत असतो आणि आपण चिपाडे तोंडात घेऊन करकर करीत फिरत राहतो.

**ऐसा जो कां शब्दज्ञानी । उत्तम व्याख्याता ज्ञानगुणीं ।**
**तो जन रंजवी निरूपणीं । स्वयें कोरडेपणीं करकरितु ।।** ए.भा.३-२८२

**अर्थ :** - त्याप्रमाणें केवळ ( शब्दज्ञानी = शब्दपांडित्य ) हा ज्ञानाच्या निरुपणांत उत्तम व्याख्याता असतो; तो आपल्या वक्तृत्वाने लोकांचे मनोरंजन चांगले करतो; पण स्वतः मात्र कोरडाच राहून बडबडत असतो.

**योगक्षेम चाले गोमटा । लौकिकीं थोर प्रतिष्ठा ।**
**तेथें निजप्राप्तीची उत्कंठा । न वचे वरिष्ठा शिष्यांची ।।** ए.भा.३-२८३

**अर्थ :** - त्याचा योगक्षेम यथास्थित चालतो; त्याला लोकांमध्ये हवी

तशी प्रतिष्ठा मिळते. परंतु अशा गुरुकडून वरिष्ठ पातळीच्या शिष्यांची आत्मप्राप्तीची उत्कंठा मात्र पूर्ण होत नाहीं.

मग अशा लोकांना परमात्मा कसा भेटेल ? **त्या कैसेनि गोपाळ पावे हरि ।** ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, कोणाचा कसाहि अनुभव असो; पण माझा असा अनुभव आहे कीं :

**ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान । सर्वांघटीं पूर्ण एक नांदे ॥**

सर्व देहांमध्ये परिपूर्ण असणारा आत्मा हाच कोणी एक निधान म्हणजे ठेवा तोच मला प्रमाण म्हणजे मान्य आहे. हा आत्मा माझे सर्वस्व आहे. हा ठेवा फार जुना आहे.

**जुनाट जुगादिचें नाणें । बहुता काळाचें ठेवणें ।**
**लोपलें होतें पारिखेपणें । ठाव चळणें चुकविला ॥** तु. म. ६८५

**अर्थ :** - हे विठ्ठलरूपी नाणे कित्येक युगाच्या अगोदरचे जुनाट असून ह्याठिकाणीं पुष्कळ दिवसाचा ठेवा असे आहे; पण ते परीक्षकावांचून गुप्त होते. चंचलत्वामुळे तें ठिकाण कोणाला सांपडले नाहीं.

**जैसें डोळ्यां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे ।**
**मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी ॥** ज्ञा.९-२३

**अर्थ :** - ज्याप्रमाणें डोळ्यांना अंजन मिळते त्यावेळी दृष्टी फांकते आणि मग भूमिगत द्रव्याचा सहज सुगावा लागून मोठा खजिना दृष्टीला प्रगट होतो. दैवहीन असेल तर त्याला हे निधान प्राप्त होत नाहीं.

**नातरी निदैवाचा परिवरीं । लोह्या रुतलियां आहाती सहस्रवरी ।**
**परि तेथ बैसोनि उपवासु करी । कां दरिद्रें जिये ॥** ज्ञा.९-५९



**अर्थ :** - दुर्दैवी पुरुषाच्या घरांत हजारो मोहरा पुरलेल्या आहेत, परंतु तो तेथे राहून उपवास काढतो किंवा दारिद्र्यांत जीवन कंठीतो. त्याप्रमाणें या शरीररूपी घरांत देव आहे; पण दैवहीनाला तो दिसत नाहीं, ओळखत नाहीं.

**तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्व सुखाचा आरामु ।**
**कीं भ्रांतासि कामु । विषयावरी ॥** ज्ञा. ९-६०

**अर्थ :** - त्याप्रमाणें सर्व सुखाचा जणू बगीचा असा मी जो राम सर्वांच्या हृदयांत असतांना (त्या मला न जाणून) मूर्ख लोक सुखाकरिता विषयांचीच इच्छा करतात.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मला त्या आत्म्याचा पूर्ण अनुभव आहे. तो सर्व घटरूपी शरीरामध्ये एकरूपाने भरलेला आहे.

**सर्वांघटीं राम देहादेहीं एक । सूर्य प्रकाशक सहस्ररश्मी ॥**

तसेच तुकाराम महाराज म्हणतात -

**भूतीं भगवद्भाव । मात्रासहित जीव ।**
**अद्वैत तो ठाव । निरंजनी एकला ॥** तु. म. ३८३०

**अर्थ :** - यच्चावत् जीवमात्रांसहित सर्व भूतांच्या ठिकाणीं एका परमात्म्याची व्याप्ती आहे; असा भगवद्भाव असावा. निरंजन मायारहित परमात्मा जगाला आधार आहे.

**जनीं वनीं अवघा देव । वासनेचा पुसावा ठाव ।**
**मग वोळगा तो वासुदेव । ऐसा मनीं वसू द्या भाव गा ॥** तु. म.३३९

**अर्थ :** - सर्व जनावनांच्या ठिकाणी व्यापक असा एक देवच आहे; तो पाहण्याकरिता वासना ही समूळ नाहींशी करावी व मग त्या

वासुदेवाला शरण जावे. असा भाव तुम्ही आपल्या मनांत बळकट करा.

**एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा । कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेताः केवलो निर्गुणश्च ॥** श्वेता.उप.६-११

वास्तविक एकच परमात्मा आहे. त्यामध्ये जीव शिव उपाधी कल्पनाभेदानें आली आहे.

**कां कल्पांतींचिया पाणिया । काय वोत भरताती धनंजया।**
**म्हणौनि कैंचें अंश अविक्रिया । एका मज ॥** ज्ञा.१५-३३७

**अर्थ :** - अथवा कल्पांत काळाचे जे आब्रह्मस्तंभापर्यंत उदक असते. त्याचे पाट फुटून प्रवाह वाहतात काय ? एवढ्याकरिता मी जो एक अविकारी त्या मला अंश कोठले ? तात्पर्य, ज्याप्रमाणे हजारो घट असले तरी आकाश एकच त्याप्रमाणें शरीरे अनेक असली तरी शरीरमात्रांत परमात्मा एकच व्यापक आहे आणि अशा व्यापक अनुभूतीवर येण्यासाठी भगवन्नामाची आवडीने जोडी करणे आवश्यक आहे. म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज आपल्या दयार्द्र अंतःकरणाने सर्वांना कळकळीनें उपदेश करतात -

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।**
**पुण्याची गणना कोण करी ॥ धृ ॥**

**- समाप्त -**

✻ ✻ ✻

## ✻ अभंग आठवा ✻

**संतांचे संगती मनोमार्ग गती ।**
**आकळावा श्रीपती येणे पंथें ॥ १ ॥**
**रामकृष्ण वाचा भाव हा जीवाचा ।**
**आत्मा जो शिवाचा रामजप ॥ २ ॥**
**एकतत्त्वनाम साधिती साधन ।**
**द्वैताचे बंधन न बाधिजे ॥ ३ ॥**
**नामामृतगोडी वैष्णवा लाधलीं ।**
**योगियां साधली जीवनकळा ॥ ४ ॥**
**सत्त्वर उच्चार प्रल्हादी बिंबला ।**
**उद्धवां लाधला कृष्णदाता ॥ ५ ॥**
**ज्ञानदेव म्हणे नाम हें सुलभ ।**
**सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे ॥ ६ ॥**

**अर्थ :-** आपल्या मनोवृत्तीची धाव संतांच्या संगतीकडे लाव व या साधनाने तूं लक्ष्मीपतीस वश करून घे, म्हणजे संत ज्याप्रमाणे सांगतील त्याप्रमाणे ती गोष्ट मनावर धरून देहाने व मनाने तसे वाग. हरीला वश करून घेण्याचे साधन हेच होय. ॥ १ ॥ वाचेनें निरंतर रामकृष्ण नामाचा जप करणे हाच जीवाचा धर्म होय. रामजप हा मायोपाधिक शिवाचाहि आत्मा आहे. अर्थात् जीवानें त्याचे भजन करणे आवश्यच आहे. ॥ २ ॥ एक तत्त्व जो हरि त्यास त्याच्या नामरूपी साधनाने जे कोणी प्राप्त करून घेतात, त्यांना 'मी' आणि 'तूं' इत्यादिक द्वैतबंधनाची बाधा होत नाहीं. ॥ ३ ॥ योग्यांना सतराव्या जीवनकलेच्या प्राप्तीमध्ये जे सुख व जी आवड आहे, तेच सुख व तीच आवड वैष्णवांना हरीच्या नामामृतसेवनामध्ये आहे.

॥ ४ ॥ बाळपणीच प्रल्हादाच्या जिव्हेवर हरीच्या नामाचा उच्चार ठसला तसेच कृष्णासारखा उदार ज्ञानदाता उद्धवाला मिळाला. ॥ ५ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरीचे नाम सर्व पारमार्थिक साधनांत सोपे आहे. पण तें सर्व मनुष्यांना दुर्मिळ झाले आहे. कारण, हरीचे नाम कोणी घेत नाहीं. त्याची सुलभता व योग्यता जाणून तें नाम सदोदित घेणारा पुरुष क्वचितच आढळून येतो. ॥ ६ ॥

विवरण :

**संतांचे संगती मनोमार्ग गती । आकळावा श्रीपती येणे पंथें ॥**

मागील अभंगामध्ये संतसंग न करणारा जो अभक्त त्याचे वर्णन केले आहे. बहुतेक लोक विकारीच असतात. परंतु ज्याच्या अंतःकरणांत विकाराला जागाच नाहीं असा ज्ञानेश्वर महाराजांसारखा एखादा विरळाच असतो. तुकाराम महाराज म्हणतात -

**रात्री दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग ।**
**अंतर्बाह्य जग आणि मन ॥** तु. म. १८८५

**अर्थ :-** रात्रंदिवस आंत मन आवरण्याचा व बाहेर उपद्रवी जग यांच्याबरोबर आम्हाला युद्ध करण्याचा प्रसंग आहे.

अशा पुरुषालाहि संतसंगतीची जोड पाहिजे. कुसंगतीने अंतःकरणातील विकार वाढतात.

**पतन उद्धार संगाचा महिमा ।**
**त्यजावें अधमा संत सेवीं ॥** तु. म. ७६

**अर्थ :-** पतन व उद्धार हा संगतीचा महिमा आहे. ( अधमाच्या संगतीत पतन होते व संतसंगतीत उद्धार होतो. ) म्हणून अधमाचा त्याग करून संताची सेवा करावी.



नारद भक्तिसूत्रामध्ये तीन गोष्टींचा सर्वथैव त्याग करावयास सांगितला आहे. १) स्त्री २) धन आणि ३) नास्तिक चरित्र श्रवण.

**स्त्रीधन नास्तिक चरित्रं न श्रवणीयम् ।** अशा प्रकारच्या दुःसंगतीचा पापी मनुष्य जरी असला तरी त्याने संतसंगती करावी हे प्रस्तुत अभंगाच्या प्रथम चरणांत सांगितले आहे.

**संतांचे संगती मनोमार्ग गती । आकळावा श्रीपती येणे पंथें ॥ १ ॥**

या अभंगात ज्ञानेश्वर महाराज हरिभक्ति करणाऱ्या थोर भक्तांचे दाखले देऊन सांगतात कीं, संतसंगतीने मनुष्य सन्मार्गाला लागतो.

**संतसंग धरा तुम्ही हरिभजन करा ।**
**पाठी लागलासे काळ दात खातो करकरा ॥** ज्ञा. म.

**संतसमागमीं धरूनि आवडी । करावी तांतडी परमार्थी ॥** तु.म.३६४१

अर्थ :- संतांच्या संगतीविषयी प्रीति धरून परमार्थ साध्य करून घेण्याची त्वरा करावी.

आतां, संतसंगतीत राहून नेमके काय करावे ? गुरूला मठमठिकांसाठी द्रव्य जमा करून द्यावे ? कीं संतांच्या सोबत सतत मिष्टान्न भोग घेत रहावा ? तर असे नाहीं. हे संत संगतीचे खरे लक्षण नव्हे व फलहि नव्हे. याने तर उलट अधोगतीच होईल. संतसंगतीचे ढोबळमानाने तीन फायदे सांगितले जातात.

**संतसंगतमो तीन गुण है, हर कोई लागत पांव ।**
**खानेको मिष्टान्न मिले, फिर वैकुंठहि जाव ॥**

परंतु या गोष्टी घडल्या म्हणजे उद्धार नव्हे. (सत्य संतांच्या

नुसत्या संगतीने मनुष्याचा उद्धार होतो.) त्याला कांहीं विशेष प्रयत्न करावा लागत नाहीं. अंतःकरणांतील विकारहि आपोआप जातात.

**नातरी नगरांतरीं वसिजे । तरि नागरचि होईजे ।**
**तैसें व्यासोक्तितेजें । धवळित सकळ ॥ ज्ञा.१-४१**

अर्थ :- शहरांत राहिल्याने जसा मनुष्य चाणाक्षच ( हुशार ) होतो, त्याप्रमाणे व्यासांच्या वाणीतील तेजाने सर्व गोष्टी स्पष्ट ( उज्ज्वल ) झाल्या आहेत. उदा. शहरातील उनाड मुले खेडेगांवातील हुशार मुलापेक्षाहि चाणाक्ष असतात, त्याप्रमाणे संतसंगतीने दुष्ट, चोर, कपटी, लबाड असे विकारी जरी असले, तरी त्यांचे विकार नष्ट होतात आणि त्यांच्या मनाची गती परमात्म्याकडे लागते.

**जेथें वैष्णवांचा वास । धन्य भूमी पुण्य देश ॥** तु. म.२३३३

अर्थ :- जेथे वैष्णवांचा वास आहे, ती भूमी धन्य आहे व तो देश अतिशय पुण्यरूप आहे.

**जेथें वसती हरीचे दास । पुण्य पिके पापा नास ॥** तु. म.२२२०

अर्थ :- ज्या ठिकाणी हरीचे दास राहतात, तेथें पुण्य भरपूर पिकते व पापांचा नाश होतो.

**सहज तया जना छंद । वाचे गोविंद गोविंद ॥** तु. म.२३३३

अर्थ :- वैष्णवांच्या संगतीत राहण्याने लोकांना वाचेने गोविंद, गोविंद म्हणण्याचा छंद आपोआप लागत आहे. संत काय करतात, तर -

**कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामाचे निखळ प्रबंध ।**
**माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥ ज्ञा. ९-२१०**



अर्थ :- ते महात्में कृष्ण, विष्णु, हरि, गोविंद या नामाचेच केवळ कथन करतात व मधूनमधून स्पष्टरितीने पुष्कळ आत्मचर्चा करतात.

**संतांचा उदीम उपदेशाची पेठ । प्रेमसुख साठीं घेती देती ॥** तु. म.२२८८

अर्थ :- संत नेहमी उपदेशरूपी पेठेमध्ये प्रेमसुखाच्या देवघेवीचा ( उदीम ) व्यापार करतात.

**दिनरजनीं हाचि धंदा । गोविंदाचे पवाडे ॥** तु. म.२०२९

अर्थ :- तुकाराम महाराज म्हणतात, रात्रंदिवस गोविंदाची कीर्ति वर्णन करावी हाच एक आम्हाला धंदा आहे.

येथे आळंदीक्षेत्री घडलेली गोष्ट विचारांत घेणे आवश्यक आहे. कांहीं वर्षापूर्वी येथे पंजाबातील शीख समाजाची एक व्यक्ती सहज देशाटनाच्या निमित्ताने आली. काश्मीरसहित संपूर्ण भारतातील रम्य ठिकाणें पाहिलेल्या त्या गृहस्थाला आळंदीचा परिसर अत्यंत आवडला. त्याने आपला मुक्काम आठ दिवस वाढवला. पुढे त्याला ज्ञानेश्वरीची गोडी लागली. मुक्काम वाढत राहिला. ज्ञानेश्वरीचे श्रवण करून त्याने येत नसलेली मराठी भाषा शिकून घेतली.

त्याची ज्ञानेश्वरीची पारायणें सुरु झाली. संतसंगतीत वेळ जाऊ लागला व अनायासेच ज्ञानेश्वरीच्या अंतरंगात त्याचा प्रवेश झाला. पुढे कांहीं दिवसांनी तोच मनुष्य ज्ञानेश्वरीचा एक उत्तम विद्वान वक्ता म्हणून नावारूपास आला. हा आळंदीतील ऐतिहासिक प्रसंग सर्वपरिचित आहे. तात्पर्य, संतांचे संगतीत मनुष्याच्या मनांत इच्छा नसतांनाहि आपोआप पारमार्थिक आचरण घडते व सहज परमार्थ होतो. त्याचा भाव ( धर्म ) वाढतो. म्हणून ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

**रामकृष्ण वाचा भाव हा जीवाचा । आत्मा जो शिवाचा रामजप ॥ २ ॥**

भाव म्हणजे धर्म. कारण जीव अल्पज्ञ असल्यामुळे आपल्या कल्याणाकरिता त्याने नामस्मरण केले पाहिजे. यांत शंका नाहीं. श्री शंकराने नामजप करून तें आत्मा होऊन बसले.

**शिव हलाहले तापला । तो या नामे शितळ जाहला ॥**
**शिवाचे जीवन । जाळी महादोष कीर्तन ॥** तु. म.५३८

**अर्थ :-** कीर्तन हे शिवाचे जीवन असून तें महापातकाला जाळते.

**नाम बरवया बरवंट । नाम पवित्र आणि चोखट ।**
**नामस्मरें नीळकंठ । निजसुखें निवाला ॥** ज्ञा. म.१३२

**जे शंभुनें धरिलें मानसीं । तेंचि उपदेशिलें गिरीजेसी ॥**
**नाम बरवे बरवे । निजमानसी धरावे ॥** ज्ञा.म.१३३

अशाप्रकारें एकतत्त्वरूपी जो हरी त्यास त्याच्या नामरूपी साधनानें जो पाप्त करून घेतो त्यांस 'मी' आणि 'तूं' इत्यादिक द्वैतबंधनाची बाधा होत नाहीं; हेच तृतीय चरणांत सांगितले आहे.

**एकतत्त्व नाम साधिती साधन । द्वैताचे बंधन न बाधिजे ॥ ३ ॥**

द्वैतामध्ये नेहमी दुःख असते.

**आणि दुजे जंव जंव घडे । तंव तंव संसारभय जोडे ।**
**हें देवो आपुलेनि तोंडें । बोलतीं वेदें ॥** ज्ञा.१७-३७६

**अर्थ :-** आणि जसजसे द्वैत उत्पन्न होते, तसतसे संसारभय प्राप्त होते. हे देव स्वतः आपल्या तोंडाने वेदाच्या द्वारे बोलतात. "एकतत्त्व नाम साधिती साधन।" एकतत्त्वी म्हणजे एकरूपी भजनाने जीव हा शिवरूप होतो. मग त्याला काय दिसते ? तर "भरला घनदाट हरि दिसे।" त्याला सर्व चराचरांमध्ये हरीच भरलेला दिसतो.



अशी स्थिती प्राप्त होते. परंतु ही स्थिती कोणाला प्राप्त होते, तर पूर्वी ज्याने साधनें साधले आहेत त्याला.

**नामामृत गोडी वैष्णवां लाधली । योगियां साधली जीवनकळा ॥ ४ ॥**

एका-एका साधनेच्या मार्गाचा एक-एक तज्ञ आहे व त्यांचा अनुभवहि वेगवेगळा आहे. उदा. योग्याचा अनुभव निराळा, ज्ञान्याचा निराळा आणि भक्ताचा मार्गपरत्वे अनुभव निराळा असतो, परंतु या नामामृतापुढे इतर सर्व अनुभव तुच्छ आहेत. प्राकृत अमृत प्राशन करणारें ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा इंद्र मरतात.

**जे काळकूटाचें सहोदर । जें मृत्युभेणें प्याले अमर ।**
**तरी दिहाचे पुरंदर । चौदा जाती ॥** ज्ञा. १०-१९२

**अर्थ :-** जे अमृत काळकूट विपाचे सख्खे भाऊ आहे व जे अमृत मृत्युच्या भितीने देव प्याले तरीसुद्धा ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा इंद्र होऊन मरतात.

**जिये गांवींचा पहारु दिवोवरी । एका अमरेंद्राचें आयुष्य न धरी ।**
**विळोनि पांती उठी एकसिरी । चवदाजणांची ॥** ज्ञा.८-१५५

**अर्थ :-** ज्या सत्यलोकरूपी गांवाच्या प्रहर दिवसपर्यंत एका इंद्राचे आयुष्य टिकत नाहीं. (तर ज्या गांवात) एकसारखी चौदा इंद्रांची पंगत उठते.

**कैसें थोरिवेचें मान पाहें पां । तो सृष्टिबीजाचा साटोपा ।**
**परि पुनरावृत्तीचिया मापा । शीग जाहला ॥** ज्ञा.८-१६६

**अर्थ :-** ब्रह्मदेवाच्या मोठेपणाचे प्रमाण कसे आहे ! पहा कीं, तो सृष्टीरूपी बीजाची साठवण आहे; तरी पण तोहि पुनरावृत्तीच्या मापाला शीग ( टोक ) झाला.

प्राकृत अमृतप्राप्तीला फार कष्ट पडतात. तेव्हां तें मिळते व त्यात विघ्न फार येतात. परंतु हे नामामृत त्या अमृतापेक्षाहि कितीतरी श्रेष्ठ आहे. भगवान श्रीकृष्ण उद्धवाला सांगतात माझे भक्त नामामृत पिऊन कायमचे अमर झालेले आहेत, ते नाथ महाराज सांगतात.

**अमर अमृतपान करिती । तेही शेखीं मरोनी जाती ।**
**माझें कथामृत जे सेविती । ते नागवती कळिकाळा ॥** ए. भा.१९-२१८

**अर्थ** :- स्वर्गीय देव हे अमृतपान करतात, पण ते सुध्दा शेवटी मरण पावतात; परंतु जे माझे कथामृत सेवन करतात, तें कळिकाळाला सुद्धा नागवतात.

**अमर अमृतपान करिती । तें ही मरणार्णवीं बुडती ।**
**उद्धव अक्षयी केला श्रीपती । कथामृतीं निववूनि ॥** ए. भा.२८-७०३

**अर्थ** :- देव (स्वर्गीय) अमृतपान करतात; पण तें सुद्धा मृत्युरूप संसारातच बुडतात. श्रीकृष्णांनी उद्धवाला कथामृताने तृप्त करून अक्षय करून सोडले. नामदेवराय म्हणतात -

**अमृताहूनि गोड नाम तुझे देवा । मन माझे केशवा कां बा नेघे ॥**

**गोड तुझे नाम विठोबा आवडते मज ।**
**दुजे उच्चारिता मना वाटते हें लाज ॥** ज्ञा.म.

**गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं भज प्रेम सर्वकाळ ॥** तु.म.१०६८

भक्तांना भगवन्नामापुढे त्रैलोक्य तुच्छ वाटते.

**हरिचरणीं अपरोक्षस्थिती । तेथील क्षणार्धाची जे प्राप्ती ।**
**त्यापुढें त्रिभुवनविभव संपत्ती । भक्त मानिती तृणप्राय ॥** ए.भा.२-७४८



**अर्थ** :- हरिचरणाच्या ठिकाणी रत असतां त्याच्या क्षणार्धाचा जो लाभ, त्याच्यापुढे हें त्रैलोक्याचे वैभव किंवा संपत्ती भक्तांना तृणप्राय वाटते. फाय काय सांगावें ! नामाचा महिमा स्वतः भगवंतालाहि कळत नाहीं.

**तुझ्या नामाचा महिमा । तुज न कळे मेघश्यामा ।**
**तुका म्हणे आम्हां । जन्म गोड यासाठीं ॥** तु. म. २५४६

**अर्थ** :- तुकाराम महाराज म्हणतात, हे मेघश्यामा तुमच्या नामाचा महिमा स्वतः तुम्हास कळत नाहीं. आम्ही त्याचे सुख पूर्णपणे घेत आहोत. याकरिता आम्हाला जन्म घेणे चांगले वाटते. म्हणून वैष्णवांचे परमात्म्यावर अलोट प्रेम असते.

**वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥ १ ॥**
**नाहीं आणीक प्रमाण । तन धन तृण जन ॥ २ ॥** तु. म. २२६६

**अर्थ** :- ज्याची प्रिती ( प्रेम ) इतर कोणावर नसून एका देवावर आहे तोच एक खरा वैष्णव आहे. ज्याला एक केवळ देवच मान्य असून त्यापेक्षा इतर देह, द्रव्य, लोक इत्यादि तृणवत् आहेत.

म्हणूनच योग्यांना अतिशय कष्टानें प्राप्त केलेल्या सतराव्या जीवनकलेच्या प्राप्तीमध्ये जे सुख मिळते. जी आवड मिळते तेच वैष्णवांना हरीच्या नामामृत सेवनामध्ये मिळते. आतां श्रेष्ठ अशा वैष्णव भक्तांचे उदाहरण देतात.

**सत्वर उच्चार प्रल्हादीं बिंबला । उद्धवा लाधला कृष्णदाता ॥ ५ ॥**

समस्त श्रेष्ठ भक्तांमध्ये श्रेष्ठोत्तम भक्त म्हणून प्रल्हादाला मानले जाते. तसेच नारदांनापण प्रल्हादाच्या समान अधिकार आहे. त्याचे कारण म्हणजे इतर श्रेष्ठ भक्तांना अंतःकरणातील विकारांशी प्रथम युद्ध करावे लागले व नंतर शुद्ध वैष्णवस्थिती प्राप्त झाली, तसे या दोघांचे

नाहीं. कारण हे जन्मतःच मूळचे शुद्ध जन्मले, म्हणजे त्यांच्या अंतःकरणामध्ये विकार उत्पन्न झालेच नाहीत. म्हणून प्रल्हादाने पाठशाळेत असणाऱ्या समवयस्क असूर बालकांनादेखील भागवतधर्माचा उपदेश केला. त्या बालकांना प्रल्हाद सांगतात -

**कौमारे आचरेत्प्राज्ञो धर्मान्भागवतानिह ।**
**दुर्लभं मानुषं जन्मतदप्यध्रुवमर्थदम् ॥** श्रीमद् भा.७-६-१

अर्थ :- ज्ञात्या पुरुषाने कौमार अवस्थेतच भागवत धर्माचे आचरण करावे, सकाम कर्माचे आचरण करू नये. कारण मनुष्यजन्म हा दुर्लभ असून पुरुषार्थप्रद आहे. परंतु अशाश्वत आहे

हिरण्यकश्यपूने जेव्हां विचारले कीं, ''बाळ पाठशाळेत जे तूं शिकलास त्यापैकी तुला जे चांगले अवगत असेल तें म्हणून दाखव पाहूं.'' त्यावर प्रल्हादाने पुढील उत्तर दिले -

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ इति पुंसार्पिता विष्णौ भक्तिश्चेन्नवलक्षणा। क्रियते तन्मयेऽधीतमुत्तमम् ॥** श्रीमद् भा. ७-५-२३-२४

अर्थ :- प्रल्हाद म्हणाले, हे तात्, श्रीविष्णूचे श्रवण, कीर्तन, स्मरण पादसेवन, पूजन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मसमर्पण ह्या नऊ लक्षणांनी युक्त अशी भगवान् विष्णूची केलेली भक्ति ज्या योगाने साक्षात् उत्पन्न होते तेच उत्तम अध्ययन असे मी समजतो. असे उत्तर दिल्यानंतर त्या हिरण्यकश्यपूची झालेली अवस्था व त्याच्याद्वारे प्रल्हादाचा झालेला छळ हा कथाभाग श्रीमद्भागवतामध्ये विस्तारपूर्वक आलेला आहे. तूर्त येथे प्रल्हादाच्या एवढ्या कमी वयातील तैलबुद्धीचा व भगवत्भक्तीचा विचार करणे गरजेचे आहे. एवढ्या बाल्यावस्थेतच



समवयस्क मुलांना उपदेश करण्याइतका मोठा अधिकार प्रल्हादाचा होता म्हणून त्यांना सकलभक्तश्रेष्ठ मानले जाते.

आतां, **उद्धवा लाधला कृष्णदाता ।** उद्धव हा भगवंताचा अत्यंत आवडता भक्त होता. भक्तिमार्गांत उद्धवाचा अधिकारहि श्रेष्ठ आहे. उद्धवाचे बाळपणापासून भगवंतावर प्रेम होते. त्याचे बालपणीचे बालसुलभ खेळ म्हणजे भगवंताची पूजा करणे, मनन करणे, ध्यानस्थ बसणे असे असत व यामध्ये तो तहानभूक विसरून जात असे. कांही ठिकाणी तर उद्धवाला श्रीकृष्णाचा 'निजभृत्य' म्हटले आहे.

निजभृत्य म्हणणें । उद्धवासी याकारणें ।
**निजगुज श्रीकृष्णें । त्यासीं बोलणें सर्वदा ॥** ए. भा. ६-४०५

अर्थ :- उद्धवाला श्रीकृष्णाचा निजसेवक म्हटले याचे कारण श्रीकृष्ण आपल्या पोटातील कोणतीहि गुप्त गोष्ट नेहमी त्याच्याजवळ बोलत असे. भगवंतांनी अवतारकार्याच्या शेवटी निजधामाला जाण्याअगोदर सर्व गुह्यज्ञान उद्धवाला सांगितले. तात्पर्य, या अखंड भगवन्नामचिंतनामुळेच उद्धवाला अखंड ज्ञान देणारा असा उदार कृष्णदाता भेटला.

असे हें नाम अतिशय सोपे असूनहि त्या नामाचा उच्चार करणारे मात्र सगळीकडे दुर्लभ आहेत. हेच ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या शेवटच्या चरणांत सांगतात.

**ज्ञानदेव म्हणे नाम हे सुलभ । सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे ॥ ६ ॥**

इतर सर्व साधनापेक्षा नाम हें साधन अतिशय सुलभ आहे. पण त्याचे महत्त्व जाणणारे दुर्लभ आहेत. तुकाराम महाराज सांगतात -

नामसंकीर्तन साधन पै सोपें । जळतील पापें जन्मांतरें ॥ तु. म. २४४१
तुका म्हणे सोपे आहे सर्वांहुनि । शहाणा तो धनी घेतो येथे ॥

नाम सोपे आहे, पण घेतो कोण ? लोकांना सोपे तेहि नको आणि अवघड तेहि नको आणि गुरूंची सेवाहि नको. ती होणारहि नाहीं. म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात -

नव्हे गुरुदास्य संसारिया । वैराग्य तरी भेणें कांपे विषयां ॥
तैसें नाम नव्हे पंढरीराया । जया सायास न लगती ॥ तु. म. २५१०

**अर्थ :** संसारी जीवांना (अंगी वैराग्य नसल्यामुळे) गुरूचे दास्यत्व होणार नाहीं आणि एखाद्याला प्रखर वैराग्य असेल तर तो या संसाराला फारच भितो आणि नाना प्रकारच्या विषयांना पाहून थरथरा कापतो. तसे या पंढरीरायाचे नाम नाहीं. तें घेण्यासाठी कोणतेहि कष्ट लागत नाहीत.

गुरुदास्याने श्रद्धाळू शिष्य अधिक योग्यतेस चढतो. नाहीतर कांहीं लबाड शिष्य असे असतात कीं गुरूंच्यांकडे आम्ही कांहीं शिकलोच नाहीं असे म्हणतात, आम्हाला जे येते तें पूर्वीच येत होते आणि गुरूंनी वेगळे काय शिकविले ? असे म्हणतात. अशा शिष्याला विद्येची प्राप्तीच होणार नाहीं; तेव्हां विद्येच्या फलाचा विचार दूरच राहतो. कोट्यावधी वर्षे जरी संतसंगतीत नाम घोकीत बसला तरी श्रद्धा व तत्परतेशिवाय ज्ञानप्राप्ती कल्पांतीहि शक्य नाहीं. गीतेमध्ये भगवान सांगतात-

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥** गी.४-३९.

**अर्थ :-** श्रद्धावान, तत्पर आणि जितेंद्रिय अशा मनुष्याला ज्ञान प्राप्त होते व ज्ञान प्राप्त झाल्याबरोबर अत्यंत श्रेष्ठ अशी शांति त्याला प्राप्त होते.



साधक हा गुरुदास्याने गुरूंच्या कृपेला पात्र होतो; परंतु त्यासाठी त्याची गुरूंच्या ठिकाणी दृढ श्रद्धा असणे गरजेचे आहे. याचे श्रेष्ठ उदाहरण म्हणजे एकलव्य कोळी. त्याने मातीचा द्रोणाचार्यांचा पुतळा केला व त्यावेर श्रद्धा ठेऊन श्रेष्ठ अशी धनुर्विद्या शिकला.

मातीयेचा द्रोण केला । तो कौळीकाभावो फळला ।
म्हणोनि विश्वासेंवीण नाडला । जगु ठकला विकल्पें ॥ ए.भा.१-४३

श्रीगुरूचेनि नांवें माती। डोंगरीं जयापासीं होती ।
तेणें कोळियें त्रिजगतीं । येकवद केली ॥ ज्ञा.१८-१७३०

पण संसारी लोकांना एवढी अवघड सेवा अशक्य आहे आणि त्यांच्याकडून एवढा अभ्यासहि शक्य नाहीं. म्हणून दयाळू संतांनी त्यांच्यासाठी नामस्मरणाचा हा सोपा मार्ग काढला आहे.

तैसें नाम नव्हे पंढरीराया । जया सायास न लगती ॥ तु. म. २५२५

काळवेळ नाम उच्चारिता नाहीं । दोन्ही पक्ष पाही उद्धरती ॥

हरिनाम उच्चारण्यासाठी कुठल्याहि विशिष्ट काळवेळेची अपेक्षा नाहीं. इतर मंत्रतंत्रामध्ये विधी व निषेध पुष्कळ असतात. तसेच विघ्नेहि पुष्कळ असतात.

मंत्र चळे थोडा । तरि धडचि होय वेडा ॥ तु. म. ३५११

**अर्थ :-** नाना प्रकारच्या मंत्रांचा जप करण्यात जर स्वर किंवा वर्ण ऱ्हस्व अथवा दीर्घ जरी झाला; म्हणजे किंचित चूक जरी झाली तर मंत्रपठण करणारा शहाणा मनुष्यदेखील क्षणांत वेडा होतो.

मंत्र चळे पिसें लागतें सत्त्वर । अबद्ध ते फार तरले नामें ॥ तु. म.२५०६

**अर्थ :-** कांहीं मंत्राचा उच्चार जसा आहे तसा न करता त्यात थोडी चूक झाली तर उच्चार करणारास तात्काळ वेड लागते; परंतु श्रीहरीचे

नाम तसे नाही. तें वेडेवाकडे घेऊनहि पुष्कळ तरून गेले आहेत.

**अनंत जन्मीचे तप एक नाम । सर्व मार्ग सुगम हरिपाठ ॥**

**अर्थ :** अनंत जन्माचें तप हे एका नामाच्या बरोबरीचे आहे. असा हा हरिनामजप सर्व साधनांमध्ये अतिशय सोपा मार्ग आहे. म्हणून ज्ञानेश्वर महाराज सांगतात-

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥**

**- भावार्थ समाप्त -**

**व्याख्यान :** आतां प्रस्तुत अभंगात ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, कीं संतांच्या संगतीने परमार्थप्राप्ती होते; परंतु इतर शास्त्रकार असे कोठे सांगतात? तें तर मोक्षाचा मार्ग ज्ञानच आहे असे सांगतात

**जें ज्ञान जयाचां हातीं । तोचि समर्थु मुक्ती ।**
**जैसा शतमख संपत्ती। स्वर्गीचिये ॥** ज्ञा.१५-३०

**अर्थ :** कीं, ज्याप्रमाणे शंभर यज्ञ केलेला पुरुष स्वर्गाचे ऐश्वर्य इंद्रपद मिळविण्यास समर्थ होतो. त्याप्रमाणे ज्ञान ज्याच्या हस्तगत झालेले आहे, तो मोक्ष मिळविण्यास समर्थ होतो.

कोणी शास्त्रकार म्हणतात, कर्माने मोक्ष मिळतो, अशी अनेकांची अनेक मतें आहेत. आतां असे पहा कीं ज्ञानाने मोक्ष मिळणे असो, कर्माने असो, उपासनेने असो, नामस्मरणाने असो किंवा आणखी कशाने असो, या सर्व मार्गांचे यथार्थ ज्ञान होण्यासाठी संतसंगती म्हणजेच सद्गुरु कृपा आवश्यक आहे. एकनाथ महाराज सांगतात-

**हरि प्राप्तीसी उपाय । धरावें संतांचे तें पाय ॥ येणे साधतीं साधनें ।**
**तुटती भवाची बंधनें ॥ संतावीण प्राप्ती नाहीं । ऐसें वेद देती ग्वाही ॥**
**एका जनार्दनी संत । पूर्ण करिती मनोरथ ॥** ए.म.

नाथ महाराज या अभंगात स्पष्टपणे सांगतात कीं, भगवंताची



प्राप्ती करून घेण्याचा एकमेव उपाय म्हणजे संतांना शरण जाणे हाच आहे. मग साधन कोणतेहि असो त्याची सिद्धी होऊन भवबंधनातून मुक्ती यानेच शक्य आहे. संतांशिवाय भगवत्प्राप्ती शक्य नाहीं असे वेदसुद्धा सांगतात. शेवटी एकनाथ महाराज म्हणतात, संत हे शिष्याचे सर्व मनोरथ (मनातील इच्छा) पूर्ण करितात.

आतां, भगवंताच्या दोन स्वरूपाविषयी विचार करूं.

**व्दे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चैवामूर्तंच ।** बृह.उप.२-३-१

**तरी व्यक्त आणि अव्यक्त । हें तूंचि एक निभ्रांत ।**
**भक्ती पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥** ज्ञा.१२-२३

**अर्थ :** तर व्यक्त रूपाने अथवा अव्यक्त रूपाने तूच एक आहेस. या विषयी माझ्या मनांत शंका नाहीं. भक्तीने व्यक्त स्वरूपाची व योगाने अव्यक्त स्वरूपाची प्राप्ती होते. आपल्या अज्ञानाने दुरावलेला आत्मा ज्ञानाने प्राप्त होतो.

**आपुलिया अज्ञानासाठीं । नव्हतां थांवला किरीटी ।**
**तरी आतां आत्मज्ञानाचेनि लोटी । खांडेनि गा ॥** ज्ञा.१५-२४८

अर्थ : भगवंत सांगतात, अर्जुना हा नसलेला संसारवृक्ष केवळ आपल्या अज्ञानामुळे बळावला आहे. तर आत्मरूपी दुधारी तलवारीने आता त्याला नाहीसे कर.

ज्याप्रमाणे एखाद्याची एखादी वस्तु त्याच्या अज्ञानाच्यादृष्टीने हरवली असे त्याला वाटते व तीच वस्तु त्याला त्याच्या मित्राने दाखवून द्यावी व त्याचे अज्ञान घालावे, तसा हा प्रकार आहे. याबाबतीत सांप्रदायिक कीर्तनकारांमध्ये ''एका बाईची नथ हरवल्याचा'' दृष्टांत प्रसिद्ध आहे. तात्पर्य, आपल्याच आत्मदर्शनाची जाणीव करून देणारे

ज्ञान संतांकडून मिळते, म्हणून संतसंगतीची नितांत गरज आहे.

**मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे।**
**प्रत्यक्ष फावो लागे तैसें । आपैसया ।।** ज्ञा. ९-४९

**अर्थ :** गुरु मुखांतून तें ज्ञान अमळसे उगवतांना दिसते; पण ते हृदयांत मुळचेच सिद्ध असते, तसे तें आपोआप प्रत्यक्ष अनुभवाला येऊं लागते.

**तुझें आहे तुजपाशीं । परि तूं जागा चुकलासी ।**
**चिवडूनियां नासी । तुझ्या घरिच्यांनी केलो ।।** तु म. २८२

**अर्थ :** तुझी वस्तु तुजजवळच आहे, पण तूं जागा चुकलास, कारण तुझ्या हृदयरूपी घरांत कामक्रोधादि मंडळी, त्यांनी चिवडून (अव्यवस्थित करून) सर्व नाश केला आहे.

तात्पर्य, निर्गुणाची प्राप्ती ज्ञानाने होते व सगुणाची प्राप्ती भक्तीने होते. पण निर्गुण भक्ती अतिशय कठीण आहे तशी सगुण भक्ती नाही. मग जर भक्तीने भगवत्प्राप्ती असेल तर मग संतसंगतीची काय गरज आहे ? त्याचे उत्तर असे आहे कीं, वरील दोन्ही उपाय फक्त संतांच्या संगतीनेच घडतात. कारण ज्ञान हे संतांच्या आधीन आहे.

**गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन ।**
**दर्शनीं समाधान । आथि जैसें ।।** ज्ञा.१८-१६३६

**अर्थ :** जेथे गुरु तेथे ज्ञान, जेथे ज्ञान तेथे आत्मदर्शन व जेथे आत्मदर्शन तेथे समाधान असते.

तसेच भक्तीहि संतांच्या संगतीनेच प्राप्त होते. नारदांना जेव्हां सनत्कुमारांचा सत्संग लाभला तेव्हांच त्यांना भक्तीविषयी प्रेम व गोडी उत्पन्न झाली. फार काय सांगावे ! साध्या व्यवहारात सुद्धा गुरूची पदोपदी गरज भासते. मग परमार्थ हा तर खडतर मार्ग आहे. या मार्गावर सद्गुरुशिवाय मार्गक्रमणा कशी करता येईल ? गुरूंच्या सहाय्यतेशिवाय कोणत्याहि उपायाचे वर्म कळणार नाहीं आणि गुरूंची सहाय्यता त्यांना तनमनजीवाने शरण जाऊन सेवा केल्याने प्राप्त होते.



एका बैराग्याला वनस्पतीपासून सोनें बनविण्याची सिद्धी प्राप्त होती. राजाला समजले. बैराग्याला बोलावून घेतले व राजाने ती विद्या शिकविण्याबद्दल आग्रह धरला. तो कांहीं केल्या शिकविण्यास तयार होईना. बैराग्याला तुरूंगात टाकले. सहा महिन्यांनी त्याला फाशीची शिक्षा देण्याचे, ( ठार करण्याचे ठरविले.) बैरागी मरण्यास तयार झाला. प्रधानाच्या सांगण्यावरून राजाने थोडा विचार केला व वेष पालटून तुरूंगात बैराग्याची सेवा केली. संतुष्ट होऊन बैराग्याने राजाला ती विद्या शिकविली. सारांश, कोणत्याहि गुरूंची सेवा केल्याशिवाय ज्ञानप्राप्ती होत नाहीं व वर्म कळत नाहीं. म्हणून गुरूंची आवश्यकता आहे.

**प्रवृत्तीनिवृत्ती कृतकार्या । अवश्य पाहिजे आचार्या ।**
**आपमतीं भजतां राया । अनेक अपायांमाजि पडे ।।** ए.भा.३-८०७

**अर्थ :** प्रवृत्तीमार्गाच्या कार्याला किंवा निवृत्तीमार्गाच्या कार्याला गुरु हे अवश्य पाहिजेत. आपल्या मताने भजन केले तर मनुष्य हा अनेक संकटांत सांपडण्याचा संभव असतो.

**गुरु ब्रह्म दोनी एक । ऐशिया भावना आवश्यक । सेवा करूनि भावपूर्वक । संतोषूनि देख अनुग्रहो घ्यावा ।।** ए. भा.३-८०९.

**अर्थ :** गुरु आणि ब्रह्म दोन्ही एकच आहेत अशी आवश्य भावना धरून भक्तीपूर्वक त्यांची सेवा करावी व त्यांना प्रसन्न करून अनुग्रह घ्यावा.

अहो, तुमचे- आमचे सोडा साक्षात् देवादिकांनासुद्धां सेवा करावी लागली. अर्जुनाची भावना जोपर्यंत मित्रत्वाची होती तोपर्यंत भगवंताने त्याला गुह्यज्ञान सांगितले नाहीं. जेव्हां कुरुक्षेत्रावर त्याच्या मनांत शिष्यभाव निर्माण झाला व भगवान आपले गुरु आहेत तें विद्येचे भांडार आहे, अशी धारणा त्याच्या मनांत दृढ झाली. तेव्हांच भगवंताने त्याला ब्रह्मज्ञान सांगितले. वास्तविक अर्जुन व भगवंत हे समवयस्क होते. पण गुरुशिष्यत्वास वयाच्या मर्यादा नाहीत.

तापीतिरनिवासी महान तपस्वी योगी चांगदेव ज्ञानेश्वर महाराजांना शरण आले तेव्हां त्यांचे वय चौदाशे वर्षांचे होते.

**उपजताचि ज्ञानी हे वर्म जाणोनि । आले लोटांगणी चांगदेव ॥** ना. म.

**चौदाशे वर्षांचे तप्तीतीरवासी ।**
**गर्व हरविला चालविले भिंतीशी ।** कान्होपात्रा

मुक्ताबाईंचे शिष्यत्व स्वीकारतांना चांगदेवांनी जर त्यांचे वय पाहिले असते तर कदाचित अजूनहि कित्येक चौदाशे वर्षे चांगदेवांचा उद्धार झाला नसता. म्हणजे गुरुपद हे वयाने प्राप्त होत नाहीं तर बुद्धी व शुद्ध ज्ञान याने प्राप्त होते. ब्रह्मविद्या प्राप्त झाल्यानंतरचे चांगदेवांचे उद्‌गार ऐकण्यासारखे आहेत.

**चांगदेव म्हणे आजी जन्मा आलो । गुरुपुत्र झालो मुक्ताईचा ॥** चां.म.

एवढेच नव्हे तर ज्यांचे आपण नामस्मरण करतो ते रामकृष्णादिक पूर्ण अवतार असूनसुद्धा त्यांनाहि वसिष्ठसांदिपनादिक गुरूंची सेवा करावी लागलेली आहे.

**रामनामें करिता घोष । तेणे तुटती भवपाश ।**
**तोही शरण वसिष्ठास । गुरुभक्तीसी सादर ॥** ए. म. आनंदलहरी



गुरुभक्तीविषयी अनेक थोर महात्म्यांची उदाहरणे देता येतील. प्रभुरामचंद्रांनी वसिष्ठांची अनन्यभावे सेवा केली. भगवान श्रीकृष्णांनी दुर्वासांची सेवा केली. सांदिपनी ऋषींच्या आश्रमात लाकडे वाहिली. अंबरीष राजा असूनहि गांवातील मंदिरें झाडीत असे. दुर्योधन एवढा दुष्ट पण तो गुरुभक्तीत अतिशय तत्पर होता. तो द्रोण व भीष्म यांच्या घोड्यांचा खरारा करीत असे म्हणूनच शंभर कौरवांमध्ये फक्त त्याचेच नांव आजहि उल्लेखिले जाते. नामदेव महाराजांचा पांडुरंग हा जीवलग सखा होता तरी त्यांना विसोबा खेचरांची गुरुसेवा करावी लागली. तात्पर्य, ज्ञानप्राप्तीसाठी अभिमान गलित होणे आवश्यक असते व अभिमानाचा नाश गुरुसेवेने होतो.

**नामया शरण भगवंतासी । भगवंत तो प्रत्यक्ष त्यासी । हरि शिकवी नामयासी । सद्‌गुरुवाचोनि निजसुखासी न पविजे ॥ तेणें मानूनिया वचन । रिगाला सद्‌गुरुशी शरण । रूप पहावया निर्गुण । पंढरीनाथाचे ॥ तेणें खेचर विसा केला गुरु । तेव्हां झाला साक्षात्कारु । तेणे केला ब्रह्मपूर्णपरु । निजसुखाचे घरू पावला ॥** ए.म.आनंदलहरी ११९ ते २१

असो, अशाप्रकारे आपणास साधूंची कृपा प्राप्त होण्यासाठी त्यांच्या मनाप्रमाणे वागावे लागते व त्यांचे मनोगत तुकाराम महाराज सांगतात-

**आम्हां आवडे नाम घेतां । तोही पिता संतोषे ॥** तु. म. १९६७

म्हणजे अखंड नामस्मरण करावे हेच संतांचे मनोगत असते म्हणून आपण नामस्मरणाचे नित्य व्यसन लावून घ्यावे. त्यायोगाने आपोआप संत भेटतील व अनुग्रह करून उद्धार करतील. याकरिताच ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥**

**- समाप्त -**

## अभंग नववा

विष्णुवीण जप व्यर्थ त्याचे ज्ञान ।
रामकृष्णीं मन नाहीं ज्याचे ॥ १ ॥
उपजोनि करंटा नेणे अद्वैतवाटा ।
रामकृष्णीं पैठा कैसेनि होय ॥ २ ॥
द्वैताची झाडणी गुरुवीण ज्ञान ।
तया कैचे कीर्तन घडेल नामीं ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे सगुण हे ध्यान ।
नामपाठ मौन प्रपंचाचें ॥ ४ ॥

**अर्थ :** विष्णूच्या नामस्मरणावांचून इतर जप करणारा आणि रामकृष्णस्वरूपी ज्याचे मन नाहीं त्याचे ज्ञान व्यर्थ आहे. ॥ १ ॥ जन्माला येऊन द्वैतभावरहित अद्वैत अशा परमात्म्याला जाणण्याचा मार्ग ज्यास माहीत नाहीं तो करंटा हतभागी होय. त्याची वस्ती रामकृष्ण स्वरूपी कशी होईल ? म्हणजे रामकृष्णस्वरूपी ऐक्याला तो कसा प्राप्त होईल ? ॥ २ ॥ ज्या ब्रह्मस्वरूपाच्या अज्ञानाने (अहं) मी इदं (हे) वृत्तीरूपी द्वैताची उत्पत्ती झाली. त्या द्वैताचा नाश ब्रह्मस्वरूपाच्या ज्ञानानेच होणार आहे. तें ज्ञान देणारे गुरु आहेत. गुरु वांचून तें कधीहि मिळणार नाहीं व ज्या साधकाला तें मिळाले नाहीं त्याला नामी जो परमात्मा त्याचे अभेद भजन कसे घडेल ? ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मला हरीच्या सगुण स्वरूपाचेच ध्यान आहे आणि त्याच्याच नामाची मी सतत आवृत्ति करीत असून प्रापंचिक गोष्टीसंबंधी मौन घेतले आहे. ॥ ४ ॥





**विवरण :**

**विष्णुवीण जप व्यर्थ त्याचे ज्ञान । रामकृष्णीं मन नाहीं ज्याचे ॥ १ ॥**

प्रस्तुत अभंगामध्ये ज्ञानेश्वर महाराज अशा लोकांचा धिक्कार करतात कीं जे विष्णुनामावांचून अन्य नामांच्या जपामध्ये आपले ज्ञान व्यर्थ घालवितात. ज्ञान जरी श्रेष्ठ असले तरी तो ज्ञानी विष्णुजप करीत नसेल किंवा त्याबद्दल सामान्य भावना ठेवीत असेल तर त्या पुरुषाचे ज्ञान व्यर्थ आहे. म्हणजे तें ज्ञान फलदायी होऊ शकत नाहीं. हरिभक्ती हीच ज्ञान उत्पादक व ज्ञानसंरक्षक आहे. कारण बुद्धीचा दाता श्रीविष्णुच आहे. नाथ महाराज सांगतात -

**अद्वैत भजने अखंड स्मरणे वाजवी कर टाळी ।**
**एका जनार्दनी मुक्त होय तत्काळी ॥ ए.म.**

एका अद्वैत परमात्म्याला न जाणता बाकी पुष्कळ ज्ञान, मान, मान्यता सर्व व्यर्थ आहेत.

**कर्मकांड तरी जाणे । मुखोद्गत पुराणें ।**
**ज्योतिषी तो म्हणे । तैसेंचि होय ॥ ज्ञा. १३-८२८**

अर्थ : तो सर्व कर्मकांड जाणतो. पुराणें त्याला तोंडपाठ आहेत आणि ज्योतिष्यशास्त्रांत इतका निपुण आहे कीं तो म्हणेल तसेच घडते; परंतु त्यायोगाने उदरनिर्वाह व तर्ककुतर्क यांना वाव मिळतो. एकनाथ महाराज सांगतात-

**करूनि अद्वैतव्युत्पत्ती । तें ज्ञान विकूं देशांतरा जाती ।**
**मूर्ख ज्ञात्यातें उपहासिती । तऱ्ही वांछिती सन्मानु ॥ ए.भा. ११-५३१**

**अर्थ :** अद्वैत मताची सिद्धता करून तें ज्ञान विकण्याकरिता देशांतराला (परदेशाला) जातात; मूर्ख लोक ज्ञात्यांचा उपहास करितात. तरी

ते सन्मानाची इच्छा करतातच. तसेच तुकाराम महाराजसुद्धां सांगतात.

**पढोनियां वेद हरिगुण गांवे । ठावे तें जाणावें तेव्हां जाले ॥** तु. म.५२४

अर्थ : चार वेदांचे पठण करून जर हरीचे गुण गाईले तरच त्याला त्या वेदाचा अर्थ समजला असे समजावे. म्हणजे शास्त्राभ्यास व ज्ञान शिकून मगच हरिभक्तीची खरी गोडी लागते.

**मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडीं वाढों लागे ॥** तु. म.२२७२

अर्थ : आणि मग (ज्ञानोत्तर कालांत) रामनामाबद्दल खरी आवड निर्माण होऊन क्षणाक्षणाला सगुण भक्तीचे सुख वाढू लागते.

जसे पोहणें शिकल्यावरच पोहण्याची मजा वाटतें नसें शास्त्रज्ञान प्राप्ती नंतरच भक्तीचा आनंद मिळतो. कांहीं लोक क्षुद्र जपतपादि करतात. उदा- जारणमारणादि मंत्रतंत्र, जडीबुटी इत्यादी; परंतु त्याने पुण्यसंचय तर नाहीच उलट पाप वाढते. तात्पर्य, एका भगवन्नामावांचून इतर प्रकारचे जप करणे किंवा नामोच्चार करणें व्यर्थ आहे व त्या साधकाचे तत्संबंधीचे ज्ञानहि व्यर्थ आहे. हेच प्रथम चरणांत सांगितले आहे.

**विष्णुवीण जप व्यर्थ त्याचे ज्ञान । रामकृष्णी मन नाही ज्याचे ॥ १ ॥**

या नरदेहांत येऊन ज्याला भगवंताच्या अद्वैत स्वरूपाची माहिती नाहीं किंवा त्या मार्गावर आचरण तो करीत नाहीं त्याला रामकृष्ण स्वरूपी ठाव कसा मिळणार ?

**उपजोनि करंटा नेणे अद्वैतवाटा । रामकृर्ष्णी पैठा कैसा होय ॥ २ ॥**

जीव हा स्वतः परमात्माच असून अज्ञानाने बांधला गेला आहे, अद्वैतत्त्वाने त्याला परमात्म्याशी एकरूप केल्याशिवाय जीवाची सुटका



नाहीं. तुकाराम महाराज सविस्तरच सांगतात.

**मोकळी गुंते रिती कुंथे नाहीं भार दावें । धेडवाडा बैसली खोडा घेतली आपुल्या भावें ॥ १ ॥ ऐका बाई लाज नाहीं आणिकां त्या गरतीची । समाधानीं उंच स्थानीं जाणे सेवा पतीची ॥ २ ॥ न बोलतां करी चिंता न मारितां पळे । दादला सेजे नावडे निजे ज्ञगझोडीचे चाळे ॥ ३ ॥ देखत आंध बहिर कानीं बोल बोलतां मुके । तुका म्हणे पतन सोयरीं ऐसीं झालीं एके ॥ ४ ॥** तु. म.२८९

अर्थ : वरील अभंगाचा सारांशतः अर्थ असा आहे कीं, ही संसार दौरी दाव्याने बांधल्यावांचून (परमार्थतः मुक्त असली तरी ) व डोक्यावर कांहीं ओझे नसूनहि कुंथत आहे. म्हणजच जीव हा परमार्थतः शिवरूपच आहे; परंतु अज्ञानामुळे त्याला जीवपणाचे नसलेले बंधन वाटते. हाच विचार ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

**कां कवण एकु भ्रमलेपणें । मी तो नव्हें गा चोरलो म्हणे ।**
**ऐसा नाथिला छंद अंतःकरणें । घेऊनि ठाके ॥** ज्ञा.६-७४

अर्थ : कोणी एक मनुष्य वेड लागल्यामुळे पूर्वी जो मी, तो मी आता नाहीं, मी चोरीला गेलो आहे असे म्हणतो आणि आपल्या मनांत नसताच आग्रह घेऊन बसतो. याबाबत ''एका बायकोच्या हरवलेल्या नवऱ्याचा दृष्टांत' प्रसिद्ध आहे. तात्पर्य, असे कीं तो आहे तो पूर्वीचाच आहे. फक्त त्याला वेड लागल्यामुळे (अज्ञानामुळे) आपण चुकलो आहोत असा भास होतो.

आपल्या स्वरूपाविषयीचे अज्ञान तेच बंधाला कारण होते व हे अज्ञान ज्ञानाने (स्वरूपाविषयीच्या) नाहीसे होते.

**हे चोविसाहीं तत्त्वांचे । कुटुंब घरवस्तीचें ।**
**तुटे बंधमोक्षाचें । गुंतले एथ ॥** ज्ञा. १८-३१९

अर्थ : चोवीसहि तत्त्वरूपी कुटुंबाचे राहण्याचे देह हे एक घर आहे आणि या देहांत बंधमोक्षाची गुंतागुंत उलगडली जाते.

**मनुष्यपण तरी साधी नारायण । नाही तरी हीन पशुहूनि ॥** तु. ग. ३४८

**अर्थ :** जर मनुष्य देहामध्ये देवाची प्राप्ती करून घेतली तरच उत्तम नाहीतर मनुष्य जनावरांहूनहि नीच आहे असे समजावे.

मनुष्य देहामध्ये हा करील तें होईल; पण मूर्ख लोक कांहीच करीत नाहीत. व्यर्थ खटपटीमध्ये आयुष्य वेचतात. या मनुष्यदेहात गुरुपासून ज्ञानप्राप्ती करून घेऊन अज्ञानाने दिसणाऱ्या द्वैताचा नाश करून शुद्ध परमात्म्याची प्राप्ती करून घेतल्यानेच जीवाचे सार्थक होईल; परंतु भगवंताचे यथार्थ कीर्तन घडण्यासाठी द्वैताचा समूळ नायनाट सद्गुरुज्ञानाने करावा लागतो. हेच तृतीय चरणाचे सार आहे.

**द्वैताची झाडणी गुरुवीण ज्ञान । तया कैचे कीर्तन घडेल नामीं ॥**

ज्या ब्रह्मस्वरूपाच्या अज्ञानामुळे अहं-मी, इदं-हे, वृत्तीरूप द्वैताची उत्पत्ती झाली. त्या द्वैताचा नाश ब्रह्मस्वरूपाच्या ज्ञानानेच होणार आहे. हे ज्ञान देणारे गुरु आहेत. त्यांच्यावांचून तें ज्ञान प्राप्त होणे शक्यच नाहीं व ज्या साधकाला तें ज्ञान प्राप्त झाले नाहीं त्याला नामी जो परमात्मा त्याचे अभेदभजन कसे घडेल.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मला हरीच्या अभेदस्वरूपाचे ज्ञान झाले आहे आणि त्याच्याच नामाची मी सतत आवृत्ति करीत आहे आणि इतर प्रापंचिक गोष्टींसंबंधाने मी मौन घेतले आहे. हेच अभंगाच्या चतुर्थ चरणांत सांगतात.

**ज्ञानदेव म्हणे सगुण हे ध्यान । नामपाठ मौन प्रपंचाचें ॥ ४ ॥**

सगुण ध्यानाचे शास्त्रांमध्ये तीन प्रकार सांगितले आहेत -



**१) प्रतिक ध्यान :-** अन्य वस्तूंचे अन्य रूपाने जे ध्यान त्यास प्रतिक ध्यान म्हणतात. उदा: जसे शाळीग्रामाचे विष्णुरूपाने ध्यान करणे.

**२) ध्येयानुसार ध्यान :-** शास्त्रांत वर्णन केल्याप्रमाणे शंखचक्रगदासहित चतुर्भुज विष्णुमूर्तीचे म्हणजे साकार विष्णूचे ध्यान.

**३) अहंग्रह ध्यान :-** ब्रह्मध्यानांत ब्रह्माचे आत्म्याशी अभेद चिंतन करून ध्यान साधते त्यास अहंग्रह ध्यान म्हणतात. म्हणजेच ध्येय स्वरूपाचे आपल्याशी अभेद चिंतन करून केलेले ध्यान हे अहंग्रह ध्यानाचे स्वरूप आहे. त्यामध्ये निर्गुण ब्रह्माचे ध्यान अतिकठीण आहे.

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥** गी १२-५

अर्थ : अव्यक्त ब्रह्माच्या ठिकाणी ज्याचे चित्त आसक्त आहे. त्यांना अधिक क्लेश पडतो, कारण देहधाऱ्यांना अव्यक्त ब्रह्माच्या प्राप्तीचा मार्ग कष्टाने प्राप्त होतो.

**यालागीं पांगुळा हेवा । नव्हे वायूसि पांडवा ।**
**तेवी देहवंतां जीवां । अव्यक्ती गति ॥** ज्ञा. १२-७२

अर्थ : ज्याप्रमाणे पांगळ्याला वायूशी स्पर्धा करता येत नाही. त्याप्रमाणे शरीरधारी जीवाची निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी गती नाहीं.

निर्गुण ब्रह्माची प्राप्ती कठीण आहे हे खरे; परंतु सगुण उपासनेच्याद्वारे निर्गुणाची प्राप्ती सहज आहे. नाथ महाराज सांगतात

**निर्गुणीं पावले सगुणीं भजतां । विकल्प धरिता जिव्हा झडे ॥**

**अर्थ :** भक्तांनी सगुणाच्या भजनाद्वारा निर्गुणाची प्राप्ती करून घेतली. यासंबंधी कोणी शंका घेतल्यास त्यांची जीभ तुटून पडेल.

जे परमात्म्याचे यथार्थ स्वरूप जाणतात त्यांचें सगुणावरचे प्रेम कधीच कमी होत नाहीं. स्वतः ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**आणि पूर्ण अहंता वेठलो । सैंघ आम्हीच दाटलो ।**
**मा लोपलो ना प्रगटलो । कोण्हा होऊनि ॥** अमृ.१०-१५

अर्थ : आम्ही पूर्णस्थितीला प्राप्त झालो आहोत. 'सर्व मीच आहे' अशी अहंता बाणली आहे. जे नित्यपरब्रह्मस्वरूप तेच आमचे स्वात्मतत्त्व आहे. त्या बोधाने आम्ही जिकडे-तिकडे घनदाट भरलो आहोत. सर्वत्र व्यापून राहिलो आहोत, म्हणून आम्ही कोणाला लोपलोहि नाहीत आणि प्रगटलोहि नाहीत.

**हे विश्वचि माझें घर । ऐसीं मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ मग नाहींवरी पार्था । माझ्या भजनीं आस्था । तयातें मी माथां । मुकुट करीं ॥** ज्ञा.१२-२१३-१४.

**अर्थ** : हे विश्वच माझे घर आहे, असा ज्याचा दृढनिश्चय झालेला असतो, फार काय सांगावे! सर्व स्थावरजंगमात्मक जग जो (अनुभवाच्या अंगाने) आपणच बनला आहे; भगवान सांगतात इतके असूनहि आणखीहि ज्याची माझ्या भजनाच्या ठिकाणी आस्था आहे. त्याला मी आपल्या डोक्यावरचा मुकुट करतो.

एवढ्या श्रेष्ठ बोधावर आलेले ज्ञानेश्वर महाराज पण त्यांचेहि सगुणप्रेम कमी झालेले नाहीं. तें म्हणतात,

**माझ्या मनीची आवडी । पंढरपुरा नेईन गुढी ॥ १ ॥**
**पांडुरंगी मन रंगले । गोविंदाचे गुणी वेधिले ॥ २ ॥** ज्ञा. म.

एवढा सगुण भक्तीवरील आदर आणि तोहि पूर्ण बोधाच्या स्थितीत. हीच भक्तीची उत्कट अनुभूति आहे. नाहीतर आम्ही एक-



दोन स्वप्न दृष्टांत झाले कीं लगेच ब्रह्मस्वरूपाचे ज्ञान प्राप्त झाल्याच्या तोऱ्यात सगुण भक्ती सोडतो. पंढरीची वारी सोडतो. हा खरा भक्त नाहीं. याला कृतघ्न भक्त म्हणावे. म्हणजे ज्या सगुण भक्तीच्या सहाय्याने आपण निर्गुण स्वरूपापर्यंत पोहोचलो त्या सगुण भक्तीच्याविषयीं कृतज्ञता असणे आवश्यक आहे. व्यवहारामध्ये सुद्धां केलेल्या उपकाराबद्दल कृतज्ञतेची अपेक्षा केली जाते मग परमार्थ तर व्यवहाराहून श्रेष्ठच आहे. म्हणून पूर्णबोधप्राप्तीनंतरहि सगुण भजन सोडू नये. कारण भगवंत सांगतात अशा भक्तांना मी अक्षरशः डोक्यावरील मुकुटाचे स्थान देतो. **''तरि तयातें मी माथा । मुकुट करी ॥''**

तुकाराम महाराजांनी तर वैकुंठांत जाईपर्यंत सगुण भक्ती सोडली नाहीं. एकदा त्यांच्या पायाला नारु झाल्यामुळे त्यांची वारी चुकली. (त्या काळी वाहतुकीची, प्रवासाची एवढी साधनें उपलब्ध नव्हती) त्यांना ऱ्यातोनात दुःख झाले. शेवटी त्यांनी हंबरडा फोडला पांडुरंगा माझी वारी चुकते आहे. मला माफ कर. त्यांचे असेहि उद्गार आहेत कीं, जो विनाकारण आपली वारी चुकवित असेल तो विधवा जारिणीचा चांडाळ पुत्र होय. शेवटी तुकोबारायांची वारी चुकू नये म्हणून भगवंत प्रत्यक्ष त्यांना येऊन भेटले व त्यांची वारी भगवंताने सफल केली. एवढी निष्ठा असावी लागते.

**निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुकों नये ॥ १ ॥**
**निष्काम निश्चळ विठ्ठली विश्वास । पाहो नये वास आणिकांची ॥**
**तुका म्हणे ऐसा कोण उपेक्षिला । नाहीं ऐकिला ऐसा कोणी ॥**

अर्थ : ( तु. म.३५९७ ) हरीच्या ठिकाणी दृढभाव टेवणे हाच भक्तांचा स्वधर्म आहे. अशा प्रकारच्या (निर्धार) निश्चयाचे वर्म भक्तजनांनी नेहमी हृदयांत बाळगावे; त्यात अंतराय (विसर) येऊ देऊ नये. भक्ताने सर्व कामना टाकून विठोबारायाच्या ठिकाणी निष्काम आणि अटळ

विश्वास ठेवावा; कोणत्याहि संकटप्रसंगी दुसऱ्या कोणाचीहि वाट पाहू नये. तुकाराम महाराज म्हणतात, अशा अनन्य भक्ताचा विठ्ठलाने त्याग केला आहे काय ? माझ्या ऐकण्यात तर असा कोणी आलाच नाहीं.

**तुका म्हणे आम्हां । टळणेचि नाहीं नेमा ।।** तु. म. ७४०

**तुका म्हणे भाव । जवळी धरूनि आणी देव ।।** तु. म.२३०८

**अर्थ :** तुकाराम महाराज म्हणतात, हा जो आम्ही नेम केला आहे तो कधीहि टळू देणार नाहीं. पुढे सांगतात कीं आपला जर देवाच्या ठिकाणी दृढ भाव असेल, तर तो भाव देवाला आपल्याजवळ धरून आणतो.

नेम म्हणजे नियम आपण एकदा केलेला नियम जन्मभर टिकविला तर भगवंताच्या प्राप्तीसाठी रानावनांत हिंडायची गरज नाहीं. तो नियम शेवटपर्यंत टिकविणे हाच भक्तांचा पुरुषार्थ होय. हीच भक्तीची परमसीमा आहे. तुकोबारायांचा नेम अटळ होता म्हणूनच भगवंतांनी त्यांना देहूला येऊन भेट दिली. सगुण भक्तीवर त्यांचे नितांत प्रेम होते. भक्ती करता-करताच तें ब्रह्मरूप झाले.

असो, निर्गुण परमात्मा प्राप्त करून घेतल्यावरहि त्याचे सगुण भजन चुकू नये. भगवान अर्जुनाला सांगतात.

**तूं मन हे मीचि करी । माझां भजनी प्रेम धरी ।**
**सर्वत्र नमस्कारी । मज एकातें ।।** ज्ञा. ९-५१७

**अर्थ :** अर्जुना, तूं आपले मन मद्रूप कर; माझ्या भजनाचे ठिकाणी प्रेम धर आणि सर्व ठिकाणी मीच आहे असे समजून मला एकाला नमस्कार कर.

भक्त ब्रह्मरूप झाला तरी त्याच्या बुध्दयादिक इंद्रियांकडून कर्म घडतच राहते. ज्ञानेश्वर महाराज तर कावळ्याशी बोलतात.



**उड उड रे काऊ तुझे सोन्यानीं मंढवीन पाऊ ।।**
**पाहुणें पंढरीरावो घरा कै येती ।।** ज्ञा. म.

म्हणजे अद्वैतबोधावर येऊनहि त्यांचा नामपाठ व प्रपंचाविषयीचे मौन कायम होते.

आतां मौन या संकल्पनेचा थोडा विचार करणे क्रमप्राप्तच आहे. नुसते वाचिक मौन कांहीच उपयोगाचे नाहीं. तसे मौन म्हणजे भक्तीचे फक्त लौकिक प्रदर्शनच असते. तोंडाने मौन असणे, हाताने खाणाखुणादि व्यवहार चालू ठेवणे. अपेक्षित विचारांची देवाण-घेवाणहि चालू असणे व मन मात्र दाहीदिशा सैरावैरा धावणे असे मौनधारी सध्या परमार्थामध्ये विपुल प्रमाणांत आढळतात. त्यांचा तो प्रयत्न फक्त स्वतःचा लौकिक वाढविण्यासाठी असतो. एऱ्हवी त्यांचे मौन म्हणजे एखाद्या ओढाळ जनावराचे तोंड बांधून त्याला पिकांमध्ये सोडल्यासारखे आहे, असो मौनाविषयी तुकाराम महाराज सांगतात -

**अडचणीचें दार । बाहेर माजी पैस फार ।। १ ।। काय करावें तें मौन । दाहीदिशा हिंडे मन ।। २ ।। बाहेर दावी वेश । माजी वासनेचे लेश ।। ३ ।। सारविलें निकें । वरी माजी अवघें फिकें ।। ४ ।।** तुका म्हणे अंती । कांहीं नलगेचि हाती ।। ५ ।। तु. म. २९०१

**अर्थ :** आंतमध्ये घर प्रशस्त मोठे असून त्याचे दार मात्र अडचणीचे असावे; जसे तें उपयोगाचे नाहीं तसे मन मात्र विषयाकडें सैरावैरा दाहीदिशा धांवत असतांना बाह्यात्कारी मौन काय कामाचे आहे ? खरे मौन म्हणजे प्रपंचाविषयीची गोष्टच सहन न होणे सतत नामस्मरण, नामसंकीर्तन करणाऱ्याला मौनाची कांहींच गरज नाहीं (मौन हे चिंतनासाठी असावे, ध्यान-धारणेसाठी असावे.)

कांहीं मुमुक्षू संसारनिवृत्तिसाठी खटपट करतात. परमार्थ

स्विकारतात; परंतु त्यांच्याकडून संसार सुटत नाहीं. फक्त त्याचे स्वरूप बदलते. म्हणजे घरचा संसार सोडतात व मठमठिकांसाठी लोकांकडून द्रव्य जमा करतात. पुढे त्याचेच चिंतन सतत चालू राहते. शिष्यपरिवार वाढतो. वयोवृद्ध झाल्यावर शिष्यांमध्ये संपत्तीसाठी भांडणे लागतात. प्रकरण न्यायालयापर्यंत जाते. देवाचे चिंतन जाऊन मठाचे चिंतन चालते. शेवटी हालअपेष्टा होऊन मृत्यु येतो. म्हणजे धड संसारहि नाहीं आणि परमार्थहि नाहीं.

**प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही । एकही निदानीं नव्हे त्यासी ॥ १ ॥ दोहीं पेंवांवरी ठेऊ जातां हात । होय अपघात शरीराचा ॥ २ ॥ तुका म्हणे तया दोहींकडे धक्का । शेवटीं तो नरकामाजी पडे ॥** तु. म.३५८५

**अर्थ :** मी प्रपंचहि करीन आणि परमार्थहि करीन असे कोणी म्हटले तरी त्याच्याकडून एकहि धड होणार नाहीं. दोन्ही पेंवावर (डगरीवर) हात ठेवावयास गेले तर तेथे शरीराला अपघात होतो. तुकाराम महाराज म्हणतात, अशा या साधकाला दोहींकडून अपयशाचा धक्का बसून शेवटी तो नरकांत पडतो.

मुख्य विचार असा- प्रपंच हा प्रवृत्तिरूप आणि परमार्थ हा निवृत्तिरूप असल्यामुळे परस्परभिन्न आहेत. यांचे फल आणि अधिकारी भिन्न आहेत. दुःखमिश्रीत सुख हे प्रपंचाचे फल आणि दुःखरहित सुख हे परमार्थाचे फल आहे. प्रपंचाचा अधिकारी राजस व तामस आहे तर परमार्थाचा अधिकारी अत्यंत सात्विक आहे. त्यामुळे एकाच अधिकाऱ्याकडून एकाचवेळी दोन फलांच्या प्राप्तीकरिता प्रपंच आणि परमार्थ हे दोन्ही विषय संपादन करता येणे शक्य नाहीं व करण्याचा प्रयत्न केल्यास परिणामी हाती दुःखाशिवाय कांहींच लागत नाहीं.

(असे साधक मायामोहांत फसले जातात. याचे कारण



संतसंगतीचा अभाव आणि स्वतंत्रता त्यामुळे विकार उत्पन्न होतात.) चिरंजीवपदामध्ये एकनाथ महाराज सांगतात

**त्याग केला पूज्यते कारणे । सत्संग सोडूनि पूजा घेणे । शिष्यममता धरूनि राहणे । तें जाणणे राजस ॥** ए. म. चिरंजीवपद

**अर्थ :** लोकांनी आपल्या नादी लागून पूजा करावी या हेतूने (बाह्यतः) त्याग करणे व सत्संग सोडून पूजा घेणे, शिष्यांची ममता मनांत धरून राहणे हें राजस वैराग्य समजावे.

ध्यानाकरिता 'सडा' मनुष्य पाहिजे. 'सडा' म्हणजे परिग्रहरहित असणारा मुमुक्षु

**सडे जें देखिले । ते ध्यानकासे लाविलें ।**
**परिग्रही घातलें । तरियावरी ॥** ज्ञा. १२-९१

**अर्थ :** जे भक्त सडे (अंतर्बाह्य परिग्रहरहित) आहेत असे मी पाहिले, त्यास माझ्या ध्यानरूपी कासेला लावले व परिग्रही होते त्यांना नामरूपी नावेवर बसविले.

आतां परिग्रहाचे दोन प्रकार आहेत १) बाह्यपरिग्रह २) अंतरपरिग्रह पुढे या दोन्हींचे प्रत्येकी दोन दोन प्रकार आहेत.

**१) अविद्येचा परिग्रह** (अ) अविद्येचा बाह्यपरिग्रह म्हणजे स्त्रीधनपुत्रादिक प्रपंच.

(ब) अविद्येचा अंतर्परिग्रह म्हणजे कामक्रोधादि षड्विकार.

**२) विद्येचा परिग्रह** (अ) विद्येचा बाह्यपरिग्रह म्हणजे शिष्यशास्त्रमठादिकांचा विलास.

(ब) विद्येचा अंतर्परिग्रह म्हणजे दया,क्षमा,शांति इत्यादी.

**शांति क्षमा दया । त्याही नको पंढरीराया ।।** निळोबाराय

ज्ञानेश्वर महाराजांची स्थिती सर्वपरिग्रहशून्य झाली होती. फक्त दैवास्तव त्यांचे देहपालन चालले होते.

**दैवास्तव देहाचे पाळण । ऐसा निश्चयो परिपूर्ण ।**
**जो चिंतीना देहभरण । तो महायोगी जाण दैवयोगे ।।** ज्ञा. ४ - १२५.

**अर्थ :** देहाचे पाळण प्रारब्धवशांत होत असते. असा ज्याचा पूर्ण निश्चय झालेला असतो तो देहाच्या पोषणाविषयी मनांत चिंता धरीत नाहीं. तो या दैवयज्ञरूपी महायोगाने महायोगी झाला आहे, असे समजावे.

तशीच अवस्था तुकाराम महाराजांचीहि झाली होती. त्यांनी मुक्तीरूपी वधुसोबत अगोदरच लग्न लावले होते व उरलेले थोडे दिवस खेळीमेळीने काढत होते.

**तुका म्हणे मुक्ति परिणिली नोवरी ।**
**आतां दिवस चारी खेळींमेळीं ।।** तु.म. ४०१३

अशा अवस्थेला पोहोचलेले संतमहात्मे सतत भगवंताच्या सगुण स्वरूपाचे भजन करीत असतात. म्हणून ज्ञानेश्वर महाराज जीवाच्या कल्याणाचा मौलिक उपदेश करतांना आग्रहाने सांगतात

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ।।**

**- भावार्थ समाप्त -**

**व्याख्यान :** प्रस्तुत अभंगात ज्ञानेश्वर महाराज अद्वैताचे व सगुण स्वरूपाच्या भक्तीचे महत्त्व सांगतांना द्वैताच्या झाडणीचा संकेत करतात. द्वैताचा संबंध वासनेशी, कामनेशी असतो. म्हणजे जावत्कालपर्यंत वासना - कामना आहेत. तावत्कालपर्यंत खरे भजन



होणारच नाहीं. तुकाराम महाराज म्हणतात -

**कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ । झाला पद्मनाभ सेवाऋणी ।। तु. म.२०१६**

**अर्थ :** आम्हाला भजनाचा जो लाभ झालेला आहे. तो केवळ कामनेच्या त्यागाने (इच्छेच्या अभावाने) होय आणि त्यायोगे पद्मनाभ परमात्मा हा आमचा सेवाऋणी झाला आहे. किंवा

**तुका म्हणे काम । निरसुनिया घेतो नाम ।।** तु. म.३९०७

तुकाराम महाराज सांगतात कीं, कामनेचा सर्वस्वी त्याग करून मी विठोबाचे नाम घेत आहे. परंतु कामनेचा (विषयांचा) त्याग न करता केलेले भजन कसे त्याचे वर्णन एकनाथ महाराजांनी उत्कृष्टरित्या केले आहे.

**नाम जपताहे वैखरी । चित्त धावें विषयावरी ।। १ ।।**
**कैसे होतसे स्मरण । स्मरणामाजीं विस्मरण ।। २ ।।**
**नामरूपी नाही मेळ । नुसता वाचेचा गोंधळ ।। ३ ।।** ए. म.

म्हणजे नामस्मरणाला बसला आणि चित्त स्त्रीपुत्रधनादिकांच्या ठिकाणी धांव घेत असेल तर त्याचा उपयोग नाहीं. नामस्मरणाला एकाग्र चित्त लागते. तुकाराम महाराज म्हणतात -

जवळी नाहीं चित्त । काय मांडियेलें प्रेत ।। तु. म. २८९२

अर्थ :- हरीच्या कथेमध्ये बसले असता जर कथेत चित्त नसेल तर त्याचा उपयोग काय ? तो मनुष्य म्हणजे जणूं कांहीं शृंगारलेले प्रेतच मांडून ठेवले आहे.

सकाम भक्ताला संतांनी अतिशय हीन अशा विशेषणांनी संबोधिले आहे. कांहीं ठिकाणी त्यांना कोडे (महारोगी) तर कांहीं ठिकाणी गोचिडे भक्त म्हणून संबोधिले आहे.

सकाम भक्तीने फलप्राप्ती कदाचित् होईल. परंतु भगवत्प्राप्ती

होणे शक्य नाही. सकाम भक्त वेगवेगळ्या प्रकारे भक्ति करतात. कोणी पाण्यात उभे राहून नामस्मरण करतात. तर कोणी अग्नीमध्ये उभे राहून नामजप करतात. (यालाच पंचाग्नी साधन म्हणतात.) कोणी उगीच उपवास करून देह कष्टवितात. परंतु त्या साधनेच्या मुळाशी कामना असते. हे सर्व त्रास ते भक्त देवाकरिता सहन करतात असे नाही.

सर्वांगी सुंदर सुरेख । जिच्या नाकावरी पांढरें टीक । तिसी वरेंना साधु लोक । तैसा विषयलोभु देख मद्भजनी ॥ ए.भा.११-२६६

अर्थ :- एखादी कन्या सर्व अंगांनी सुंदर व सुरेख आहे. परंतु तिच्या नाकावर मात्र पांढरा कोडाचा डाग असेल, तर तिला जसा कोणी सुज्ञ मनुष्य वरणार नाही. त्याप्रमाणे माझ्या भजनांत विषयलोभ हा दोष आहे.

म्हणजे द्वैतदर्शन जोपर्यंत आहे. तोपर्यंत अभेदभजन शक्यच नाही. याविषयी भगवान अर्जुनाला सांगतात तो भाग ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरीत अत्यंत सुंदर आणि समर्पक प्रतिपादिला आहे.

**आतां थोडी ऐसी । गोठी सांगिजेल परियेसी । जै अहंकार तनूसी । वालभ पडिलें ॥ तै इच्छा हे कुमारी जाली । मग ते कामाच्या तारुण्या आली । तेथ द्वेषेसी मांडिली । वऱ्हाडीक ॥ तया दोघास्तव जन्मला । ऐसा द्वंद्वमोह झाला । मग तो आजेयाने वाढविला । अहंकारें ॥** ज्ञा. ७-१६५,१६७

अर्थ :- भगवान म्हणतात, आतां थोडीशी गोष्ट सांगतो, ती ऐक. जेव्हां अहंकार आणि देह यांचे प्रेम एकमेकावर जडले, तेव्हां त्यांना इच्छा ही मुलगी झाली. नंतर ती इच्छा कामरूपी तारुण्यात आली. या वेळी तिचे द्वेषाशी लग्न लावले. त्या दोघांपासून द्वंद्वमोह जन्मला. मग त्याचा आजा जो अहंकार त्याने त्याला वाढविले.



असे निर्माण झालेले द्वैत फक्त आत्मज्ञानानेच नाहीसे होईल आणि अशा अद्वैत आत्मरूप अवस्थेला जो पोहोचेल त्याने कुठलाहि संग करू नये.

**न करी रे संग राहे रे निश्चळ ।**
**लागो नेदी मळ ममतेचा ॥** तु.म.३३२८

अर्थ :- अरे, तूं (देहादि प्रपंचाची) आस, धरूं नकोस आणि आत्मस्वरूपी स्थिर रहा. तसेच आपल्या वृत्तीला ममतेचा किंचितहि मळ लागू देऊं नकोस.

आतां सर्वत्र एक सत्ता झाल्यामुळे ममता कशी राहील ?

**जगदाकारी झाली सत्ता । वारोनी गेली पराधीनता ॥**
**अवघे आपुलेंचि आतां । लाज आणि चिंता दुरावली ॥** तु. म. ६८६

अर्थ :- सर्व जगताच्या आकाराने एक आत्मसत्ताच प्रगट झाली आहे. या बोधाने, संकुचित भावनेमुळे देहादि प्रपंचाविषयी असलेली परतंत्रता नाहीशी झाली. आतां सर्व कांहीं एक आपलेच स्वरूप आहे; असा भाव प्रगट झाल्यामुळे लज्जा आणि चिंता नाहींशी झाली आहे.

**निर्मानमोहा जितसङ्गदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।**
**द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पदमव्ययंतत् ॥** गी.१५-५

अर्थ :- मनमोहरहित संगरूपी दोष जिंकलेल्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणी ज्यांची नित्य स्थिती आहे, असे सर्व काम पूर्णपणे निवृत्त झालेले, सुख व दुःख नांवाच्या द्वंद्वापासून कायमचे मुक्त झालेले, असे ज्ञानी त्या अच्युतपदापर्यंत जातात.

तात्पर्य, कामनारहित, द्वैतरहित भक्ति केल्याने वर उल्लेखिलेल्या

बोधाप्रत साधक जाऊं शकतो. नंतर त्याला त्या बोधाचाहि विसर पडतो, पण नामाचा मात्र विसर पडत नाहीं. तो सतत अद्वैतभजनात तल्लीन होऊन राहतो.

**विषयीं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ।। माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ।। तु. म. ४००५**

अर्थ :- तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या अंगीं ब्रह्मरस ठसल्यामुळे सर्व विषयांचा मला समूळ विसर पडला आहे आणि या श्रीहरीच्या नामाच्या छंदामुळे माझी वाचा ही माझ्या आवरण्यापलीकडे गेली आहे. ती सतत नामच घेत आहे.

हीच संतांची अद्वैत स्थिती असते आणि ती अवस्था सर्वांची व्हावी यासाठीच ज्ञानेश्वर महाराजांनी अत्यंत सुलभ, सोपा, सुकर परंतु सर्वमान्य उपाय सांगितला आहे.

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।**
**पुण्याची गणना कोण करी ।। धृ ।।**

**रामकृष्णहरि जय जय रामकृष्णहरि ।**

**- समाप्त -**

* * *

## * अभंग दहावा *

**त्रिवेणीसंगर्मी नाना तीर्थे भ्रमी ।**
**चित्त नाहीं नामीं तरी तें व्यर्थ ।। १ ।।**
**नामासीं विन्मुख तो नर पापिया ।**
**हरिवीण धावया न पवे कोणी ।। २ ।।**
**पुराणप्रसिद्ध बोलिले वाल्मिक ।**
**नामे तिन्ही लोक उद्धरती ।।३।।**
**ज्ञानदेव म्हणे नाम जपा हरीचे ।**
**परंपरा त्याचे कुळशुद्ध ।। ४ ।।**

अर्थ :- हरीच्या नामाकडे चित्त नाहीं आणि गंगा, यमुना, सरस्वती या तीन नद्यांचा संगम जो प्रयाग त्या प्रयागास जातो, अथवा दुसऱ्या अनेक तीर्थयात्रा करतो; तर त्याचे तें करणे व्यर्थ होय. ।। १ ।। जो हरीच्या नामाविषयीं विन्मुख आहे, म्हणजे तें नाम कधीहि घेत नाहीं, तो मनुष्य पापी होय. संकट आले असतां त्याला सोडविण्यास हरिवांचून कोणीच धावणार नाहीं. ।। २ ।। भगवंताच्या नामाने पातकांपासून त्रैलोक्याचा उद्धार होतो, असे वाल्मिकींनी रामायणांत सांगितलें आहे. ।।३ ।। ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरीच्या नामाचें जो भजन करतो, त्याच्या सर्व वंशाचा उद्धार होतो. ।। ४ ।।

**विवरण :**

**त्रिवेणी संगमीं नाना तीर्थे भ्रमी । चित्त नाहीं नामी तरी तें व्यर्थ ।।**

मागील अभंगांतील असा विषय आहे कीं, सर्व साधनांमध्ये नामस्मरण हे साधन श्रेष्ठ आहे. तोच विषय पुढे चालवितात.

चरणीं गंगा जन्मली अहिल्या उद्धरली । नामें प्रतिष्ठा पावली गिरीजा ।। सकळ साधना वरिष्ठ हे नाम । मा मनी भाव न धरी दुजा रे रे । नारायण नाम नारायण नाम । नारायण नाम म्हण का रे रे ।। धृ ।। ज्ञा. म.

शास्त्रांमध्यें साधनांचे दोन प्रकार सांगितले आहेत.

१) अंतरंग साधन २) बहिरंग साधन

यातील बहिरंग साधनांपैकी तीर्थादिकांची नामाबरोबर तुलना करतात. उदा. जसे वेदाध्ययनाचे साध्य पंडित होणे हे नसून प्रतिपाद्य विषय जो ईश्वर तो प्राप्त करून घेणे हे खरे साध्य आहे.

**तैसा प्रतिपाद्यु जो ईश्वरु । तो होआवयालागी गोचरु ।**
**श्रुतीचा निरंतरु । अभ्यासु करणें ।।** ज्ञा. १६-१०३

**अर्थ :** - श्रुतींच्या प्रतिपादनाचा मुख्य विषय जो ईश्वर, त्याचा साक्षात्कार होण्याकरिता श्रुतींचा नेहमी अभ्यास करणे.

त्याचप्रमाणे तीर्थयात्रादिक हे केवळ भटकंती अथवा देशाटन नसून, त्यांचा अंतःकरण शुद्धीकरिता उपयोग होतो. तुकाराम महाराज म्हणतात -

**जवं हें सकळ सिद्ध आहे । हात चालावया पाय ।**
**तंव तूं आपुले स्वहित पाहें । तीर्थयात्रें जाय चुकों नको ।।** तु. म. ७२२

**अर्थ :** - अरे जना, जोपर्यंत इंद्रियासह हा देह सुदृढ आहे. हात हे देण्याघेण्यास व पाय हे चालण्यास समर्थ आहेत, तोपर्यंत तूं आपल्या स्वहिताचा विचार कर व तीर्थयात्रेला जाण्यास चुकूं नको.

**इतर साधनापेक्षा त्रिवेणीसंगमांत केलेले स्नान श्रेष्ठ मानले जाते. याठिकाणी जीव दिला तरी आत्महत्येचे पातक लागत नाहीं.**



विठ्ठलपंत आणि रखुमाईंनी याठिकाणींच आपले देह समर्पित केले. असे असूनहि ज्ञानेश्वर महाराज तीर्थयात्रेचा अथवा त्रिवेणीसंगम स्नानाचा निषेध कां करतात ? तर त्याचे कारण असे आहे कीं, या तीर्थाटनाने अहंता वाढते व अहंता ही सर्व दोषांची जननी आहे. परिणामी साधक भक्तिपराङ्मुख होतो.

**करिता तीर्थाटनें अहंकाराची प्राप्ती वो ।। निळोबाराय**

एक गृहस्थ चार धाम यात्रेला जाऊन आला पण त्याने वेश्येलाही बरोबर नेले होते. आतां त्याचे पाप कसे जाईल ? याने पापातून मुक्ति तर होत नाहीं उलट पापराशी दुप्पट होतात.

**अन्यत्रींचें तीर्थीं नासे । तीर्थीं वसे वज्रलेप ।।** तु. म.२६१२

अर्थ : तुकाराम महाराज म्हणतात, इतर देशांत केलेल्या पापाचे क्षालन तीर्थांत होते. पण तीर्थांच्या ठिकाणी केलेले पाप ( वज्रलेप ) कधीहि जात नाहीं असे होते.

**अन्यक्षेत्रे कृतं पापं पुण्यक्षेत्रे विनश्यति ।**
**पुण्य क्षेत्रे कृतं पापं वज्रलेपं भविष्यति ।।**

सिंहस्थ पर्वणी आली म्हणजे लोक गोदाकाठाकडे धांवत सुटतात.

**आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्यां भटां झाली धणी ।। १ ।।**
**अंतरीं पापाच्या कोडी । वरि वरि बोडी डोई दाढी ।। २ ।।**
**पाप गेल्याची काय खूण । नाहीं पालटले अवगुण ।। ३ ।।**
**भक्तिभावेविण । तुका म्हणे अवघा शीण ।। ४ ।।** तु. म. २७४७

**अर्थ :-** सिंहस्थ पर्वणी आल्यावर गोदातटाकावरील क्षेत्रस्थ भटांची व न्हाव्यांची खूप चंगळ उडते. (त्यांना खूप पैसा

मिळतो.) अंतःकरणांत कोट्यावधी पापांचे थर आहेत. असे असतांना अनेक लोक वर वर डोकी दाढी यांचे मुंड करतात, त्या मुंड करण्याने काय होणार आहे ? अंतरीचे पाप गेल्याची काय खूण ? तुझ्यामधील अवगुण तर कांहींच गेले नाहीत. तुकाराम महाराज म्हणतात; हरीची भक्ति श्रद्धेनें करण्यावांचून बाकीचे सर्व व्यवहार **श्रमदायक** आहेत.

तीर्थयात्रा केल्याने अहंता वाढते अभिमान वाढतो हे पूर्वी सांगितले आहेच. आता दृष्टांताने पाहूं.

एक गृहस्थ काशीला जाऊन आले, त्यांच्या मित्राने विचारले, कां हो तुम्ही काशीला जाऊन कोणता अवगुण सोडला ? ''तेव्हां ते गृहस्थ म्हणाले, ''अहो मी तेथे क्रोध (राग) सोडून आलो.'' त्या मित्राने परत विचारले कीं खरंच राग सोडला काय ? त्यावर तें म्हणाले, अहो, शपथेवर सांगतो मी राग सोडला. त्या माणसाने पुन्हा विचारण्याचा जास्तच आग्रह केला, तेव्हां त्या गृहस्थाने जोडा कांढला व विचारणाऱ्या मित्रास मारावयास धांवला. तेव्हा मित्र म्हणाला, ''अहो, असे काय करता ? तुम्ही तर राग सोडला होता ना ?'' तात्पर्य - **अंतरीचें धावें स्वभाव बाहेरी । धरीताहे परी आवरेना ।** मूळ जे दुर्गुण आहेत. तें कांहीं केल्या सुटत नाहींत. कितीहि तीर्थयात्रा केल्या तरी काय उपयोग ? कांहीं लोक क्षेत्राच्या ठिकाणीं जाऊन दानधर्म करतात.

**वांटिले तें धन । केली अहंता जतन ॥** तु. म. २९१४

तुकाराम महाराज म्हणतात, दानधर्माच्या नांवाखाली धन वाटले व मी मोठा दाता आहे अशी अहंता जतन केली.

भगवंताच्या नामास्मरणामध्ये चित्त नसेल व तीर्थयात्रा



करतांना भाव, प्रेम नसेल तर ते सर्व फुकट आहेत, असे ज्ञानेश्वर महाराज प्रथम चरणांत सांगतात.

**त्रिवेणी संगमीं नाना तीर्थें भ्रमीं । चित्त नाहीं नामी तरी तें व्यर्थ ॥ १ ॥**

म्हणजे भक्तीचे अवडंबर न माजवता झाकलेली भक्ति करावी. कारण भक्तिधर्माचा विस्तार जर वाचेच्या चव्हाट्यावर केला तर तो धर्मच अधर्म होऊन बसतो.

**दंभाची घांटी पडल्या ठायीं । घांटा दिसें परी दाना नाहीं ।**
**कामक्रोधांच्या उदरीं पाहीं । मूळाच्या ठायीं करांडिलें ॥** ए.म.१०-५१७

**अर्थ :** - हरबऱ्याच्या झाडाला आलेले फळ त्याला घाटा म्हणतात. त्यामध्ये कांहीं घाटें फार मोठे दिसतात. पण दाबून पाहिले असता आंतमध्ये दानाच नसतो. त्या घाट्याप्रमाणे दांभिक लोक बाहेरून त्यांच्या भक्तीचा पसारा भासवितात पण अंतरंगात हरिविषयीं प्रेमाचा अभाव असतो. म्हणून तीर्थयात्रा करून परमार्थाचा डांगोरा पिटण्यापेक्षा शांतपणे एका ठिकाणी बसून एकचित्त करावे व भगवंताला आळवावे.

ठायींच बैसोन करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥

कोणतेहि तीर्थाटन न करता आहे त्या ठिकाणीच जर भगवच्चिंतन केले तरी त्याचे फल मोठे आहे. या नामचिंतनाचे फल तुकाराम महाराज सांगतात.

**तीर्थभ्रामकांसी आणीन आळस ।**
**कडू स्वर्गवास करीन भोग ॥** तु. म. ६७०

**अर्थ :** - तुकाराम महाराज म्हणतात, या नामसंकीर्तनाच्या योगाने मी तीर्थयात्रा करणाऱ्या लोकांना आळस आणीन व इंद्रादिक

देवांना स्वर्गांत राहणे व तेथील दिव्य भोग भोगणे कडू वाटावयास लावीन.

तीर्थांत बुड्या मारल्याने जर उद्धार झाला असता तर त्या पाण्यात बेडक्याहि असतात. त्यांचाहि उद्धार झाला असता. पण तसे होत नाहीं. मनाला भवरोग लागल्यामुळे मनशुद्धीकरीता प्रयत्न करावे. रोग मनाला लागलेला आहे म्हणून क्षालन मनाचे कराव लागेल. तीर्थांच्या स्नानानें बाह्यतः शरीर धुतल्याने पूर्ण पापाच क्षालन होऊं शकत नाहीं.

बाह्य शुद्धतेकरिता तीर्थस्नानाचीहि गरज आहे. तसेच त्यामुळे अंतःकरणशुद्धीहि होते. हें पूर्वी सांगितले आहेच

तीर्थें बाह्यमळु क्षाळे । कर्में अभ्यंतर उजळे ।
एवं तीर्थें जाण निर्मळे । सत्कर्मेंचि ॥ ज्ञा. १८-१६०

**अर्थ :** – तीर्थांच्या योगाने बाहेरील शरीरावरील मळ धुतला जातो व कर्मांने चित्तशुद्धी होते. याप्रमाणे ''सत्कर्में हीच पवित्र तीर्थें आहेत. असे समजावें.''

तीर्थयात्रा कोणी कराव्यात ? कीं ज्याच्या विषयवासना सुटत नाहींत. घरादाराचा मोह सुटत नाहीं. असा जो घरकोंबडा ( विषयासक्त ) त्याने विषयाची व आपली ताटातूट व्हावी म्हणून तीर्थयात्रा केल्या पाहिजेत. लोक तीर्थयात्रा करतात पण विषय आपल्यावरोबरच घेऊन जातात. बायका-पोरे सोबत घेऊन जातात व संसाराचा बाजार खरेदी करून आणतात. तुकाराम महाराज तीर्थयात्रा कशी करावी ते सांगतात

**विषय गुंडोनी पसारा । धांव घ्यारे पंढरपुरा ॥** तु. म. २५७६



**अर्थ :** – सर्व लौकिक विषयांचा पसारा गुंडाळून त्वरेने पंढरपूरास धांवत जा. लोक पंढरपुरला गेले तरी त्यांच्या विषयाच्या गप्पा सुटत नाहीत. पंढरपुरला गेल्यानंतर परत पुन्हा जाण्याची वेळ पडत नाही असे तुकाराम महाराज सांगतात.

**तुका पंढरीसी गेला । पुन्हा जन्मा नाहीं आला ॥** तु. म.२५९७

**अर्थ :** – तुकाराम महाराज म्हणतात, मी पंढरीला गेलो, तो परत जन्माच्या गांवांस (जन्माला) आलोच नाहीं.

**पंढरीसी जाय । तो विसरे बापमाय ॥** तु. म. २६०१

**अर्थ :** – जो (मनोभावाने) पंढरीस जातो, तो देवाचे दर्शन झाल्यावरोबर आपल्या आईवडिलादि गणगोतास विसरतो.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, जो हरीच्या नामाविषयीं विन्मुख आहे, तो मनुष्य पापी आहे. संकट आले असता त्याला सोडविण्यास हरिवांचून कोणीच धांवणार नाहीं.

**नामासीं विन्मुख तो नर पापिया । हरिवीण धावया न पवे कोणी ॥**

ज्या भगवन्नामाने इहपरलोकांमध्ये कल्याण होणार आहे. अशा नामाकडे लोक लक्ष देत नाहीत. तें पापीच समजावे. कारण जीवाचे सार्थक नामातच आहे आणि संकटांतून आपली सुटका करणारा एकमेव परमात्माच आहे.

**तुका म्हणे तुला सोडविना कोणी ।**
**एका चक्रपाणी वांचोनियां ॥** तु. म. ३३८२

**अर्थ :** – तुकाराम महाराज म्हणतात, ज्याने आपल्या हातात चक्र धारण केले आहे; त्या श्रीहरीवांचून तुला कोणी सोडविणार नाहीं.

महाकवी वाल्मिकींनी पुराणांत सांगितलेच आहे कीं, नामाने स्वर्ग, मृत्यु, पाताळ या तिन्ही लोकांचा उद्धार होतो.

**पुराण प्रसिद्ध बोलिले वाल्मिक। नामे तिन्ही लोक उद्धरती ॥ ३ ॥**

नामस्मरणाने साधन चतुष्ट्य संपन्न उद्धरतील यांत कांहीं नवल नाहीं. पण तुकाराम महाराज म्हणतात.

**तुका म्हणे जीव आसक्त सर्वभावें ।**
**तरतील नांवें विठोबाच्या ॥** तु. म. २४८५

**अर्थ :** - संसाराच्या ठिकाणी आसक्त असणाऱ्या जीवांनी कायावाचामनें विठोबाचे नामचिंतन केले तर ते भवसागरातून तरतील.

**अंतकाळींचा सोयरा। तुका म्हणे विठो धरा ॥ ४ ॥** तु. म.२९८४

**अर्थ :** - तुकाराम महाराज म्हणतात, मरणसमयीं तातडतोब धांवून येणारा व त्यातून सोडविणारा जो विठ्ठल परमात्मा आहे, तोच एकमेव खरा सोयरा आहे; ह्याकरिता त्याच्या पायाचा आश्रय करा.

**सोडवील माझा स्वामी निश्चयेंसीं ।**
प्रतिज्ञा हे दासीं केली आम्ही ॥ तु. म.२४३०

**अर्थ :-** माझा स्वामी पांडुरंग तुम्हाला खात्रीने संसार बंधनातून सोडवील हें आम्ही सेवक प्रतिज्ञापूर्वक सांगतो.

आतां इतर साधनांनी एकट्या साधकालाच काय तो फायदा होईल. परंतु नामसाधनाच्या फलाची व्याप्ती अमर्याद आहे. यामध्ये साधक तर उद्धरतोच परंतु परंपरेने त्याच्या कुळामध्ये पूर्वी असलेले ( होऊन गेलेले ) त्याचे पूर्वज देखील उद्धरतात. हेच अभंगाच्या चतुर्थ चरणांत सांगतात -



**ज्ञानदेव म्हणे नाम जपा हरीचे। परंपरा त्याचे कुळ शुद्ध ॥ ४ ॥**

तुकाराम महाराज तर याहिपेक्षा पुढे जाऊन सांगतात.

**तरतील कुळें दोन्हीं उभयतां ।**
**गातां आइकतां सुखरूप ॥** तु. म. २०९२

**अर्थ :-** जे कोणी हरिकथा गातील किंवा ऐकतील ते सुखरूप होतील व त्यांची दोन्ही कुळे (आईवडिलांची) उद्धरून जातील.

**तुका म्हणे कोटी कुळे ती पुनीत ।**
**भावें गाता गीत विठोबाचे ॥** तु. म. २४८५

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, विठोबाचे नाम मोठ्या प्रेमानें गाईलें तर त्यांची कोट्यावधी कुळें पुनीत होतात.

**मातृ पितृ भ्राता सगोत्र अपार। चतुर्भुज नर होऊनि ठेले ॥**

तो साधक तर नामस्मरणाने उद्धरतोच पण त्याचे आई, वडील, बंधु व कुटुंबातील सर्वच लोक चतुर्भुज होतात, म्हणजे परमात्मस्वरूपी एकरूप होऊन जातात.

आता, इतर साधनांच्या तुलनेत नामसाधन कसे व किती श्रेष्ठ आहे, हे सांगणारा तुकोबारायांचा एक सुंदर असा अभंग पाहू.

**समुद्रवलयांकित पृथ्वीचें दान। करितां समान नये नामा ॥ १ ॥ म्हणऊनि कोणी न करावा आळस। म्हणा रात्रंदिवस रामराम ॥ २ ॥ सकळही शास्त्रें पठन करितां वेद। सरीं नये गोविंद नामें एकें ॥ ३ ॥ सकळही तीर्थें प्रयागादि काशी ॥ करितां नाभाशीं तुळति ना ॥ ४ ॥ कर्वतीं कर्भरीं देहासी दंडण। करितां समान नये नामा ॥ ५ ॥ तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार। नाम हेंचि सार विठोबाचें ॥ ६ ॥** तु. म.२४८८

**अर्थ :-** समुद्राने वेष्टिलेल्या पृथ्वीचे दान केले तरी त्याने हरिनाम चिंतनाची बरोबरी होत नाहीं. ह्याकरिता तें नाम घेण्याचा आळस करू नये, रात्रंदिवस राम राम असे म्हणावे. सकळ शास्त्रसहवर्तमान वेदांचे पठण केले तरी तें गोविंदाच्या एका नामाच्या तुलनेस येत नाहीं. प्रयाग, काशीसहवर्तमान सर्व तीर्थांची जरी पायीं यात्रा केली, तरी ती नामाच्या तुलनेस येत नाहीं. करवतीने अगर एखाद्या तीक्ष्ण शस्त्रानें गळा कापून घेण्यासारखे देहदंडण केले, तरी देखील हरिनामाची बरोबरी होत नाहीं. तुकाराम महाराज म्हणतात, विठोबाचे नाम हें एकमेव सार आहे, असेच श्रेष्ठ लोक ( साधुसंत ) परंपरेने मानीत आले आहेत.

सारांश, जर एका हरिनामाची एवढी श्रेष्ठता असेल आणि तें जर एवढे सुलभ, सहजसुंदर, सुखदायक असेल तर सर्व लोकांनी नाम घेण्याची, नामस्मरणाची त्वरा कां करू नये ? यासाठीच ज्ञानेश्वर महाराज अखिल जनादिकांना उद्धाराचा हा सुलभ मार्ग सांगतात -

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।**
**पुण्याची गणना कोण करी ॥ धृ ॥**

**- समाप्त -**

* * *

## * अभंग अकरावा *

**हरिउच्चारणीं अनंत पापराशी ।**
**जातील लयासी क्षणमात्रें ॥ १ ॥**
**तृण अग्निमेळें समरस झाले ।**
**तैसें नामें केलें जपतां हरी ॥ २ ॥**
**हरिउच्चारण मंत्र हा अगाध ।**
**पळे भूतबाधा भेणें तेथें ॥ ३ ॥**
**ज्ञानदेव म्हणे हरि माझा समर्थ ।**
**न करवे अर्थ उपनिषदां ॥ ४ ॥**

**अर्थ :-** हरिनामाचा जप केल्याने अनंत पापाच्या राशी एका क्षणांत नाहींशा होतात. ॥ १ ॥ गवताचा व अग्नीचा संबंध झाला कीं तें गवत अग्नीरूप होतें, त्याप्रमाणें हरीचा जप करीत असलें म्हणजे जपणारा हरिरूपच होतो. ॥ २ ॥ हरि या नाममंत्राच्या उच्चाराचे सामर्थ्य अपूर्व आहे. त्याच्या धाकाने भूतबाधा ( पिशाच्चबाधा ) नाहीशी होते. इतकेच नव्हे तर जीवाच्या मागे लागलेला पंचमहाभूतात्मक देहाविषयींचा जो अहंकार त्याची देखील बाधा दूर होते, म्हणजे हरिनामाने देहाभिमानाचा नाश होतो. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझा हरि सामर्थ्यवान आहे. त्याच्या स्वरूपाचा यथार्थ निर्णय उपनिषदांनाहि झाला नाहीं. ॥ ४ ॥

### विवरण :

**हरिउच्चारणीं अनंत पापराशीं । जातील लयासी क्षणमात्रें ॥ १ ॥**

भगवन्नामानें कोट्यावधी पापें नाहीशी होतात. तो त्यापूर्वी कितीहि पापी असो. याचा अर्थ पुन्हा-पुन्हा पापें करीत रहावीत असे

नाही. कांहीं लोकांचा असा समज आहे कीं आषाढी आणि कार्तिकी या दोन महावाऱ्यांना देवाचे दर्शन घेतले कीं पुरे, मग वाटेल तितके खोटे बोलावे; वाटेल तितके पाप करावे, असा याचा अर्थ नाहीं तर ही समजूत फारच चुकीची आहे. उदा. ब्राह्मणाने सकाळी संध्या केली की रात्रीचे पाप जाते व संध्याकाळी संध्यां केली कीं दिवसभराचे पाप जाते. असे त्या संध्येत सांगितले आहे. परंतु त्याचा अर्थ पुन्हा पाप करण्यास मोकळीक आहे असे नाहीं. नकळतपणे व अनावधानाने घडलेली जी पापें असतात, त्यांचा क्षय वरील दोन उपायांनीं होतो. जाणून केलेल्या पापातून तर मुक्तता नाहीच. तें तर वज्रलेप होऊन बसते. त्याचे फल निश्चितच भोगणे आहे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, कीं जीवाकडून त्याच्या अज्ञानामुळे जी पापें घडतात, मग त्यांच्या राशी कां असेनात, एका हरीच्या नामाने नाश पावतात. एवढे 'हरि' या नामाचे सामर्थ्य आहे.

आता 'हरि' या शब्दाचा थोडा इतिहास व महती पाहूं. व्यवहारांत हरि-हरि म्हणणे, याचा अर्थ 'कांहींच न करतां कालक्षेप करणे' असा दुर्दैवाने होऊन बसला असला तरी 'हरि' या दोन अक्षराच्या उच्चाराला वेद, शास्त्रें, पुराणें व संतवाङ्मयातून फार मोठी किंमत दिली गेली आहे.

भगवान विष्णूंच्या सहस्रनामांतीलच 'हरि' हे एक नाम आहे.

**अतुलः शरभोभीमः समयज्ञो हविर्हरिः ।।** (विष्णुसहस्रनाम)

पण हरि या नांवाला एक विशेष प्रकारचे महत्त्व आहे. हरि हे नाम वारकऱ्यांना तर प्राणाहून प्रिय आहे.

वेदांमध्ये हरि या शब्दाचा वारंवार उल्लेख आढळतो. एवढेच नाहीं तर वेद पठन सुरु करण्यापूर्वीच 'हरिः ॐ' या शब्दाने सुरुवात करावीच लागते; हे आपण प्रस्तुत ग्रंथाच्या उपोद्घातामध्ये सोदाहरण पाहिले आहे.



'हरिः ॐ' या शब्दद्वयांपैकी उपनिषदांमध्ये ॐ चे महत्त्व वर्णन केले आहे. कठोपनिषद् व मांडुक्योपनिषद् हे तर 'ॐ' या अक्षरातील मात्रांचे विश्लेषण करतात. परंतु 'हरि' हा शब्द ॐ या शब्दाच्या योग्यतेला केव्हां येऊन बसला हे सांगणे कठीण आहे.

कलिसंतरणोपनिषदांत हिरण्यगर्भ नारदांना त्यांच्या विचारण्यावरून कलिकल्मष धुवून टाकणारे नारायणाचे षोडशकलात्मक नाम म्हणून पुढील ऋचा सांगतात -

**हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।**
**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।।**

नक्रापासून गजेंद्रास सोडविण्यासाठी भगवंतांनी घेतलेल्या हरी अवताराचे वर्णन करणारे श्रीमद् भागवत स्कंध-२, अध्याय ७ वा, श्लोक १५ व १६ प्रसिद्ध आहेत.

ब्राह्मणांच्या संध्येतील चोवीस नांवात 'हरि' आहेच. अद्वैत मतसंस्थापक भगवत्पूज्यपाद श्रीमदाद्यशंकराचार्य यांचे बेचाळीस श्लोकांचे हरिमीडे स्तोत्र प्रसिद्ध आहे.

ज्ञानेश्वर महाराजांनी गीतेतील नवव्या अध्यायातील चौदाव्या श्लोकावर व्याख्यान करतांना ( **सततं कीर्तयन्तो माम्** ) महात्मे ज्या नामांचे संकीर्तन करीत असतात, त्या नामांमध्ये 'हरि' या नामाचा अंतर्भाव केला आहे. **कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामाचे निखळ प्रबंध ।** तुकाराम महाराजांना श्रीगुरूंचा अनुग्रह होऊन मिळालेला जो प्रसिद्ध मंत्र त्यामध्ये सुद्धा 'हरि' या नामाचा अंतर्भाव आहेच.

**....... मंत्र दिला रामकृष्ण हरि ।। ६ ।।**

तात्पर्य, आतापर्यंत 'हरि' या नामाचा व त्याचे इतिहासाचा जो ओझरता आढावा घेतला आहे, त्यावरून असे दिसून येईल की 'श्रीविठ्ठल' या नामाइतकेच महत्त्व 'हरि' या नामाला आहे. याचे कारण एक असेहि सांगता येईल कीं, हरि या नामाचा अर्थ ''दुःख हरण करणारा'' असाहि होतो.

सामान्य माणसे संसार दुःखानें त्रस्त झाली आणि व्यवहारिक उपाययोजनेने दुःखनिवृत्ती होत नाहीं असे दिसले कीं देवाकडे धांव घेतात. म्हणूनच 'दुःख हरण करणारा' असा अर्थ भगवंताच्या ज्या नामातून ध्वनित होतो ते नाम चटकन् डोळ्यासमोर येते व वारंवार उच्चारिलें जाते.

श्रीमद्भागवतातीलच दुसरा पुरावा असा देता येईल कीं, वर उल्लेखिलेल्या द्वितीय स्कंधातील सातव्या अध्यायात भगवंताने 'सुयज्ञ' हा अवतार घेतल्याची कथा आहे व तेथे असे म्हटले आहे कीं, सुयज्ञ नामक अवतारामध्ये भगवंतांनी तिन्ही लोकांतील मोठमोठी संकटें हरण केली. म्हणून स्वायंभू मनुने त्या अवताराला 'हरि' या नांवाने संबोधिले.

वास्तविक हरि या नामाचे वारकरी सांप्रदायामधील महत्त्व पाहता, त्याच्या उत्पत्तीची सिद्धता करण्याची अजिबात गरज नाहीं. फक्त चिकित्सक समीक्षकांच्या समाधानासाठी हा उपरोक्त प्रयत्न आहे, असो. तर अशा या श्रेष्ठ हरिनामाचे महत्त्व, सुलभता आणि फल विशद करणारा हा ग्रंथ म्हणजे माउलींनी स्त्रीशूद्रादिकांना परमार्थ मार्गाला लावण्यासाठी दाखविलेला सर्वांग सुंदर मार्ग होय.

प्रस्तुत अभंगाच्या प्रथम चरणांत ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

**हरि उच्चारणीं अनंत पापराशीं । जातील लयाशी क्षणमात्रें ॥ १ ॥**



या हरिनामोच्चारानें मागील अनंत पापांच्या राशींचा एका क्षणांत नाश होतो. तो कसा होतो तें दुसऱ्या चरणांत दृष्टांतानें सांगतात -

**तृण अग्निमेळें समरस झाले । तैंसे नामें केले जपता हरी ॥ २ ॥**

तृण म्हणजे गवत व अग्नि यांचा संयोग झाल्यावर गवत जसे जळून भस्म होते, नव्हे अग्निरूपच होते, तद्वत् हरिनामस्मरणाने पापी पुरुषांची अनंत पापें संपूर्ण नष्ट होऊन ते हरिरूप होतात.

हरिनामाचा उच्चार हा अत्यंत श्रेष्ठ मंत्र होय. त्या मंत्राच्या भितीने भूतबाधा पळून जाते. तें तृतीय चरणांत सांगतात.

**हरि उच्चारण मंत्र हा अगाध । पळें भूतबाधा भेणें तेथें ॥ ३ ॥**

हरिनाम हा मंत्र श्रेष्ठ आहे. इतर मंत्रात फायदे कमी व विघ्नेच फार असतात, हा विचार पूर्वी सांगितलाच आहे. प्रस्तुत ज्ञानेश्वर महाराजांचा एक अभंग आहे, त्यातील कांहीं भाग पाहूं.

**अशौचिया जपो नये । आणिकाते ऐको नये । ऐसिया मंत्राते जग बिहे । त्याचे फळ थोडे परी क्षोभणें बहु । ऐसा मंत्रराज नव्हे रे रे ॥ नारायण नाम नारायण नाम । नारायण नाम** म्हण का रे रे ॥ धृ ॥ ज्ञा. म.

इतर जे मंत्र असतात, त्यांच्या जपण्याचे विचित्र नियम असतात. कांहीं मंत्र शुचिर्भूत होऊनच जपावेत. नाहीतर त्यापासून विघ्नें उत्पन्न होतात. कांहीं मंत्र जपतांना इतरांना आवाज जाऊं नये अशा मंत्रांचे फळ नाममात्र परंतु तोटेच जास्त. तसा हा मंत्रराज नाहीं असे सांगतात. या मंत्राचा जप कोणीहि, केव्हाहि, कोठेहि आणि कसेहि घेऊ शकतो.

जर हा मंत्रच एवढा सामर्थ्यवान् आहे, तर या मंत्राचा धनी किती समर्थ असेल ? हेच अभंगाच्या चतुर्थ चरणांत सांगतात -

**ज्ञानदेव म्हणे हरि माझा समर्थ । न करवे अर्थ उपनिषदां ॥ ४ ॥**

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझा हरी सामर्थ्यवान् आहे. 'समर्थ' म्हणजे काय ? तर **''कर्तुं अकर्तुं अन्यथा कर्तुम्''** अशी ज्याची शक्ती आहे तो समर्थ.

**कर्तुम् शक्ति** - सामान्यांकडून जी गोष्ट होणे शक्य नाही, ती करून दाखविणे. उदा. चित्रविचित्र जगत् निर्माण करणे.

**जेणे हे विश्व निर्मियेले । महर्षी देवा संस्थापिले ।**
**एकवीस स्वर्गातें धरिलें । सत्तामात्रें आपुलियां ॥** तु. म.२५९८

**अकर्तुम् शक्ति** :- सामान्य अथवा मोठा कर्तबगार माणूस असून सुद्धा त्याच्याकडून न होणारी गोष्ट करवून घेणे.

**अहो रानींचिया पालेखाइरां । नेवाणें करविले लंकेश्वरा ।**
**एकला अर्जुन परी अक्षौहिणी अकरा । न जिणेचि काई ॥** ज्ञा.११-२३

**अर्थ** :- अहो, राणातील पाले खाणाऱ्या वानरांकडून लंकेचा राजा त्याचा पराभव केला गेला व अर्जुन एकटाच होता पण त्याने अकरा अक्षौहिणी सैन्य जिंकले नाही काय ?

**अन्यथा कर्तुम् शक्ति** :- जे कृत्य शास्त्रदृष्टीने किंवा मनुष्य दृष्टीने अधर्म ठरेल तें कृत्य शास्त्रसंमत किंवा व्यवहारसंमत ठरवून दाखविणे.

**पंचभ्रतार द्रौपदी ते सती । करितां पितृशांती पुण्य धर्मा ॥** तु. म. ९४८

**अर्थ** :- पांच पांडव हे जिचे पती आहेत ती द्रौपदी पतिव्रता कशी ? व सर्व गोत्रजांचा नाश करणारा धर्म हा पुण्यवान कसा ? म्हणजे या सर्व अगम्य न घडणाऱ्या गोष्टी खऱ्या ठरविण्याची जी शक्ति आहे ती त्या भगवंताजवळ आहे. त्याच्या कृपेने हे सर्व शक्य आहे.



असा समर्थ असणारा हरि स्वतः एक गूढ आहे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, **न करवे अर्थ उपनिषदां** ।। म्हणजे उपनिषदांना हरीचा अर्थ लागला नाही असे नाही. उपनिषदें तर सर्व शास्त्रांचा शिरोभाग आहेत. त्यामध्ये तर विशेष ज्ञान सांगितले आहे.

**उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंदें ।**
**तियें कुसुमें मुकुटीं सुगंधें । शोभती भलीं ॥** ज्ञा.१-१८

**अर्थ** :- ज्ञानरूप मध देण्यात उदार असलेली ईशावास्यादि दशोपनिषद सुगंधी फुले गंडस्थळावर असलेल्या मुकुटावर चांगली शोभतात.

पण त्यांना परमात्म्याचे स्वरूपलक्षण करता आले नाही.

**पाहे पां जाणिवेचेनि बळें । कोणीं वेदापासोनि असे आगळे ॥**

भगवान सांगतात, अर्जुना, विचार कर ज्ञानसंपन्नतेच्या बाबतीत वेदापेक्षा कोणीतरी श्रेष्ठ आहे काय ? तर नाही, परंतु असे असूनहि **- येथ वेद मुके झाले** । असेहि सांगतात. म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, **न करवे अर्थ उपनिषदां** । असा वेदांनाहि न कळणारा हरी आपल्याला सहज कळू शकतो. त्यासाठी अंतर्मुख वृत्तीने सतत हरिनामाचा जप केला पाहिजे.

हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । **पुण्याची गणना कोण करी ॥ धृ ॥**

**- भावार्थ संपला -**

**व्याख्यान :**

**हरि उच्चारणीं अनंत पापराशी । जातील लयासी क्षणमात्रें ॥**

प्रस्तुत अभंगात ज्ञानेश्वर महाराज नामाचे महत्त्व सांगतात. मनुष्याचे जीवन सन्मार्गानें पापविरहित जाण्यासाठी नामस्मरणाची नितांत गरज आहे. परंतु आपल्या पूर्वपापांचा प्रतिबंध नामस्मरणाच्या

आड येतो व निर्विघ्नपणे नामचिंतन होत नाहीं. मनुष्य पुण्यफलाची अपेक्षा करतो पण पुण्य करीत नाहीं व पापफलाची अपेक्षा करीत नाहीं, **पण पाप मात्र प्रयत्नपूर्वक करतो.**

**पुण्यस्य फलमिच्छन्ति पुण्य नेच्छन्ति मानवाः ।**
**पापस्य फलं नेच्छन्ति पापं कुर्वन्ति यत्नतः ॥**
**तुका म्हणे नाड । पाप ठाके हिताआड ॥** तु. म.३४०५

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, **पूर्वी** केलेले पाप हे मनुष्यास मोठे फसविणारे आहे. ते पापच त्याच्या हिताच्या आड येते. ज्ञानेश्वर महाराजहि सांगतात -

**पूर्वजन्मी पाप केलें तें बहु विस्तारले । विषयसुख** नाशिवंत सेवितां **तिमिर कोंदले । चौऱ्यांशी** लक्ष योनी **फिरतां** दुःख भोगिले । ज्ञानदृष्टी **हारपली दोन्ही नेत्र आंधळे ॥** ज्ञा. म.

पूर्व पापांचा संचय एवढा तीव्र असतो कीं, तो यत्नपूर्वक केलेल्या हितकर्माच्याहि आड येतो व माणसाची नागवण होते.

वास्तविक पूर्वकर्तृत्व हे भोक्तृत्वाला आड येणारे आहे. तन्निवारणार्थ गंगास्नान व ईश्वरनामस्मरण हे प्रायश्चित्त सांगितले आहे. प्रायश्चित्त दोन प्रकारचे असते.

साधारण पापासाठी साधारण प्रायश्चित्त व असाधारण पापाच्या निवृत्तीसाठी असाधारण प्रायश्चित्त.

**१) साधारण प्रायश्चित्त :** ज्ञात-अज्ञात (कळून न कळून) घडलेल्या पातकांचा नाश करण्यासाठी हे प्रायश्चित्त आहे. यामध्ये गंगास्नान व भगवन्नाम ही दोन साधारण प्रायश्चित्ते आहेत.

**नामसंकीर्तन साधन पै सोपें । जळतील पापें जन्मांतरें ॥**

**२) असाधारण प्रायश्चित्त :** विशिष्ट पाप घडले असता त्याच्या निवारणार्थ जे विशिष्ट कर्म करावयाचे असते. उदा. संन्याशाने द्रव्य घेतले असता, द्रव्य त्यागपूर्वक तीन दिवस उपवास करावा लागतो. याला असाधारण प्रायश्चित्त म्हणतात.



या जन्मात केलेली पापें आपल्याला कळतील पण गतजन्मात केलेली पापें कळणार नाहींत, याकरिता शास्त्रानें हे प्रायश्चित्त सांगितले आहे. नाम हे सर्व साधनांत वरिष्ठ आहे असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**सकळ साधनां वरिष्ठ हे नाम । मनीं भाव न धरी दुजा रे रे ।**
**नारायण नाम नारायण नाम । नारायण नाम म्हण कां रे रे ॥** ज्ञा. म.

गंगेचे पावित्र्यहि भगवंतापासूनच आहे. कारण तिची उत्पत्ती परमात्म्याच्या चरणापासून झालेली आहे. मग साक्षात् परमात्म्याचे सामर्थ्य काय सांगावे. म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, **पळे भूतबाधा भेणे तेथे ।** याठिकाणी भूतबाधा ही पंचमहाभूतात्मक संसाराची बाधा असाहि अर्थ होतो आणि या नामाने या पांचभौतिक संसारदेह बाधेपासूनहि मुक्तता होते.

**तुका म्हणे नव्हे बाधा । आणीक कदा भूतांची ॥** तु. म. २४६७

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, या ( नामरूपी ) औषधाने शरीरसंबंधरूप पंचमहाभूतांची बाधा कधीहि होणार नाहीं. पंचमहाभूतांची बाधा म्हणजेच देहरूपाला येणे. नामस्मरणानें पुन्हा देहाला यावे लागत नाहीं. म्हणजे अनिष्ट जो देह त्याची निवृत्ती व इष्ट जो मोक्ष त्याची प्राप्ती होते.

**मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांची ॥** तु. म. २५३४

**अर्थ :-** श्रीहरीच्या नामाची मुखात बैठक झाल्याबरोबर मोक्ष हस्तगत होतो. निश्चयाने प्राप्त होतो, असा पूर्वीचा (अनेकांचा) अनुभव आहे व त्यांनी तो सांगितलेला आहे.

मोक्ष म्हणजे तरी काय, तर सायुज्यता मुक्ति मिळविणे म्हणजे भगवत्स्वरूपी तद्रूप होणे आणि असे भगवद्रूप होणे नामानेच शक्य आहे.

**तुका म्हणे सुख देह निरसनें । चिंतने चिंतन तद्रूपता ॥** तु. म. ३८६५

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, तिन्ही देहांचे (देहाभिमानाचे) निरसन करून श्रीहरीचे चिंतन करावे. त्यायोगाने तद्रूपता प्राप्त होते. मग त्या सुखाला पार नाहीं.

**बीज आणि फळ हरीचें नाम । सकळ पुण्य सकळ धर्म ।**
**सकळां कळांचें हें वर्म । निवारी श्रम सकळही ॥** तु. म. ७१३

**अर्थ :-** श्रीहरीचे नाम हे मुख्य बीज असून फळहि तेच आहे. सर्व पुण्य, सर्वधर्म व सर्व कला प्राप्त होण्याचे वर्महि नामच आहे आणि त्याच्यायोगाने सर्व जन्ममृत्युचे श्रम निवारण होतात.

विशेष म्हणजे मायेचे बंधन जे कीं अतिशय कठीण असले तरी त्यातूनहि नामानेच सुटता येते.

**हरि हरि तुम्ही म्हणा रे सकळ । तेणें मायाजाळ तुटईल ॥** तु. म.२७०८

**अर्थ :-** अहो सकळ जनहो, तुम्ही हरिहरि म्हणा. म्हणजे त्या योगाने तुमच्या सर्व मायाजाळाचा नाश होईल.

असा हा समर्थ परमात्मा नामस्मरणाने अंकित केला जातो कीं ज्याचा अंत वेदालाहि लागत नाहीं.

**तेथील प्रमाण नेणवें वेदांसी । तें जीवजंतूसी केवी कळे ॥**
**वेद जाणो गेला पुढे मौनावला । ते गुह्य तुजला प्राप्त कैसे ॥** ए.म.

अशा या परमात्म्याला जेव्हां नामस्मरणरूपी साधनाने तो जाणला जातो तेव्हां आपणच तद्रूपच होऊन जातो.

**एवं वस्तुशीं जाणो जातां । जाणणेंचि वस्तु तत्त्वता ।**



**मग जाणणे आणि जाणता । कैचा उरे ॥** अमृ.५-१८

**अर्थ :-** ज्ञानेश्वर महाराज सांगतात, वस्तूला ( परमात्म्याला ) जाणावयास गेले असता, जाणणे जे ज्ञान तत्त्वतः वस्तूच ( परमात्माच ) असल्याने जाणणे व जाणतां कोठून उरेल ?

मिठाची हत्तीण करून तिला समुद्राचा ठाव पाहण्यास पाठविले असता ती जशी परत येत नाहीं -

**कां लवणाची कुंजरी । सूदलिया लवणसागरीं ।**
**होयचि ना माघारी । परती जैसी ॥** ज्ञा.१५-३१८

त्याप्रमाणे परमात्म्याला नामसाधनाने पाहो गेले असता तत्त्वतः जीव परमात्मरूपच असणारा पाहता पाहण्याशी एकरूप होतो. जीव परमात्मरूप होतो.

या सर्वसमर्थ परमात्म्याचे नाम हे त्याच्यापेक्षाहि समर्थ आहे. याबद्दल पुष्कळ प्रमाणे देता येतील. तुकाराम महाराज म्हणतात -

**तुझ्या नामाचा महिमा । तुज न कळे मेघःश्यामा ॥** तु.म.२५४६

हे मेघःश्यामा तुझ्या नामाचा महिमा तुम्हालाच कळत नाही. एवढे नाम थोर आहे. त्याचे चिंतन थोर आहे व नामधारक जो असेल त्याचा जन्म धन्य आहे.

याकरिता आपल्या नाशिवंत देहाची सार्थकता करून मरणोत्तर उत्तमगती मिळविण्यासाठी लोकहो, तुम्ही हरि या नामाचा अखंड जप करा. तुमच्या त्या पुण्याची सर दुसऱ्या कोणत्याहि पुण्यास येणार नाही. हा ज्ञानेश्वर महाराजांचा कळकळीचा आग्रह आहे.

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।**
**पुण्याची गणना कोण करी ॥**

**- समाप्त -**

## * अभंग बारावा *

तीर्थ व्रत नेम भावेवीण सिध्दी ।
वायांचि उपाधि करिसी जना ॥ १ ॥
भावबळें आकळे येऱ्हवी नाकळे ।
करतळी आवळे तैसा हरी ॥ २ ॥
पारियाचा रवा घेता भूमीवरी ।
यत्न परोपरी साधन तैसें ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण ।
दिधले संपूर्ण माझे हातीं ॥ ४ ॥

**अर्थ :-** अहो जनहो, कितीहि तीर्थयात्रा केल्या व अनेक व्रत नियमांचे आचरण केलें तरी हरीवर दृढ विश्वास असल्यावांचून ती सफल होणार नाहींत, याकरिता तुम्ही हा व्यर्थ शीण कां करतां ? ॥ १ ॥ हरीच्या ठिकाणी विश्वास ठेवून त्याचे भजन केल्याने तो परमात्मा तळहातावरील आवळ्याप्रमाणे आपल्या हस्तगत होतो, अन्य उपायांनी तो हस्तगत होणार नाहीं. ॥ २ ॥ पारा जमिनीवर पडून त्याचे बारीक-बारीक कण जमिनीवर विखुरले असता ज्याप्रमाणे तें पाऱ्याचे सर्व कण एके ठिकाणी जमवून हातात घेण्याला पुष्कळ प्रयास पडतात, त्याप्रमाणे हरिनामावांचून इतर साधनांनी भगवत्प्राप्ती होण्याला पुष्कळ कष्ट सोसावे लागतात ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात कीं, माझे गुरु श्रीनिवृत्तीनाथ हे गुणत्रयापलीकडील निर्गुण आहेत. त्यांनी आपला सर्व बोध माझ्या स्वाधीन केला. ॥ ४ ॥

**विवरण :** जगात आत्मोद्धाराकरिता अनेक साधनें प्रचलित आहेत. कांहीं देखोवेखी स्वरूपांत रूढ आहेत. कांहीं



वेदशास्त्रानुमोदित आहेत. वेदादिकांनी सांगितलेल्या साधनांत कांहीं बहिरंगी व कांहीं अंतरंगी अशा स्वरूपांनी विभागलेली अनेक साधने आहेत. बहिरंगी म्हणजे पर्यायाने उत्तरोत्तर मंदगतीने भगवत्स्वरूपाकडे नेणारी अशी आहेत. त्यात शरीरादिकाच्या सहाय्याने सहज करता येण्यासारखी असतात, त्यास कांहीं विशेष अधिकार असावा असे नाहीं. असे असूनहि त्या साधनाचा मुख्यभाग असतोच. ज्याचा अंतरंगात समावेश असतो, ते बहिरंगी माणसांना समजत नाहीं. त्यामुळे ज्यांना वेदशास्त्रादिकांचे महत्त्व देऊनहि त्याचा हवा तसा परिणाम झालेला दिसून येत नाहीं. अशाच साधनापैकी तीर्थयात्रा करणे, व्रत वैकल्यादि करणे व नेमाचे पालन करणे ही साधनें आहेत. ज्याचा माणसाच्या जीवनातील कायिक, वाचिकादि पाप नष्ट करण्याशी संबंध आहे. पाप ही माणसाच्या आत्मविकासातील भयानक अडथळा करणारी शक्ति आहे.

**तुका म्हणे नाड । पाप ठाके हिताआड ॥** तु. म.३४०५

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, पूर्वी केलेले पाप हें मनुष्यास मोठे फसविणारे आहे, तें पापच त्याच्या हिताच्या आड येते.

तीर्थ यात्रादि साधना करणाऱ्याच्या जीवनांत विशेष परिणाम दिसून येत नाही. ती साधना व्यर्थ गेल्यासारखी दिसून येते. व्यर्थ जाणे हे तरी बरे. परंतु अनर्थादि झाल्यासारखे दिसते. नको तो अहंकार वाढतो.

**तीर्थाटणें एकें तपें हुंबरती ।**
**नाथिले धरिती अभिमान ॥ १ ॥** तु. म. २२१२

**अर्थ :-** कित्येक तीर्थयात्रा करून व नानाप्रकारची तपें करून

गुरगुरतात आणि खोटा अभिमान धरतात.

**करिता तीर्थाटणें अहंकाराची प्राप्ती यो ॥ निळोबाराय**

अशाप्रकारे जीवाचे होत असलेले नुकसान दूर करावे व त्यांत भक्तिभावाची आवश्यकता व महत्त्व कसे आहे हे ज्ञानेश्वर महाराज पटवून देतात.

**तीर्थ व्रतनेम भावेवीण सिध्दी । वायांची उपाधि करिसी जना ॥**

तीर्थव्रत व नेम यांची पूर्णता तेव्हाच होऊं शकते जेव्हां ती साधनें करीत असता हरिविषयी पूर्णभाव असेल, तरच या साधनांच्या आचरणाने सिध्दी प्राप्त होईल.

**माझेनि अनुसंधानेंवीण । स्नान संध्या जपहोमदान ।**
**ते अवघेचि अधर्म जाण । मद्‌भजन तें नव्हे ॥** ए.भा.अ.११-११०७

**अर्थ :-** माझ्या अनुसंधानाशिवाय स्नान, संध्या, जप, होम, दान हे सर्व अधर्मच आहेत. तें माझे भजन नव्हे.

भारत देशांत ठिकठिकाणी तीर्थस्थानें आहेत. तृ-तारयति, जीवाला भवसमुद्रातून तारते. पद्मपुराणामध्ये खंड ६ अ.१३० मध्ये तीर्थमहात्म्य विस्तारानें सांगितले आहे. तापी, गंगा, यमुनादि तीर्थांत स्नान केल्यावर प्राप्त होणाऱ्या फळाचे महत्त्व वर्णन केले आहे.

**गंगा पापं शशितापं दैन्यं कल्पतरुस्तथा**

श्री संत ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

**संताचेनि अंगलगें । पापातें जिणणें गंगें ।** ज्ञा. १२-१७७

**अर्थ :-** संतांच्या शरीरस्पर्शाने गंगेची पापें जातात.



असे तीर्थाचे महत्त्व वेदशास्त्र पुराणादिकांस व संतांनाहि मान्य आहे. तसेच व्रत वैकल्यादि साधना सांगितली आहे. पुराणांत अनेक व्रतांची विधानें आहेत. नक्तव्रत, कृच्छ्र, चांद्रायणादि व्रतें आहेत. संत वाङ्मयांत एकादशी, सोमवार आदि व्रतांचे वर्णन आहे.

**व्रत करा एकादशी सोमवार । कथा पूजन हरिजागर । पुण्य तें असे गातां नाचतां फार । पुन्हां बोलिला संसार नाहीं नाहीं सत्यत्वें ॥ १ ॥** तु. म. ३३२

**अर्थ :-** एकादशी व सोमवार ही व्रतें करा. त्या दिवशी सकाळी देवाचे पूजन व रात्री हरिकथा करून जागर करावा. नाम गाऊन आनंदानें नाचले असता फार पुण्य आहे. त्याला खरोखर पुन्हा जन्ममृत्युरूपी संसारात येणे नाहीं. असे वेदशास्त्र पुराणें सांगतात. तुकाराम महाराजांनी व्रताची महती स्वतंत्र गाईली आहे.

**एकादशी व्रत सोमवार न करिती ।**
**कोण त्यांची गति होईल नेणों ॥ १ ॥** तु. म. २९८७

अर्थ :- दर पंधरा दिवसांनी येणारी एकादशी व आठवड्यातून येणारा एक सोमवार ही व्रतें जे करीत नाहीत तें कोणत्या गतीला जातील हे मला कळत नाहीं. तसेच जीवनांत सदाचाराच्या नियमाचे काटेकोर पालन करणे याला नेम म्हणतात.

**कांहीं नित्यनेमाविण । अन्न खाय तो श्वान ॥** तु. म. ३०२२

**अर्थ :-** जो मनुष्य भोजनाचे पूर्वी हरीची पूजा, गीता, विष्णुसहस्रनामाचा पाठ अगर कांहीं हरीनामाचा जप ह्यांचा कांहीं एक नियम न ठेवता अन्न खातो तो कुत्रा आहे. म्हणून नियमाचे सततच्या जीवनात परिपालन करावे लागते. नेमांमुळे जीवनांत

विषयांदिकापासून संयम साधला जातो. जीवा इतकी किंमत देऊनच 'नेम' साधावा लागतो.

एकंदरीत स्थलकालाप्रमाणे तीर्थयात्रा कराव्या लागतात. नैमित्तिक स्वरूपांत व्रतें करावी लागतात व रोजच्या नियमांत नेमांचे परिपालन करावे लागते. या सर्वांचा भगवत्प्राप्तीच्या मार्गांत फार मोठा फायदा होतो; म्हणून यांची गरज आहे. पण यांची सफलता होण्याकरिता भगवत्‌भाव हवा आहे. त्या विना ही साधनें व्यर्थ होत. श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, 'भावनेविना करणे म्हणजे केवळ ती उपाधीच होय. अर्थात फुकटच पसारा होय. म्हणून अहो लोकहो ! असा व्यर्थ प्रयास करू नका, कारण भक्तीत भावनेचे महत्त्व फार आहे. नव्हे नव्हे त्या विना सफलता नाहीं. असे श्री ज्ञानेश्वर महाराज दुसऱ्या चरणांत सांगतात.

**भावबळे आकळे येऱ्हवी नाकळे । करतळीं आवळे तैसा हरी ॥ २ ॥**

**अर्थ :-** हरीला आकळण्याकरिता भावच हवा. ज्ञानापेक्षा भावामध्ये शक्ति अधिक आहे. ज्ञानामुळे परमात्मा कळत असतो. म्हणजे तो जसा आहे तसे त्याचे ज्ञान होते. पण भावामुळे तो आकळत असतो. म्हणजे तो भक्ताच्या स्वाधीन होत असतो.

**अहंभक्त पराधीनो ह्य स्वतंत्र इव द्विज ॥** ए. भा.२,-३१३

**अर्थ :-** भगवान आपल्या तोंडाने म्हणतात कीं, मी भक्ताच्या स्वाधीन आहे. एखाद्या वस्तुचे ज्ञान होण्यापेक्षा 'वस्तु' आपल्या अधीन होणे हे अत्यंत महत्वाचे आहे. भगवान ज्यांना आकळलेला असतो त्यांना तो कळत असतो. हे वेगळे सांगण्याचे कारण नाहीं. असे असण्याचे कारण भावासारखी शक्ति जगांत कशातच नाहीं.

**भावापुढें बळ । नाहीं कोणाचें सबळ ॥ १ ॥** तु. म. ३३००



**अर्थ :-** प्रेमबलापुढे कोणी कितीहि बलवान असला, तरी त्याचे बल कांहींच चालत नाहीं.

भाव - भक्ति - प्रेम - रति यात विशेष अंतर नाहीं. शुद्ध भावांत यांचा समावेश होतो. शुद्धभावामध्ये निष्कामता, निर्दंभपणा, अव्यभिचारीपणा, नितांत विश्वास या गोष्टींचा समावेश होतो. सामान्यभाव सर्वांच्या जवळ असू शकतो.

**देखें मनुष्यजात सकळ । स्वभावता भजनशीळ ।** ज्ञा. ४-६७

**अर्थ :-** हे पहा, जेवढे म्हणून मनुष्यप्राणी आहेत, तेवढ्या सर्वांच्या मनाचा स्वाभाविक कल माझी भक्ती करण्याकडे असतो. या न्यायाने सामान्य भाव सर्वांजवळ आहे. पण ज्याचा ज्यांनी विकास केला अर्थात वरील सर्वगुण समाविष्ट केले त्या भावांत विशेष बळ प्राप्त होते. भावाचे तीन प्रकार एकनाथ महाराज सांगतात.

**महावीरांचे शौर्यपण । ऐकोनि युद्ध दारुण ।**
**अत्यंत हरिखे उल्हासे मन । तो प्रेमा जाण राजस ॥** ए.भा.११-७१३

**अर्थ :-** मोठमोठ्या वीरांचा समरांगणांतील शूरपणा किंवा भयंकर युद्ध ह्यांचे वर्णन ऐकून मन अत्यंत आनंदानें उचंबळून येते, तें राजस प्रेम होय असे समज.

**दुःख शोकांची अवस्था । कां गेल्यामेल्यांची वार्ता । अत्यंत विलापाची कथा । ज्यासी ऐकतां न संकटे (संठे) ॥ ७१४ ॥ नेत्रीं अश्रूंचिया धारा । स्फुंदनें कांपे थरथरां । प्रेमविलाप अवसरां । तो जाण खरा तामसू ॥ ७१५ ॥** ए.भा.अ.११-७१४,१५

**अर्थ :-** दुःखशोकांचा प्रसंग किंवा गेल्यामेल्यांची वार्ता किंवा अत्यंत शोककारक कथा ही ऐकणेहि ज्याला सहन होत नाहीं

त्यातील प्रत्येक प्रसंग ऐकत असता डोळ्यांतून अश्रूंच्या धारा लागतात. हुंदके देऊन थरथर कांपू लागतो. तो खरा **तामस** भाव होय. (ते तामस प्रेम).

**सगुण मूर्तीची संपदा । शंख चक्र पद्म गदा । पीतांबरधारी गोविंदा । ऐकोनि आनंदा जो भरे ।। नेत्रीं आनंदजीवन । हृदयीं न संठे स्फुंदन । कृष्णमय जालें मन । तो प्रेमा जाण सात्त्विक ।।**

ए. भा. ११-७१६,१७

**अर्थ :-** सगुणमूर्तीचें ऐश्वर्य, शंख, चक्र, गदा, कमळ, पीतांबर धारण केलेला गोविंद ह्यांचे वर्णन श्रवण करून जो आनंदाने भरून जातो. नेत्रातून आनंदाश्रू वाहतात. आलेला हुंदका हृदयांत आवरत नाहीं, मन कृष्णमय होऊन गेलेले असते. ते **सात्त्विक प्रेम** होय. असे समज शुद्धभावास रति, राग, प्रिती अशी अनेक नांवें आहेत. अशा शुद्ध भाविकांस भगवान आत्मसात होतात.

**सांपडे हा देव भाविकांचे हातीं ।**
**शाहाणे मरती तरी नाहीं ।। ६७ ।।** तु. म. ३४७

**अर्थ :-** एका भक्ति भावार्थावांचून शहाणपणाने पुष्कळ खटपट करून जरी शहाणें लोक मेले तरी त्यांस देव सांपडत नाहीं. तो भाविकास सांपडतो. तो कसा स्वाधीन होतो तर दृष्टांताने महाराज सांगतात -

**करतळी आवळे तैसा हरि ।। २ ।।**

**अर्थ :-** ज्याप्रमाणे तळहातावर ठेवलेला आवळा सर्व बाजूंनी दिसतो किंवा हातांत सर्व बाजूंनी स्वाधीन होतो त्याप्रमाणे परमात्मा भक्तांस सर्व रूपाने दिसतो व सर्वार्थाने वश होतो.

भक्तांच्या सांगण्यावरून मी सगुण होतो.



**गांढ्या तरी भावाचा अंकित ।** तु. म. ७३०

**अर्थ :-** बलहीन तर इतका आहे कीं, ज्याच्याजवळ सामान्य भाव आहे. अशांचाहि आज्ञाधारक सेवक बनतो. म्हणजे अशा भावभक्ती साधनाविना परमात्मा साध्य होणे अवघड अर्थात अशक्यप्रायच आहे. असे तिसऱ्या चरणांत महाराज सांगतात.

**पारियाचा रवा घेता भूमिवरी । यत्न परोपरी साधन तैसे ।। ३ ।।**

**अर्थ :-** पारा नांवाचे रासायनिक द्रव्य आहे. तें जमिनीवर पडले तर त्याचे सूक्ष्मकण विखुरले जातात. एकत्र करण्याकरिता बोटाने दाबले तर त्याचे कण पसरतात. अर्थात एका कणाचे अनेक कण होतात. त्यांना उपयोगात आणणे अवघड होते. त्याप्रमाणे भावयुक्त नामचिंतनाविना इतर साधनांनी परमात्म प्राप्ती करणे अवघड होत जाते. श्री संत निळोबारायांनी एका गौळणीद्वारे याचा सुंदर विचार मांडला आहे.

**होते बहुत दिवस आर्त वागविले । आजि अकस्मात फळ देऊं आले । दृष्टी श्रीहरींची देखिली पाऊलें । घेतले जन्म मागे सार्थक त्याचे झाले वो ।। १ ।।** श्री संत निळोबाराय

भगवद्भक्तीविना केलेले सर्वच उपाय हे अपायच होत असे वाटू लागते एवढे भक्तीचे महत्त्व आहे.

**इतर साधनें फळ काम देती । पुनरपि आणिती गर्भवासा ।।**

एकंदरीत भावभक्तीचा महिमा अजोड आहे. अहोपण हा भाव प्राप्त होण्यास, तो स्वभावतः प्राप्त होतो कीं, कोणाकडून तरी त्याची प्राप्ती होते. त्याचे ज्ञानेश्वर महाराज चवथ्या चरणांत उत्तर देतात.

**ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण । दिधले संपूर्ण माझे हाती ।। ४ ।।**

**अर्थ :-** आपल्या अनुभवाने प्रकट करतात कीं, असे सामर्थ्य मला मिळाले पण स्वभावतः नसून निर्गुण स्वरूपाचे माझे श्रीगुरु निवृत्तिनाथ त्यांनी माझ्या हातात तो बोध स्वाधीन केला. ज्ञानेश्वर महाराजांनी आपल्या गुरूचे वर्णन एका शब्दांत सर्वांगीण स्वरूपाचे केले. जे निर्गुण असतात. अर्थात गुणांत असूनहि गुणाकडून न बांधले जाणे हे निर्गुणत्वाचे स्वरूप होय. एऱ्हवी गुणविरहित असता देणे ही क्रिया संभवूच शकत नाही. श्री ज्ञानेश्वर महाराजांची गुरुविषयी केवढी आदराची यथार्थतेची भावना होती हे यावरून स्पष्ट होते. सामान्य माणसे गुरूंना मनुष्य बुध्दीने पाहतात. पण सद्गुरु हे माणसासारखे दिसतात पण माणुस नसतात.

**तो मनुष्यासारिखा** तरी आवडे ।
**परी मनुष्यत्व तया न घडे** ।। ज्ञा. ४-१००

**संत नव्हती जगा । माणसा त्या सारिखे** ।। तु. म. ३३६

**अर्थ :-** इतर मनुष्यांप्रमाणे संत हे आहेत असे म्हणून नये. तें सर्व जगाहून श्रेष्ठ आहेत. अमृतानुभवाच्या आरंभी ज्ञानेश्वर महाराजांनी आपल्या श्रीगुरुचे वर्णन यथार्थ केले.

**यदक्षरमनाख्येयमानंदमजकेवलम् ।**
**श्रीमन्निवृत्तिनाथेति ख्यातं दैवतमाश्रये ।। १ ।।**

**अर्थ :-** अक्षर म्हणजे क्षर न पावणारे अर्थात निर्विकार स्वरूप, अनाख्येय म्हणजे कोणत्याहि तऱ्हेने सांगता येण्याजोगे नव्हे तें, आनंद म्हणजे आनंदस्वरूप, अज म्हणजे जन्मविरहित अर्थात् स्वयंसिद्ध आणि नित्य, केवल म्हणजे निरुपाधिक, सापेक्षसंबंधशून्य, श्रीमत् म्हणजे शोभिवंत किंवा ऐश्वर्ययुक्त आणि 'निवृत्तिनाथ' या



नांवाने सुप्रसिद्ध जे कोणी एक इष्ट दैवत, त्याप्रत (मी) निरंतर आणि अनन्य अशा भक्तीभावाने शरण आहे, अर्थात् त्याचाच (मी) आश्रय करून आहे. त्यांनी मला ही भक्तीची शक्ति दिली आहे.

**कृष्णांजन एकवेळां डोळां घालितां अढळ । तिमिर दुःख गेले फिटलें भ्रांतीपडळ । श्रीगुरु निवृत्तिरायें मार्ग दाविला सोज्वळ । बापरखुमादेवीवरु विठ्ठल दीनाचा दयाळ ।। १ ।।** ज्ञा. म. ९५९

अर्थ :- कृष्णांजनरूपी अंजन मी डोळ्यांत घातल्याबरोबर अज्ञानरूपी दुःखबीज जाऊन संसार-भ्रांतीच्या पडळातूनहि मुक्त झालो. दीन जनांचा दयाळू, त्या देवीचा वर जो श्रीविठ्ठल, त्याच्या प्राप्तीचा सोज्वळ मार्ग श्रीगुरु निवृत्तिरायांनी मला दाखविला म्हणजे गुरुकृपेविना भाववळ प्राप्त होत नाही. पण ज्ञानेश्वर महाराजांना ती प्राप्त होती. म्हणून

**ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण । दिधले संपूर्ण माझे हाती ।। ४ ।।**

**- भावार्थ समाप्त -**

**तीर्थव्रत नेम भावेवीण सिध्दी । वायांचि उपाधि करिसी जना ।। १ ।।**

व्याख्यान :- प्रस्तुत अभंगावर अशी शंका येते कीं, तीर्थव्रतादि साधना करूनहि दांभिकपणा प्राप्त होतो. अर्थात् अभाविकांस तीर्थ यात्रादिकांचा उपयोग होत नाही. यामुळे या साधना करणाऱ्यांचा आहे तो विश्वास संपेल. तीर्थादिकास घरादाराचा त्याग पैशांचा खर्च करणे गैरसोई सहन करणे जीवंतमृत होण्याची तयारी ठेवणे.

**जीवंतोऽपिमृताःपंच व्यासेन परिकीर्तितः ।**
**दरिद्रोव्याधितोमूर्खः प्रवासी नित्यसेवकः ।।**

असे हे वचन आहे व एकीकडे संत तीर्थयात्रा करण्याविषयी प्रोत्साहन देतात.

**जंव हें सकळ सिद्ध आहे । हात चालावया पाय । तंव तूं आपुलें स्वहित पाहें । तीर्थयात्रें जाय चुकों नको ॥ १ ॥** तु. म. ७२२

**अर्थ :-** अरे जना, जोपर्यंत इंद्रियांसह हा देह सुदृढ आहे. हात हे देण्याघेण्यास व पाय हे चालण्यास समर्थ आहेत. तोपर्यंत तूं आपल्या स्वहिताचा विचार कर आणि तीर्थयात्रेला जाण्यास चुकू नकोस. अर्थात एवढे असूनहि त्यांच्या पदरांत निराशा पडणार आहे. म्हणून असा वर्ग तीर्थयात्रांदिपासून दूर राहील. बरे दुसरा जो नामभावनिष्ठ वर्ग आहे त्यांना त्याची भक्तीच तारक आहे. त्यांना तीर्थादिकांचा काय उपयोग. उलट अशा नामधारकाच्या नामनिष्ठेमुळे इतर साधनांचे दिवाळेच निघाले.

**सततं कीर्तयन्तो मां यतंतश्च दृढव्रताः ॥** गी. ९-१४

या श्लोकावर ज्ञानेश्वर महाराजांनी व्याख्यान करतांना वर्णन केलेले आहे.

**यमदमा अवकळा आणिली । तीर्थें ठायावरूनि उठविलीं। यमलोकींची खुंटली । राहाटी आघवी ॥** ज्ञा. अ. ९-१९८

**अर्थ :-** यमदमांना निस्तेजता आणली, तीर्थांना पाप नाहीसें करणारे असे जे श्रेष्ठ पद मिळाले होते, त्या श्रेष्ठपदावरून उठविले. नामधारकामुळेच तीर्थांना तीर्थत्व जर प्राप्त होते; तर नामधारक भाविक हे तीर्थाला जातीलच कसे ? अशा उभयसंबंधाने तीर्थांना व्यर्थत्व येईल व पुराणादिकामध्ये तर त्याचे वर्णन आहे.

तसेच ज्ञानेश्वर महाराजांनी श्री संत नामदेवरायांना घेऊन



तीर्थयात्रा केली. त्यातील प्रसंग प्रसिध्द आहेत. श्री ज्ञा. म. व श्री नामदेव महाराज यांची तीर्थयात्रा संपल्यावर स्वतः देवांनी ना. म. यांचे मावदे केल्याचे प्रसिध्द आहे. एकंदरीत या शंकेचऐे उत्तर असे आहे कीं, समाजात काही तीर्थावर व नामभक्तीत सामान्य भाव ठेवणारा वर्ग आहे. त्याचप्रमाणे केवळ नाएमभक्तीवर पूर्ण भाव ठेवणारा त्याची श्रद्धा अचल असते. तो इतर साधनांस प्राधान्य देत नाहीं.

**अवघे होती लाभ एका या चिंतनें ।**
**नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥ १ ॥** तु. म. २५४७

**ठायींच बैसोन करा एकचित्त ।**
**आवडी अनंत आळवावा ॥ १ ॥** तु. म. २४४९

**अर्थ :-** कारण ह्या एका गोविंदाच्या चिंतनाने व नामसंकीर्तनाने संपूर्ण लाभ प्राप्त होतात.

एका ठिकाणी बसून व एकचित्त करून मोठ्या प्रितीने अनंतास आळवावे या भूमिकेवर असल्यामुळे तो तीर्थयात्रा करत नाहीं. अशा भक्तास तीर्थादिकांची गरज नाहीं. उलट तीर्थेंच त्यांच्याकडे येतात.

**तीर्थें तया ठाया । येती पुनीत व्हावया ।**
**पर्वकाळ पायां । तळीं वसे वैष्णवां ॥ १ ॥** तु. म.२४१४.

**अर्थ :-** त्या वैष्णवांच्या ठिकाणी सर्व तीर्थें पवित्र व्हावयास येतात व कपिलाषष्ठीसारखे सर्व पर्वकाळ त्यांच्या पायांच्या ठिकाणी वास्तव्य करतात.

साधारण नामनिष्ठा व तीर्थावरहि श्रद्धा अशांना तीर्थाची

गरज आहे. त्यांचे प्रपंचात आसक्त झालेले मन बाहेर यावे, मनाला सवय लागावी व पवित्र स्थलाशी संबंध होऊन त्यांचे पाप क्षालन व्हावे एवढ्याकरिता पुराणादिकांत वर्णन केले आहे. म्हणून तीर्थास व्यर्थत्व येत नाहीं. तसेच व्रताचेहि आहे. अनेक व्रतांचे वर्णन सकाम लोकांकरिता आहे. त्यांना अवश्य आहे. पण भक्तीभाव असणे जरुरीचे आहे. भक्त इतर तीर्थव्रतास आहारी जात नाहीत. कारण तें एकनिष्ठ असतात.

**पंढरीची वारी आहे माझे घरीं ।**
**आणीक न करीं तीर्थव्रत ॥ १ ॥** तु. म. २५६८

**अर्थ :-** कुलपरंपरेने चालत आलेली पंढरीची वारी करण्याचा संप्रदाय आमच्या घराण्यात आहे. म्हणून मी कोणतेहि अन्य तीर्थव्रत करणार नाहीं. असे तुकाराम महाराज म्हणतात, तसेच नेमाच्याहि बाबतीत आहे. भावनिष्ठा असल्यामुळे इतर नेम करत नाहीत.

**हाचि माझा नेम धर्म । मुखीं विठोबाचें नाम ॥ १ ॥** तु. म. १९२१

**अर्थ :-** आणि मुखाने विठोबाचे सतत नाम घेणे, हाच माझा नेम आहे आणि माझा धर्महि आहे. त्यांना एकंदरीत लोक संग्रहाकरिता तीर्थयात्रादि करत असले तरी त्यांना त्यांची स्वतंत्र गरज नाहीं. कारण भगवद्विषयक भावबळ त्यांच्याकडे संपूर्ण असते.

**- समाप्त -**

* * *

## * अभंग तेरावा *

**समाधि हरीची समसुखेंवीण ।**
**न साधेल जाण द्वैतबुद्धी ॥ १ ॥**
**बुद्धीचे वैभव अन्य नाहीं दुजे ।**
**एक्या केशीराजें सकळ सिद्धी ॥ २ ॥**
**ऋद्धि सिध्दी निधी अवघीच उपाधि ।**
**जंव त्या परमानंदी मन नाहीं ॥ ३ ॥**
**ज्ञानदेवी रम्य रमले समाधान ।**
**हरीचें चिंतन सर्वकाळ ॥ ४ ॥**

**अर्थ :-** सृष्टीतील सजातीयादि भेदरूपी वैषम्य विचारानें काढून शिवापासून तृणापर्यंत एकरूपाने वास्तव्य करणाऱ्या हरीचे समबुद्धीने ग्रहण केले तर समाधि (आत्मस्थिती) प्राप्त होते. जर बुद्धितील हे सजातीयादि भेद गेले नसतील तर अशा भेदात्मक बुद्धीस हरीची समाधि कधीहि प्राप्त होणार नाहीं. ॥ १ ॥ केशवास (आत्म्यास) यथार्थत्वेंकरून जाणणे हेच बुद्धीचे ऐश्वर्य आहे, यावांचून दुसरे नाहीं. त्यानेच जगातील सर्व सिद्धींचा लाभ होतो. ॥ २ ॥ ऋद्धि म्हणजे ऐश्वर्य, सिद्धी म्हणजे अणिमा, गरिमा इत्यादी आठ प्रकारच्या सिद्धी यांचा निधी म्हणजे ठेवा प्राप्त झाला तरी जोपर्यंत परमानंदरूप हरीच्या ठिकाणी मन नाहीं तो पर्यंत तो पीडादायकच होतो. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, प्राणिमात्राला रमविणारे असे समाधान माझ्या ठिकाणीं सुस्थिर झाले असून हरीचें चिंतन सर्वकाळ चाललें आहे. ॥ ४ ॥

**विवरण :-** हरिपाठांतील हा एक महत्वाचा अभंग आहे. या

अभंगामध्ये ज्ञानेश्वर महाराज हरीच्या समाधीचें वर्णन करीत आहेत. 'समाधि म्हणजे सहज स्थिती' (चित्ताचे समाधान) वृत्ति स्थिर होणे परंतु द्वैत बुद्धि असेल तर समसुख नाहीं व समसुखाविना हरीची समाधि साधणार नाहीं. असे तूं समजून घे असे ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या पहिल्या चरणांत सांगतात.

**समाधि हरीची समसुखेंवीण । न साधेल जाण द्वैतबुद्धि ॥ १ ॥**

या ठिकाणी 'समसुख म्हणजे समदर्शन', सम हा शब्द परमात्मावाचक आहे. **निर्दोषं हि समं ब्रह्म ।** गी. ५-१९

जीव हा परमात्मा यांच्या समतेने प्राप्त होणारे जें सुख तें समसुख होय असे एकनाथ महाराज सांगतात.

**तो सकळ सुखांचा मंडपु । कीं निजसुखाचा कंदर्पु ।**
**तो सर्वांगें सुखस्वरूपु । सबाह्य सुखरूपु समसुखत्वें ॥** ए.भा.१४-११३.

**अर्थ :-** तो सर्व सुखाचा मंडप आहे किंवा तो आत्मसुखाचा कंद आहे. तो सर्वांगानें सुखस्वरूपच असतो. समभावनेच्या सुखाने तो अंतर्बाह्य सुखरूपच असतो. हरिपाठांत असे समदर्शन ठिकठिकाणी दाखविले आहे. **'एक हरी आत्मा जीव शिवसमा'॥**

**अर्थ :-** हरि जो एक आत्मा त्याची व्याप्ती मायोपाधिक शिवामध्ये व अविद्योपाधिक जीवांमध्ये एकसारखीच आहे.

**भरला घनदाट हरी दिसे ॥**

**अर्थ :-** तो मला पाण्यानें भरलेल्या मेघाच्या दाट फळीप्रमाणे जिकडे तिकडे दिसत आहे. **हरि दिसे जनी वनी आत्मतत्त्वी ॥**

**अर्थ :-** मला सर्व जनांत व वनांत आत्मतत्त्वस्वरूप हरि दिसत आहे.



**येणे दशदिशा आत्माराम ॥**

**अर्थ :-** मला दाही दिशांमध्ये आत्माराम भरलेला दिसत आहे.

**सर्वभूतीं निजात्मा । तिसी पावोनि झाले सर्वसमता ।**
**ते बोलती चालती समाधि अवस्था । मजही सर्वथा मानली ॥**
चतुःश्लोकी भा. ३६५

जीव ब्रह्माची एकता प्राप्त होणे ही समाधि होय. पण द्वैतबुद्धी असेल तर ते शक्य नाहीं '**न साधेल जाण द्वैतबुद्धि ।** दोन पदार्थांनी युक्त तें द्वित्व व त्याचा भाव तें द्वैत. आत्म्याच्या ठिकाणी स्वगत भेद नाहीं. त्याच्यासारखा दुसरा नाहीं म्हणून सजातीय भेद नाहीं. जगत जे दुसरे दिसते परंतु तें मिथ्या आहे. यासाठी मिथ्या जगत् हे सत्य आत्म्यास विजातीय भेद निर्माण करू शकत नाहीं. अशा प्रकारचा भेद बुद्धीच्या ठिकाणी 'नसणे' हे ऐश्वर्यसंपन्न बुध्दीचे लक्षण आहे व त्यामुळे सर्व सिद्धी प्राप्त होतात हे अभंगाच्या दुसऱ्या चरणांत ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**बुध्दीचे वैभव अन्य नाहीं दुजे । एक्या केशीराजे सकळसिद्धी ॥ २ ॥**

अगोदर बुद्धी म्हणजे काय तें पाहूं. बुद्धिःस्यान्निश्चयात्मिका ।

निश्चय करणारी ती बुध्दी अशी व्याख्या आहे. त्या बुध्दीचे गीतेमध्ये सात्त्विक, राजस,तामस, तीन प्रकार केले आहेत. त्याचा विचार थोडक्यांत तो असा.

जी बुध्दी प्रवृत्ति, निवृत्ति, कार्य, अकार्य, भय, अभय, बंध, मोक्ष इत्यादिकांना यथार्थपणे जाणते ती सात्त्विक बुद्धि होय. जी बुद्धि धर्म, अधर्म, कार्य, अकार्य इत्यादिकांना विपरीतपणाने जाणते ती बुद्धि राजस समजावी. जी बुद्धि अधर्मालाच धर्म, अज्ञानासच

ज्ञान अशा रितीने सर्वच पदार्थांना विपरीतपणाने जाणणारी बुद्धि ती तामस जाणावी.

तामस व राजस हे कंगाल बुध्दीचे स्वरूप आहे. जो पर्यंत बुद्धि बहिर्मुख बनून अनेक विषयांसी संबंध ठेवते तो पर्यंत ती वैभवशाली बनत नाहीं. कारण ज्या बाह्य विषयांना ती विषय करते तें पदार्थच स्वभावतः अनित्य व दुःखरूप असतात. त्यांच्या सेवनानें ती सुखाच्या वैभवास प्राप्त होत नाहीं. ज्या वेळी बाह्य विषयांचा त्याग करून बुद्धि आत्म्यासी समरस होते हेच खरे तिचे वैभव आहे.

**परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियांतें आपण देखे । देखतखेंवो वोळखे । म्हणे तत्त्व तें मी ॥ ३६६ ॥ तिये ओळखीचिसरिसें । सुखाचियां साम्राज्यीं बैसे । चित्तपण समरसें । विरोनि जाय ॥ ३६७ ॥** ज्ञा. ६-३६६,६७.

**अर्थ :-** ती ज्या वेळेला विषयांना सोडून परत अंतर्मुख होतें आणि आपण आपल्या आत्मस्वरूपाला पाहाते आणि पाहिल्याबरोबर त्यास स्वरूपाची ओळख पटते व तें तत्त्व मी आहे, अशा समजुतीवर येतें. ॥ ३६६ ॥ त्या ओळखीबरोबर ते सुखाच्या साम्राज्यावर बसतें आणि तेथें आत्म्याशी समरस झाल्यानें चित्ताचा चित्तपणा नाहींसा होतो. जिचा विषय परमात्मा आहे ती बुद्धि सर्वश्रेष्ठ आहे.

**तैसी ईश्वरावांचूनि कांहीं । जिये आणीक लाणी नाहीं ।**
**ते एकचि बुद्धि पाहीं । अर्जुना जगीं ॥** ज्ञा. २-२४२

**अर्थ :-** त्याप्रमाणे जिला ईश्वरावांचून अन्य आश्रयस्थान नाहीं; तीच जगांत फक्त एक सद्‌बुद्धि आहे.

**''बुद्धीचे वैभव अन्य नाहीं दुजे ''**



केशवराजाचा बुद्धिसी संबंध आला असता तिला सर्व सिद्धि प्राप्त होतात. केशव शब्दाची व्याख्या एकनाथ महाराजांनी सांगितलेली आहे. 'क'कार म्हणजे ब्रह्मदेव. 'श'कार म्हणजे शंकर आणि 'व'कार हा विष्णु. वस्तुतः 'केशव' निर्गुण; तो तिहींचाहि पूर्ण प्रकाशक आहे.

**'क'कार ब्रह्म 'व'कार विष्णु । 'श'कार स्वयें त्रिनयनु ।**
**केशव तो गुणाविहीनु । प्रकाश पूर्णु तिहींचा ॥** ए.भा. ५-३१३

केशवराजासी अनन्यतेला प्राप्त झालेली बुद्धीच वैभव संपन्न होते व तिलाच श्रेष्ठ अशी आत्मसिद्धी प्राप्त होते याविना इतर प्राकृत ऋद्धि सिद्धि आहेत. त्या जरी प्राप्त झाल्या तरी त्या अवघ्या उपाधीच समजाव्या हे केव्हां समजणार तर परमानंदी मन गेले असता तेव्हां कळणार हेच अभंगाच्या तिसऱ्या चरणांत ज्ञा. म. सांगतात.

**ऋद्धि सिध्दी निधी अवघीच उपाधि । जव त्या परमानंदी मन नाहीं ।**

**ऋद्धि :-** म्हणजे ऐश्वर्य ज्यावेळी जो पदार्थ मिळत नसेल त्यावेळी तो मिळणे हे ऐश्वर्याचे द्योतक आहे. उदा :- हिवाळ्यात आंबा मिळणे.

**सिद्धि :-** भागवतात दहा क्षुद्र सिद्ध्या व आठ महासिद्ध्या सांगितलेल्या आहेत.

**श्री भगवानुवाच**

**सिद्धयोऽष्टादश प्रोक्ता धारणा योगपारगैः ।**
**तासामष्टौ मत्प्रधाना दशैव गुणहेतवः ॥** ए. भा. १५-३

**अर्थ :-** श्री भगवान म्हणाले, योगशास्त्रांत निष्णात असलेल्या पंडितांनी एकंदर अठरा सिद्धी व अठरा धारणा सांगितल्या आहेत. त्यापैकी आठ सिद्धीना मीच आधार असतो (त्या मत्प्रधान आहेत) आणि बाकीच्या दहा सत्त्वगुणप्रधान आहेत. (मला जो अनन्य असतो

त्यालाच अष्टसिद्धी प्राप्त होतात; बाकीच्या दहा सत्वगुणानें वागणाऱ्याचा उत्कर्ष करणाऱ्या म्हणून त्या गौण होत.)

**अणिमा महिमा मूर्तेर्लघिमा प्राप्तिरिन्द्रियैः । प्राकाश्यं श्रुतदृष्टेषु शक्तिप्रेरणमीशिता ॥ गुणेष्वसङ्गोवशिता यत्कामस्तदवस्यति ।एता मे सिद्धयः सौम्य अष्टावौत्पत्तिका मताः ॥** ए. भा.१५-४-५

**अर्थ :-** अणिमा, महिमा, लघिमा या तीन सिद्धि देहाच्या आहेत; प्राप्ति म्हणजे विशिष्ट इंद्रियांची तदधिष्ठातृदेवतेसह प्राप्ति; प्राकाश्य म्हणजे अदृष्ट वस्तूंचे दर्शन (श्रुत व दृष्ट वस्तूला प्रकाशित करणारी ती प्रकाश्य), ईशिता म्हणजे नैसर्गिक शक्तिवर प्रभुत्व; वशिता म्हणजे विषयगुणांमध्ये आसक्त न होणे व आठवी कामपूर्तता म्हणजे ज्या ज्या सुखाची इच्छा करावी तें प्राप्त होणे; या आठ सिद्धी, हे प्रिय उद्धवा, स्वाभाविक असल्याने विद्वानांना मान्य आहेत. (या सिद्धि माझी एकांतिक भक्ति करणाऱ्याला प्राप्त होतात म्हणून स्वाभाविक होत.

**निधी - साठा - ठेवा :-** ऋद्धि सिद्धीचा ठेवा जरी मिळाला तरी त्या उपाधि आहेत. ज्ञानी भक्ताला त्या मिळाल्यातरी ते त्यांचा अंगिकार करीत नाहीत.

**ज्यासी प्राप्त माझें निजसुख । त्यासी सिद्धि तुच्छप्राय देख। न देखती जन्ममरणांचें मुख । माझा पूर्ण हरिख कोंदाटे ॥**

ए. भा. १५-२३७

**अर्थ :-** ज्याला माझे आत्मसुख प्राप्त होते, त्याला ह्या सिद्धि केवळ कस्पटासमान होत. तें जन्ममरणाचे तोंडसुद्धा पाहात नाहींत. त्यांच्या अंतःकरणांत माझ्याविषयी परिपूर्ण आनंद भरलेला असतो. ज्ञानेश्वर महाराज देखील सांगतात.



**जो आपुलेनि नागरपणे । इंद्रभुवनातें पावलें म्हणे । तो कैंचि रंजे पालिवणें । भिल्लांचेनि ॥ जो अमृतासि टी ठेवी । तो जैसा कांजी न सेवी । तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ॥** ज्ञा. २-३६३,६४

**अर्थ :-** जो आपल्या ऐश्वर्यापुढें इंद्रभुवनालाहि तुच्छ समजतो, तो साध्या पालांच्या खोपटांत कसा रमेल ? जो अमृताला नांवें ठेवतो, तो ज्या प्रमाणे कांजीला हात लावीत नाहीं त्याप्रमाणे ज्याला आत्मसुखाचा अनुभव आला तो ऋद्धीचा भोग घेत नाहीं.

तद्वत् आत्मानुभवावर प्राप्त झालेला ऋद्धि सिद्धीला किंमत देत नाहीं जसा राजहंस पक्षी पाणी घेत नाहीं.

**सिद्धी लावी पिसे कोण तया पुसे । नेले राजहंसे पाणी काई ॥**

जो परमानंदाला प्राप्त झाला आहे. परम म्हणजे श्रेष्ठ आनंद परमात्मा हा आनंदस्वरूप आहे. **परमानंदु आजी मानसी ।**

जगातील कोणताहि आनंद हा परमानंदापुढे तुच्छ आहे. म्हणून ऋद्धि सिद्धीला महात्मे किंमत देत नाहीत. हेच याचे तात्पर्य आहे. सम्यक् ज्ञानाच्या तीन कक्षा आहेत शास्त्रप्रतिती, गुरुप्रतिती व आत्मप्रतिती या पैकी महात्मे आत्मप्रतितीने बोलतात. म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात कीं, रम्य म्हणजे अत्यंत सुखप्रद असे जे समाधान तें माझ्या ठिकाणी रमले म्हणजे स्थिर झाले त्यामुळे तें माझ्या ठिकाणी रमले आहे हेच शेवटच्या चरणांत सांगतात.

**ज्ञानदेवी रम्य रमलें समाधान । हरीचें चिंतन सर्वकाळ ॥ ४ ॥**

त्यामुळे समसुखात्मक समाधि मला प्राप्त झाली. मी त्या समाधीतच सर्वकाळ हरीचे चिंतन करीत आहे, हे बाळछंद या अभंगात सांगितले आहे.

ज्ञानदेवे घेतलें दान । हृदयीं धरोनियां ध्यान । समाधी बैसला निर्वाण । कथा कीर्तन करितु ।। ११ ।। बाळछंदो बाबा बाळछंदो ।। धृ ।। ज्ञा. म.

**अर्थ :-** पांडुरंगांनी दिलेले दान ज्ञानेश्वर महाराजांनी घेऊन त्याचें ध्यान हृदयांत धरून महाराज शेवटच्या समाधीला बसले. तें अजूनहि कथा कीर्तन करीत आहेत.

**चित्त पावले आनंदा । सुख समाधीतें सदा ।**
**म्हणता गोविंदा । वेळोवेळा वाचेसी ।। ३ ।।** तु. गा. २५११

**सर्वकाळ नामचिंतन मानसी । समाधान मनासी समाधी हे ।** तु.म.७५९

**अर्थ :-** मी मनाने हरिनामाचे चिंतन सर्वकाळ करीन, त्या योगाने माझ्या मनाचे समाधान होणे हीच माझी खरी समाधि होय.

**निळा म्हणे स्वरूप सिद्धि । सहज समाधि हरिनामें ।। ४ ।।**
निळोबाराय तु. म. गाथा ४१४८

**अर्थ :-** श्री निळोबाराय म्हणतात, हरिनामाने आत्मस्वरूपाची प्राप्ति होऊन नित्य समाधि लागते.

या सर्वांचे तात्पर्य असे आहे कीं अखंड हरिचिंतनानेंच वर सांगितलेली समसुखात्मक समाधि प्राप्त होते. सर्वकाळ हरीच्या चिंतनानेच मी या समाधी अवस्थेस प्राप्त झालो असे ज्ञानेश्वर महाराज स्वानुभवपूर्वक सांगतात.

**ज्ञानदेवी रम्य रमलें समाधान । हरीचें चिंतन सर्वकाळ ।। ४ ।।**

**- भावार्थ समाप्त -**

**व्याख्यान :-** योग - ज्ञान - उपासना या सर्व साधनांत समाधीचा विचार आला आहे.



**योग :-** तदेवार्थ **मात्रनिर्भासे स्वरूप शून्यमिव समाधिः ।।** योगसूत्र ३

ध्यान ध्येय स्वरूपाकार होऊन अन्य पदार्थांचे ज्ञान निराळे म्हणून कांहींच राहत नाहीं. त्या भूमिकेस समाधि असे म्हणतात. ज्ञानेश्वर महाराज समाधीचे लक्षण सांगतात.

**जेथ पुढील पैस पारुखे । मागील स्मरावें तें ठाके ।**
**ऐसिये सरिसीये भूमिके । समाधि राहे ।। ६० ।।** ज्ञा. ६-६०

**अर्थ :-** आत्मसुखाची प्राप्ति होऊन मनादि इंद्रियें शांत झाली, अणुमात्रहि वृत्ति स्फुरण पावेनाशी झाली, म्हणजे त्याला 'समाधि' असे म्हणतात.

**उपासना :-** **चित्त पावले आनंदा । सुखसमाधीतें सदा ।**
**म्हणता गोविंदा । वेळोवेळा वाचेसी ।। ३ ।।** तु.म.२५१९

वाचेने गोविंदाचें पुनः पुनः स्मरण केले असता चित्त आनंदांत निमग्न होऊन नेहमी समाधीसुखाला प्राप्त होते.

यावर शंका येते तिचा थोडक्यात विचार करू, ती अशी -

**शंका :-** समाधि म्हणजे निष्क्रिय अवस्था समजावी. तिचा या जगांत काय उपयोग ? कारण व्यवहारास लागणारी सामुग्री या अवस्थेत नसणार त्यामुळे पुरुष कर्मशून्य होऊन प्रापंचिक व पारमार्थिक व्यवहार करण्यास असमर्थ होतो.

**उत्तर :-** समाधि म्हणजे केवळ ताटस्थ्य नव्हे. बहुतेकांना असे वाटते कीं समाधि म्हणजे एका आसनावर डोळे झाकून तटस्थ बसणे पण ही कल्पना चुकीची आहे.

**ताटस्थ्या नांव समाधी । म्हणे त्याची ठकली बुद्धी ।**
**ते समाधि नव्हे त्रिशुद्धी । जाणावी नुसधी मूर्च्छा आली ।।**
ए. भा. २-४२५

**अर्थ :-** जो ताटस्थ्यपणाला 'समाधि' हे नांव देतो त्याची बुद्धि चकली म्हणावी; कारण ती खरोखरीच समाधि नसून केवळ 'मूर्च्छा' आहे असे समजावें.

**पाहें पां देवर्षि नारदु । विनोदें न मोडे समाधिबोधु । याज्ञवल्क्याचा समाधिसंबंधु । ऋषिप्रसिद्ध परीक्षा केली ॥** ए. भा.२-४२१

**अर्थ :-** देवर्षि नारदच पहा. त्याच्या विनोदकर्मानेहि समाधीचा कधीच भंग होत नाहीं. ( तो निरंतर चालता बोलतांना व फिरतांसवरतांना सुद्धा समाधीस्थितीतच असतो ) याज्ञवल्क्याच्या समाधीसंबंधाची तर प्रसिद्ध ऋषींनी परीक्षा सुद्धां पाहिली आहे.

**स्वरूपीं दृष्टी निरवधी । अनवच्छिन्न समानबुद्धी । कर्माकर्मी अज्ञान न बाधी । परमसमाधि तिये नांव ॥** ए. भा. २-४३५

**अर्थ :-** स्वरूपांत पराकाष्ठेची तन्मय दृष्टी व कधी न तुटणारी अशी सर्वत्र समबुद्धी ज्याची असते, त्याला कर्माकर्मांतहि अज्ञानाची बाधा होत नाहीं. अशा स्थितीचेच नांव 'परमसमाधि' होय.

श्री संत चोखोबाराय समाधिविषयी आपला अनुभव सांगतात.

**अखंड समाधि होऊनि ठेले मन । गेले देहभान विसरोनी ॥ १ ॥**

**विधिनिषेध भेणे न मोडे समाधि । तुटली उपाधि लिगाडाची ॥ २ ॥**

**चालतां बोलतां न मोडे समाधि । मूळ अंतर शुद्धी कारण हें ॥ ३ ॥**

**चोखा म्हणे ऐसा समाधि सोहळा । जाणे तो विरळा लक्षामाजी ॥ ४ ॥**

**- समाप्त -**

* * *

## * अभंग चौदावा *

**नित्यसत्यमित हरिपाठ ज्यासी ।**
**कळिकाळ त्यासी न पाहे दृष्टी ॥ १ ॥**
**रामकृष्ण उच्चार अनंतराशी तप ।**
**पापाचे कळप पळती पुढें ॥ २ ॥**
**हरि हरि हरि मंत्र हा शिवाचा ।**
**म्हणती जे वाचा तया मोक्ष ॥ ३ ॥**
**ज्ञानदेवा पाठ नारायण नाम ।**
**पाविजे उत्तम निजस्थान ॥ ४ ॥**

**अर्थ :-** हरीचा नित्य, सत्य व अपरिमित जप करणाराकडे कळिकाळ दृष्टीने देखील पहात नाहीं. ॥ १ ॥ वाचेने निरंतर रामकृष्ण नामाचा जप करण्याने तपाच्या अनंतराशी घडतात व त्या योगानें पापाचें समुदायांचे समुदाय पुढे पळून जातात. ॥ २ ॥ हरि हरि हरि हा शिवाचा नित्य जप करण्याचा मंत्र आहे; या मंत्राचे जे कोणी वाचेनें ग्रहण करतील त्यांस मोक्षाची प्राप्ती होईल. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मी निरंतर नारायण नामाची आवृत्ति करतो; त्या योगाने देहत्रयातील अतिउत्तम आत्मस्वरुपस्थानाची मला प्राप्ती झाली आहे. ॥ ४ ॥

**विवरण :**

**नित्य सत्यमित हरिपाठ ज्यासी । कळिकाळ त्यासी न पाहे दृष्टी ॥**

मागच्या अभंगात नामस्मरणानें समाधि कशी लागते, हें सांगितले आहे, पण त्यातील सारांश सर्व लोकांना कळणे कठीण म्हणून सर्वांना समजेल अशारितीने या अभंगात सांगतात. दुःखाची अपेक्षा करणारा

व सुख नको म्हणणारा असा कोणीतरी सांपडेल काय ? तर नाहीं. मनुष्याला दुःख नको आहे. नाथ महाराज सांगतात -

**मजलागीं दुःख होआवें । ऐसें कोणी भावीना जींवें ।**
**न वांछितां दुःख पावे । येणें न संभवे स्वतंत्रता ॥** ए.भा.१०-४४६

**जगस्पृहे आस्पद । एक सार्वभौमपद ।**
**न मरणें निर्विवाद । जगा पढियें ॥** ज्ञा. १६-२३१

**अर्थ :-** सार्वभौम राजाची गादी हेंच ज्याप्रमाणे सर्व जगाच्या महत्त्वाकांक्षेचे एक ठिकाण आहे; अथवा आपण मरू नये, हे निर्विवादपणे सर्व जगाला आवडते.

**अगा मर हा बोलु न साहती । आणि मेलिया तरी रडती ।**
**परि असतें जात न गणिती । गहिंसपणें ॥** ज्ञा. ९-५१३

**अर्थ :-** कोणी कोणाला 'तूं मर' असे म्हटले तरी ते त्यांस सहन होत नाहीं आणि (त्याच्या निवृत्तीचा उपाय) न करता मेल्यावर रडत बसतात. पण असलेले आयुष्य व्यर्थ जात आहे, हे त्यांना मूर्खपणामुळे कळत नाहीं.

आतां आपण ठाकठीक असतांना आपल्याला मरणाचा आठव होणे शक्य नाहीं; परंतु प्लेगसारखा एखादा प्रसंग आल्यावर मरण हा काय प्रकार आहे तें कळते. राव असो कीं रंक असो स्थूल देहाचे मरण कोणालाच चुकणे नाहीं. तुकाराम महारांजासारखे स्थूल देहासह वैकुंठाला जाणारे एखादे संतमहात्मे विरळे. एऱ्हवी मृत्यु सर्वांना अटळ आहे.

**देहाचिया गांवा आलिया । जन्ममृत्यूचिया सोहळिया ।**
**ना म्हणों नये धनंजया । जियापरी ॥** ज्ञा. १८-१०१



अर्थ :- भगवंत सांगतात अर्जुना, ज्याप्रमाणें देहरूप गांवास आल्यावर जन्म-मरणाचे सोहळे भोगण्यास नाहीं म्हणता येत नाहीं.

**श्रम धरीसीं या देहाचा । विठ्ठल म्हण कारे वाचा ।**
**पडोनि जाईल कलेवर । विठ्ठल उच्चारी पां सार ।** ज्ञा. म.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, अरे बाबा तूं या देहाचा कितीहि मोह धरलास तरी एकदा कधीतरी तुझे मरण ठरलेले आहे, म्हणून सर्व नामाचे सार जे विठ्ठलनाम तें तूं वाचेनें घेत रहा. तुकाराम महाराजहि सांगतात -

**तुका म्हणे वाहे मरणाचे भय ।**
**रक्षण उपाय करूनि असे ॥** तु. म. ३२२७

अर्थ :- तुकाराम महाराज म्हणतात, एखादा जरी नेहमीच मरणाचे भय बाळगीत असला, तरी आपले जीवन व वैभव रक्षण करण्याचे उपायहि तो करीतच राहतो-

ज्ञानेश्वर महाराज सांगतात, तुला खरोखरच जन्म मरणातून सुटायचे असेल तर तुला सोपा उपाय सांगतो -

**नित्य सत्यमित हरिपाठ ज्यासी । कळिकाळ त्यासी न पाहे दृष्टी ॥**

या चरणांत भजन नित्य केले पाहिजे असे सांगतात. शनिवार, गुरुवार इत्यादि नाटकाप्रमाणे नको. नाथ महाराज सुद्धां भजनाची नित्यता कशी असावी तें सांगतात -

**जया परमार्थाची चाड । तेणे सांडावे लिगाड ।**
**धरूनि भजनाची चाड । नित्यनेम आदरे ॥** ए. म.

परमात्मा अखंड व नित्य असल्यामुळे त्याचे भजनहि अखंड व नित्य केले पाहिजे. तसेच वारकऱ्याने व शक्य झाल्यास

गृहस्थ्याने सुद्धा हरिपाठ रोज म्हटला पाहिजे. ब्राह्मणांची जशी सकाळ संध्याकाळ संध्या करण्याची प्रथा आहे त्याप्रमाणे ( वारकऱ्यांनी तर हरिपाठ दिवसातून किमान दोनदा तरी म्हटला पाहिजे ) वारकऱ्याचा परमार्थ हा फक्त बाह्यात्कारी नसावा तर अंतःकरणातून हरिनामाची ओढ असावी. त्याने मरण आले तरी खोटे बोलू नये. ही झाली सत्यत्वाची व्याख्या. आतां अमिद (= अमर्याद ) हरि जसा देश-काल-वस्तु परिच्छेदशून्य आहे, तसेच भजनहि देश-काल-वस्तु इत्यादी मर्यादा सोडून केले पाहिजे, मगच त्याच्याकडे कळिकाळ पहात नाहीं.

**कळिकाळावरी घातली कास एक एकाहूनि बळी रे ।**
**नाचती आनंदकल्लोळी पवित्र गाणे नामावळी रे ।। तु. म.२४०**

अर्थ :- श्रीहरीच्या आनंदाच्या लहरीत तें नाचतात व पवित्र असे श्रीहरीचे नाम गातात व कळिकाळासोबत लढण्यासाठी ज्यांनी कासोटा घातला आहे असे तें एकापेक्षा एक बलाढ्य आहेत.

एऱ्हवी देहतादात्म्य घेऊन जो मनुष्य राहतो तो कळिकाळाच्या तडाख्यातून सुटणार नाहीं.

**न्याहाळी पां केव्हडा । पसरलासे चवडा ।।**
**जो करूनियां माजिवडा । आकारगजु ।। ज्ञा. १३-६४**

**अर्थ** :- सर्व आकारमात्र पदार्थ हाच कोणी हत्ती जो ज्या चवड्यामध्ये धरला गेला आहे, तो काळरूपी सिंहाचा पंजा केवढा मोठा आहे, पहा.

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**
**मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते ।। गी. ८-१६**

अर्थ :- अर्जुना, ब्रह्मलोकांसकट सर्व लोकीचे प्राणी पुनर्जन्म पावणारे आहेत. हे कुंतीपुत्रा, परंतु मजप्रत आल्याने पुनर्जन्म नाहीं.



**कैसे थोरीवेचें मान पाहें पां । तो सृष्टीबीजाचा साटोपा ।**
**परि पुनरावृत्तीचिया मापा । शीग जाहला ।। ज्ञा. ८-१६६**

**अर्थ** :- ब्रह्मदेवाच्या मोठेपणाचे प्रमाण कसे आहे पहा, कीं तो सृष्टीबीजाची साठवण आहे. तरीपण तोहि पुनरावृत्तीच्या मापाला शीग (टोक) झाला.

**येथें नाहीं उरो आले अवतार ।**
**येर तें पामर जीव किती ।। तु. म. २७९१**

अर्थ :- येथे, या मृत्युलोकांत मत्स्यकूर्मादिक अवतार उरले नाहीत, तर मग इतर सामान्य जीवांची काय किंमत आहे ?

परंतु जन्ममृत्यूरूपी या काळफासातून नामस्मरणाने मुक्तता मिळते असा तुकाराम महाराजांचा अनुभव आहे.

**कास घालोनि बळकट । झालो कळिकाळाकरी नीट ।**
**केली पायवाट । भवसिंधूवरूनि ।। तु. म. ३३८६**

अर्थ :- कमरेस बळकटपणे काचा मारून प्रत्यक्ष कळिकाळाच्या मस्तकावर पाय देऊन मी नीट उभा राहिलो आहे व संसारसमुद्र पार उतरून जाण्याकरिता सोपी पायवाट केली आहे.

**काळ गुलाम सलाम करी । तुकया घरी राबतसे ।। तु. म.**

हे तेव्हांच शक्य आहे जेव्हा माणसाने वाचेने रामकृष्णहरि नामाचा जप करण्याचा संकल्प केला तर व ह्या योगाने पापाचे समुदायाचे समुदाय पुढे पळून जातात हेच ज्ञानेश्वर महाराजांनी द्वितीय चरणांत सांगितले आहे.

**रामकृष्ण उच्चार अनंतराशी तप । पापाचें कळप पळती पुढें ।। २ ।।**

वास्तविक नामस्मरण मनाने करावे. प्रथम अभ्यास करतांना मनात ध्यान असते. उच्चार स्मरण बरोबर असते. पुढें पुढें मन स्वतंत्र भटकू लागते -

**नाम जपताहे वैखरी । चित्त धावें विषयावरी ।**
**कैसे होतसे स्मरण । स्मरणामाजी विस्मरण ।।** ए. भ.

म्हणजे तोंडाने नामाचा जप चालू असतांना मन मात्र विषयांकडे धाव घेते. अशाने नामस्मरण तर होतच नाहीं उलट जे पूर्वस्मरणाचे विषय त्याचेहि विस्मरण होते.

म्हणून ज्ञानेश्वर महाराज सांगतात, तुम्ही प्रथम मोठ्याने नामोच्चार केला पाहिजे. तुकाराम महाराज म्हणतात, -

**कळे न कळे ज्या धर्म । ऐका सांगतो रे वर्म ।।**
**माझ्या विठोबाचे नाम । अट्टाहासे उच्चारा ।।** तु. म. २६६०

**अर्थ** :- अरे, ज्यांना धर्म कळत असेल अथवा नसेल असे कोणी असतील, त्यांना मी एक मार्मिक वर्म सांगत आहे, तें म्हणजे तुम्ही माझ्या विठोबाचे नाम जोरजोराने उच्चारा.

शब्दशः अर्थ पाहूं गेलो असता असेहि सांगता येईल की, मोठ्याने टाळ्या वाजवून आवाज केला तर झाडावरील पक्षी जसे उडून जातात, तद्वत् मोठ्याने टाळ्यांसहित नामोच्चार केला तर पातकांचे कळप पळून जातात. अर्थवादाचा भाग सोडला तर हे मात्र नक्की आहे की नामस्मरण हे सर्व पातकांच्या निवृत्तीचे प्रभावी साधन आहे. हरि या मंत्राचा जप साक्षात् शंकर सुद्धां करतात. किंबहुना हा त्यांचाच मंत्र आहे आणि अशा पावन मंत्राच्या उच्चाराची वाचेला सवय लावली असता सहज मोक्ष प्राप्त होतो. हेच तृतीय चरणांत सांगितलें आहे -

**हरि हरि हरि मंत्र हा शिवाचा । म्हणती जे वाचा तया मोक्ष ।। ३ ।।**



देवासुरांनी केलेल्या समुद्रमंथनाच्या वेळी शिवशंकर हलाहल विष प्याले त्यामुळें त्यांच्या अंगाचा दाह झाला. परंतु तो दाह कशानेहि शांत होईना म्हणून जेव्हां त्यांनी भगवंताचे नामस्मरण केले तेव्हां तो दाह शांत झाला. अहो, जेथे साक्षात् भगवान शंकर हे हरि या मंत्राचा जप करतात मग सामान्य जीवांनी हा जप कां करू नये ? नामस्मरण करतांना आपल्या राज्याचा अभिमान होईल म्हणून शंकरांनी स्मशानांत राहणे पसंत केले.

**येणेंचि क्षेत्राभिमानें । राज्य त्यजिले ईशानें ।**
**गुंति जाणोनि स्मशानें । वासु केला ।।** ज्ञा. १३-२४

अर्थ :- क्षेत्राचा अभिमान होईल व कैलासाचे राज्य अडथळा करील म्हणून शिवांनी स्मशानांत वास केला.

आता, मोक्ष मिळणे म्हणजे एखादी वस्तु मिळणे किंवा भूभागाची जहागीरी मिळणे असे नाहीं. तुकाराम महाराज सांगतात -

**नाहीं देवापासीं मोक्षाचे गाठोडे ।**
**आणूनि निराळें द्यावे हातीं ।।** तु. म. ५२०

अर्थ :- देवाजवळ वेगळे असे आपल्या हातात आणून देण्यासारखे मोक्षाचे गाठोडे नाही, तर मोक्ष हा स्वप्रयत्नाने व आपल्या अधिकाराच्या बळाने मिळवावा लागतो. मोक्ष म्हणजे आपल्या यथार्थ स्वरूपाला जाणणे होय. मी देवच आहे, म्हणजे शिवस्वरूप ब्रह्म जे तें मी आहे असे दृढ अपरोक्ष ज्ञान होणे यालाच मोक्ष म्हणतात आणि हा मोक्ष नामस्मरणानें मिळतो. तुकाराम महाराज म्हणतात -

**मुखीनाम हाती मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांची ।।** तु. म. २५३४

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, अशा या नामाचा पाठ करीत

असतांना त्यायोगाने सर्वात श्रेष्ठ असे जे निर्दोष स्वरूप तें माझ्या अनुभवाला आले असे प्रस्तुत अभंगाच्या शेवटच्या चरणांत सांगतात -

**ज्ञानदेवा पाठ नारायण नाम । पाविजे उत्तम निजस्थान ॥ ४ ॥**

या नारायण नामपाठ योगाने उत्तम जे स्थान म्हणजे आत्मस्वरूप त्याची प्राप्ती झाली. उत्तम म्हणजे तिन्ही देहातीत जो आत्मा तो अनुभवास येणे. याला उत्तमस्थानप्राप्ती म्हणतात.

**मग इदंतेसि वाळलें । जे मीपणेंवीण डाहारले ।**
**तें रूप पाहिजे आपलें । आपणपांचि ॥ ज्ञा. १५-२६७**

अर्थ :- मग आपल्याहून जे भिन्न प्रतीत होते त्यासंबंधाने हृदयभाव (हें-तें पणा) स्फुरतो. त्यांचा ज्या वस्तूच्या ठिकाणी किंचितहि संबंध नसतो व (इदंच्या सापेक्ष) आपल्यासंबंधाने अहंभाव (मीपणा) असतो. आत्मस्वरूप एकरस असल्याकारणाने तेथे भिन्न प्रतिती नाहीं; म्हणून तेथे इदं स्फुरत नाहीं व त्यासापेक्ष अहं सुद्धा स्फुरत नाहीं. असे जे अहं इदं वृत्तिशून्य प्रसिद्ध असलेलं आत्मस्वरूप तें आपण पहावे. यालाच मोक्ष म्हणतात आणि आपल्या मूळ स्वरूपी येण्यासाठी काळवेळ पाहण्याची गरज नाहीं. जसे बाहेरगांवी जाण्यासाठी आपण मुहूर्त पाहतो पण घरी परतण्यासाठी मुहूर्त पहात नाहीं. असा जीवाचा उत्तम असणारा जो पुरुषार्थ म्हणजे मोक्ष त्याची प्राप्ती करून घेणे जीवाचे परमकर्तव्य आहे आणि त्यासाठी साधन नामस्मरण आहे म्हणून ज्ञानेश्वर महाराज सांगतात - **हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।**

**- भावार्थ समाप्त -**

**व्याख्यान :-** या जगातील सर्व पदार्थ नाश पावणारे आहेत, म्हणजेच क्षणभंगूर आहेत. म्हणजे संपूर्ण जगत् हेच क्षणभंगूर आहे.



**क्षणभंगूर हे जाय न कळतां ।**
**ग्रास गिळी सत्ता नाही हातीं ॥ तु. म. ३३४७**

अर्थ :- क्षणामध्यें न कळताच शरीर पडेल, हातात घेतलेला घास मी गिळीनच एवढी देखील सत्ता आपल्या हातांत नाहीं.

**नाशिवंत देह जाणार सकळ ।**
**आयुष्य खातो काळ सावधान । तु. म.३६४१**

अर्थ :- शरीरसमुद्रांत बुडालेल्या लोकांनी तरुन जाण्याकरीता हा एक विचार वारंवार करावा कीं, हा देह व देहसंबंधी सर्व नाशिवंत (क्षणभंगूर) असून हे केव्हाहि लयाला जाणारे आहे. ह्या देहाचेआयुष्य काळ खातो म्हणून सावध रहावे.

**हा देहो नाशिवंत मळमूत्राचा बांधा । वरी चर्म घातलें रे कर्म कीटकाचा सांदा । रवरव दुर्गंधी रे अमंगळ तिचा बांधा । स्मरे त्या हरिहरा शरण जाई गोविंदा ॥ ज्ञा. म.**

अर्थात, सर्व नाशिवंत आहे. तर ज्ञानेश्वर महाराज त्याच्याकडे कळिकाळ पाहणार नाहीं असे म्हणतात कसे ? जर ते देहदृष्टीने सांगणे नसून आत्मदृष्टीने सांगतात. भजनाने त्याचे स्थूल शरीर ब्रह्मरूप होते व मन अमर होते म्हणजे मन रामरूप होते.

**मन हे राम झाले । मन हे राम झाले ॥**

**ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनी ।**
**भाग्य तरी ऋणी देव ऐसा ॥ तु. म. ६६३**

अर्थ :- कारण हरीच्या या कीर्तनाने देह ब्रह्मरूप होतो व देव त्याचा ऋणी होतो. अशा प्रकारचे भाग्य कीर्तनाने प्राप्त होते. नामनिष्ठ भक्तांना परमात्मा सांभाळतो.

आहे, याची पर्वा नसते (त्याप्रमाणे सिद्ध पुरुषाची स्वदेहासंबंधी स्थिती असते. तो देहाभिमानरहीत असा सर्वकाळ ध्यानारूढ असतो).

मग अशा सिद्धांना काळ काय करील ? तुकाराम महाराजांना नेण्यासाठी स्वतः देवांनी विमान पाठविले. काळ तर त्यांचा गुलामच होता.

**प्रयाणकाळीं देवे विमान पाठविले । कळीच्या काळामाजी अद्‌भुत वर्तविले । मानव देह घेऊनि निजधामां गेले । निळा म्हणे सकळ संतां तोषविले ।। निळोबाराय**

**अर्थ :-** प्रयाणकाळी, निजधामास जाण्याच्या वेळी देवाने वैकुंठाहून विमान पाठविले. कलियुगाच्या काळामध्ये आश्चर्यच घडविले. तें असे कीं तुकाराम महाराज मनुष्य देहासह निजधानाला गेले व त्यांनी सर्व संतांना संतुष्ट केले. असे निळोबाराय म्हणतात.

अशा परमोच्च अवस्थेवर जाण्यासाठी नामस्मरण अत्यंत गरजेचे आहे. नामाच्या राशी निर्माण केल्या कीं मग पातकें पळतात. कळिकाळ पळतो व देह भगवत्स्वरूप होतो. नामधारक भक्त आपल्या नामस्मरणाने सर्व जगाला पवित्र करून टाकतात.

धवळले जगदाकार । अंधार तो निरसला ।। तु. म.३९४३

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, सर्व जगत् हे चैतन्य ज्ञान प्रकाशाने प्रकाशित झाले आहे. म्हणून माझा अज्ञानरूपी अंधःकार नाहीसा झाला आहे.

एवढी श्रेष्ठता, ज्ञानोत्तर अवस्था, भगवत्स्वरूपी एकरूपता, एका नामचिंतनाच्या बळावर सर्व संतांनी मिळविली व आपल्यालाहि तें तसाच उपदेश करीत आहेत. **हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।**

**- समाप्त -**

## * अभंग पंधरावा *

**एक नाम हरी द्वैत नाम दुरी ।**
**अद्वैत कुसरी विरळा जाणे ।। १ ।।**
**समबुद्धी घेतां समान श्रीहरी ।**
**शमदमा वरी हरी झाला ।। २ ।।**
**सर्वांघटीं राम देहादेही एक ।**
**सूर्य प्रकाशक सहस्ररश्मीं ।। ३ ।।**
**ज्ञानदेवा चित्तीं हरिपाठ नेमा ।**
**मागिलिया जन्मा मुक्त झालो ।। ४ ।।**

**अर्थ :-** जो एक हरीचे नाम जाणतो, त्याच्याजवळ द्वैताचे नांव सुद्धा उरत नाहीं. असा अद्वैतानुभव घेण्याची कुशलता जो जाणतो, असा मनुष्य विरळा. ।। १ ।। अशारितीने जो समबुद्धीने सर्व ठिकाणी सारख्या असणाऱ्या श्रीहरीला पाहतो, तो हरिरूप होतो, म्हणजे भजन करणाऱ्या साधकाला शमदमाचे वेगळे साधन करण्याची आवश्यकता राहत नाहीं. ।। २ ।। जसा हजार किरणांतून तेजोरूपी एकच सूर्य भरलेला असतो, म्हणजे त्या हजार किरणांचा प्रकाशक एक सूर्यच असतो, तसा सर्व देहांमध्ये एकच व्यापक राम आहे. ।। ३ ।। ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मी आपल्या चित्तामध्ये सर्वकाळ हरीचेच चिंतन करण्याचा नियम केला आहे. त्या योगाने मागील (या जन्माच्या मागाहून येणारे पुढचे) जन्मापासून मी सुटलो. आतां मला पुन्हा जन्म नाहीं. ।। ४ ।।

**एकनाम हरी द्वैत नाम दुरी । अद्वैत कुसरीं विरळा जाणे ।। १ ।।**

**विवरण :-** प्रस्तुत अभंगामध्ये ज्ञानेश्वर महाराज नामचिंतन करणाऱ्या

भक्ताला पुन्हा नामचिंतनाचे फायदे सांगतात. हरीच्या एका नामाचे सामर्थ्य द्वैताला कायमचे दूर करण्यास समर्थ आहे, असे सांगतात.

गीतेच्या अठराव्या अध्यायाच्या शेवटी भगवंताने अर्जुनाला विचारले, हे धनंजया, तुझा मोह गेला आहे काय ?

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।**
**कच्चिदज्ञानसम्मोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥** गी.१८-७२

**अर्थ :-** हे पार्था, तूं एकाग्र चित्ताने हे सर्व श्रवण केले आहेस ना ? हे धनंजया, तुझा अज्ञानापासून निर्माण झालेला मोह गेला किंवा नाहीं ? विस्तृत अर्थ असा कीं, भगवान विचारतात आम्ही ज्या ज्या रितीने या गीताशास्त्राचा तुला उपदेश केला तो तूं संपूर्ण तुझ्या चित्तांत सांठविला कीं अनादराने त्यातील कांहीं सोडून दिले ? जर हे सर्व ज्ञान तुझ्या अंतःकरणापर्यंत पोहोचले असेल तर लवकर सांग .

**जैसें आम्ही सांगितलें । तैसेंचि हृदयीं पावलें ।**
**तरी सांग पां वहिलें । पुसेन तें मी ॥** ज्ञा. १८-१५४३

याचे उत्तर देतांना अर्जुन म्हणतो, भगवंत, तुमच्या नांवापुढे द्वैत रहात नाहीं, मग तुम्ही प्रत्यक्ष उपदेश केल्यानंतर मोह कसा राहील ? पण असे जाणणारा अर्जुनासारखा एखादाच भक्त विरळा असतो. **अद्वैत कुसरीं विरळा जाणे ।** जो एक हरीचे नाम जाणतो त्याच्याजवळ द्वैताचे नांवसुद्धा रहात नाहीं. असा अद्वैत कुसरी म्हणजे अद्वैतानुभव घेण्याची कला अंगीं असणारा चाणाक्ष भक्त असणे गरजेचे आहे. एकनाथ महाराज सांगतात -

**एका जनार्दनी थोडे । कोटीमाजीं एक निवडे ॥** ए. म.

आपली चंचल बुद्धी समत्वाच्या ठिकाणी स्थिर केली म्हणजे आपोआपच सर्वत्र समत्वाने विस्तारलेल्या हरीच्या ठिकाणी तो भक्त



एकरूप होतो. मग त्या साधकाला शमदमादि साधनें करायची गरजच रहात नाहीं. शम म्हणजे मनोनिग्रह आणि दम म्हणजे इंद्रियांचें दमन करणे. पण ज्याच्या मनामध्ये एक हरीच विराजमान झालेला आहे त्याला विषयापासून मनाचा निग्रह करण्याची वेगळी गरजच भासत नाहीं आणि इंद्रियें तर मनाचे गुलाम आहेत. तें आपोआप काबूत होतात.

समबुद्धीच्या बाबतीत एकनाथ महाराजांच्या अवतार कार्यातील एक प्रसंग प्रसिद्ध आहे. रामेश्वराच्या पूजेसाठी आणलेले काशीचे तीर्थ त्यांनी तहानेने तळमळणाऱ्या गाढवाला पाजले व त्या गाढवाच्या ठिकाणी आपला भगवंत रामेश्वर पाहिला. अशी समबुद्धी सर्व भूतांच्या ठायी असावी.

**समबुद्धी घेतां समान श्रीहरी । शमदमा वरी हरी झाला ॥ २ ॥**

सर्व भूतांच्या ठायी समबुद्धी कां ठेवावी ? तर याचे उत्तर ज्ञानेश्वर महाराज तृतीय चरणांत देतात.

**सर्वांघटीं राम देहादेही एक । सूर्य प्रकाशक सहस्ररश्मी ॥ ३ ॥**

जसा हजारो किरणांना प्रकाशमान करणारा सूर्य एकच आहे त्याप्रमाणे सर्व चराचर सृष्टीमध्ये एकच हरी व्यापक आहे. मुख्य वेदांताचे सारहि हेच आहे.

**हरि व्यापक सर्वगत । हा तंव मुख्यत्वे वेदांत ।**

**एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा । कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः । साक्षी चेताःकेवलोनिर्गुणश्च ॥** श्वेता.उप. ६-११

**शून्य स्थावर जंगम व्यापूनि राहिला अकळ ।**
**बापरखुमादेवीवरु विठ्ठलु सकळ ॥** ज्ञा. म.

म्हणजे या चराचर सृष्टीमध्ये शून्यरूपाने हरीच व्यापक आहे

व सर्व स्थावर जंगम पदार्थांचा चैतन्यविलास हा हरीच आहे.

**व्यापकु विठ्ठल आहे सर्वदेशी । जरी सांडोनि पाहसी भेदभ्रमु ।। तो नाही ऐसा ठाव उरलासे कवण । सर्वत्र संपूर्ण गगन जैसे ।।** ना. म.

असा हा हरि देशकालवस्तुपरिच्छेदातीत आहे. ज्याप्रमाणे आकाश कोठे आहे किंवा कोठे नाहीं असे सांगता येत नाहीं म्हणजे तें सर्वत्र व्यापक आहे. तसा हरी सर्व चराचरांत व्यापून उरलेला आहे.

आतां अशा व्यापक सत्तेने युक्त असलेल्या हरीच्या भक्तीचे फलहि तेवढेच व्यापक आहे. ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या शेवटच्या चरणांत सांगतात -

**ज्ञानदेवा चित्तीं हरिपाठ नेमा । मागिलिया जन्मां मुक्त झालो ।। ४ ।।**

माझ्या चित्तांत सतत नामस्मरण असल्यामुळे मी यानंतर मागाहून येणाऱ्या जन्मांतून मुक्त झालो आहे. याचा अर्थ असा कीं संतांना त्यांच्या भक्तीचा जो लाभ झाला तो त्यांनी अगदी उघडपणे समाजाला सांगितला. संकुचितवृत्तीने लपवून ठेवला नाहीं. ज्ञानेश्वर महाराज सांगतात. आम्ही येणाऱ्या जन्मांपासून मुक्ती मिळविली आहे, तर तुम्हाला मिळवायला काय हरकत आहे ? पण त्यासाठी चित्तामध्ये एका हरीचे नाम दृढतेने साठवा व सतत हरिनामाचा जप करा म्हणजे जे आम्ही प्राप्त केले तें तुम्हाला सहज मिळेल.

**- भावार्थ समाप्त -**

**व्याख्यान : शम दमा वरी हरी झाला ।। २ ।।** येथे शम आणि दम यांचा विस्तृत विचार करणे आवश्यक आहे. साधकदशेला येण्यासाठी जिज्ञासू हा साधनचतुष्टय संपन्न असावा लागतो. साधनचतुष्ट्याचे चार भाग असतात.

**१) विवेक २) वैराग्य ३) शमादिषट्क आणि ४) मुमुक्षुता**



यापैकी शमादिषट्क याचा आपण विचार करूं. नांवाप्रमाणेच हे सहा आहे. शम, दम, श्रद्धा, उपरम, तितिक्षा आणि समाधान. पैकी शम आणि दम म्हणजे काय ? एवढाच तूर्त या अभंगाच्या दृष्टीने विचार करावा लागेल.

**१) शम :-** ( मनोनिग्रह ) मनाला कामादिविकारांपासून आवरून त्यांस विषयाचे चिंतन करू न देणे, यास शम म्हणतात.

तुका म्हणे मना पाहिजे अंकुश ।
नित्य नवा दिस जागृतीचा ।। तु. म. ३४०४

**अर्थ :-** ज्याप्रमाणे हत्तीला आवरण्यासाठी त्याला अंकुशाचा मार देतात. त्याप्रमाणे साधकाने आपल्या मनांस विचार जागृतीच्या अंकुशाचा मार देऊन त्याला नित्य सावध ठेवावे आणि जर मनावर अंकुश ठेवला नाही तर-

**तुका म्हणे येणे । बहु नाडिले शहाणें ।।** तु. म. ३२५९

या मनाने अनेक शहाणें म्हणविणाऱ्यांना फसविले आहे.

**२) दम :-** (इंद्रियनिग्रह) बाह्य इंद्रियांना शब्दादिक पंचविषयांपासून आवरणे यास दम असे म्हणतात.

**इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाही नये वरी मन ।।**

**अर्थ :-** ( तु. म. ३३२८ ) इंद्रियांना जिंकणे, वासनेचा समूळ नाश करून टाकणे आणि देहादिक प्रपंचांच्या संकल्पहि मनामध्ये येऊ न देणे.

**आणि बाह्येंद्रियांचे धेंडें । पिटूनि विधीचेनि दंडें ।**
**नेदिजे अधर्माकडे । कहींचि जावों ।।** ज्ञा.१८-८३५

**अर्थ :-** बाह्यइंद्रियांचे समुदाय विधीच्या दंडाने पिटून त्यांना अधर्माकडे

कोठेच जाऊं न देणे, यालाच दम म्हणतात.

ज्याचे अंतःकरण स्थिर नसेल, इंद्रियें सैरावैरा धांवत असतील, त्याने शमदमाचा अभ्यास करावा व करणे आवश्यकच आहे. पण येथे नामस्मरणाच्या योगाने मन व इंद्रियें बहिर्मुख वृत्तीवर येतच नाहीत. तर मग शमदमाची गरज काय ?

**तरी कीर्तनाचेनि नटनाचें । नाशिलें व्यवसाय प्रायश्चितांचे । जे नामचि नाहीं पापाचे । ऐसें केलें ॥ यमदमा अवकळा आणिली । तीर्थें ठायावरूनि उठविलीं । यमलोकींची खुंटिली । राहाटी आघवी ॥ यमु म्हणे काय यमावें । दमु म्हणे कवणातें दमावें । तीर्थें म्हणती काय खावें । दोष ओखदासि नाहीं । ऐसे माझेनि नामघोषें । नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें । अवघें जगची महासुखें । दुमदुमित भरलें ॥**

ज्ञा.९-१९७,२००

**अर्थ :-** त्यांनी कीर्तनाच्या उत्कर्षाने प्रायश्चितांचा धंदा नष्ट केला. कारण कीं त्यांनी पापाचे नांवच नाहीसे केले. यमदमांना निस्तेजता आणली. तीर्थांना 'पाप नाहींसे' करणारे असे जे श्रेष्ठ पद मिळाले होते, त्या श्रेष्ठ पदावरून उठविले. पापें करून लोक यमलोकांस जात होते, पण कीर्तनाने ती पापेच नाहींशी झाल्यामुळे पापी यमलोकांस जाणे बंद झाले. यम हे साधन म्हणूं लागले कीं आता निग्रह कोणाचा करावा ? (कारण ज्याचा निग्रह करावयाचा तें मन कीर्तनाच्या योगाने आत्मरूप झाले.) दम हे साधन म्हणू लागले. कोणत्या इंद्रियांचें दमन करावे. (कारण कीर्तनानें सर्व इंद्रियें आत्मस्वरूपांत तल्लीन झाली.) तीर्थें म्हणू लागली पापच जर औषधालाहि राहिले नाहीं तर आम्ही खावे काय ? याप्रमाणे माझ्या नामघोषाने तें विश्वाची दुःखें नाहींशी करतात व सर्व जगच ब्रह्मसुखाने जिकडे तिकडे कोंदून भरतात.



आतां अशा स्थितीत शमदमाचा काय उपयोग आहे ? गोकुळातील एक गौळण म्हणते, आम्हाला परमात्म्याशिवाय कांहींच दिसत नाहीं, काजळ घालण्याची सुद्धा पंचाईत झाली आहे.

**रात्री न कळे दिवस न कळें । अंगीं खेळे दैवत हे ॥** तु. म.३५३१

त्यांना रात्रहि कळत नाहीं आणि दिवसहि कळत नाहीं. त्यांच्या अंगामध्ये हे परमात्मस्वरूप दैवत खेळत राहते.

कहां पग डारू देखे अनेरा । देखे तो सब वोहिने घेरा ॥ तु. म. ११४

अर्थ :- एक गौळण म्हणते, ह्याच्यावांचून अन्य कांहीं दृष्टीस पडेना, मग मी पाऊल तरी कोठे ठेवावे ? जिकडे पहावे तिकडे या देवानेच व्यापले आहे.

आंत हरि बाहेर हरि । हरीने घरीं कोंडिले ॥ तु. म. १२३

अर्थ :- हृदयांत हरीचा बोध आहे, तसेच बाहेरहि हरीस्वरूपाचा बोध आहे. अशाप्रकारे हरीने मला आपल्या स्वरूपाच्या घरांत कोंडले आहे.

जें जें दृष्टी दिसे तें तें हरिरूप । पूजा ध्यान जप त्यासी नाही ॥

जगातील जीं जीं वस्तु दिसेल ती ती ज्याला हरीरूपाने अनुभवास येते; त्याला पूजा, ध्यान तसेच जप करण्याची आवश्यकता नाहीं. असे श्री संत एकनाथ महाराज म्हणतात.

असे अंतर्बाह्य हरीचे स्वरूपच भरले आहे. असा अनुभव आलेल्या भक्ताला शमदमादिक निग्रह करण्याची गरज नाहीं. पण अशी स्थिती जोपर्यंत होत नाहीं तोपर्यंत सतत नामस्मरण करीत राहणे, हा एकमेव सोपा उपाय ज्ञानेश्वर महाराज सर्वांना सांगतात

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥ धृ ॥**

-- समाप्त -

## * अभंग सोळावा *

हरि बुद्धि जपे तो नर दुर्लभ ।
वाचेसि सुलभ रामकृष्ण ॥ १ ॥
रामकृष्ण नामीं उन्मनी साधली ।
तयासी लाधली सकळ सिद्धि ॥ २ ॥
सिद्धि बुद्धि धर्म हरिपाठी आले ।
प्रपंची निवाले साधुसंगें ॥ ३ ॥
ज्ञानदेवी नाम रामकृष्ण ठसा ।
येणें दशदिशा आत्माराम ॥ ४ ॥

**अर्थ :-** ज्याच्या बुद्धिमध्ये हरिचिंतनाचा जप चालू आहे आणि ज्याच्या वाणीमध्ये सुलभ रामकृष्ण नामाचें वास्तव्य आहे असा मनुष्य फारच दुर्लभ असतो. ॥ १ ॥ ज्यांनी रामकृष्ण नामाच्याच भजनाने संकल्पविकल्पात्मक मनरहित अशा निर्विकल्प सहज परमात्मस्थितीचा लाभ करून घेतला, त्यांना परिपूर्ण परब्रह्मसिद्धि प्राप्त झाली अथवा जगातील सर्व सिद्धि प्राप्त झाल्या. ॥ २ ॥ भगवत्‌चिंतनाने बुद्धीला सिद्धि प्राप्त होते, म्हणजे बुद्धीचे मल दूर होऊन तिची उत्तम सिद्धि होते. देहतादात्म्याने पंचविषयांच्या भोगांत गुंतलेल्या व त्रिविध तापाने तप्त झालेल्या प्रापंचिक जीवांची शांति साधूंच्या संगतीने होते. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, नामचिंतनाने माझ्या हृदयांत रामकृष्णस्वरूपाचा ठसाच उमटला आहे, त्या योगाने मला दाही दिशामध्ये आत्माराम भरलेला दिसत आहे. ॥ ४ ॥

**विवरण :-** आतापर्यंत अनेक अभंगात हरिनाम महात्म्य वर्णन



केले आहे त्यामुळे हे साधन अतिउपयुक्त, लवकर फल देणारे, सर्व दुःखाचा नाश करणारे तसेच सुलभ आहे. म्हणून सर्वच जीव आपल्या उद्धारासाठी या साधनाचा आश्रय करीत असतील कारण सुलभ अशा साधनाचा आश्रय कोण करणार नाहीं; परंतु ज्ञानेश्वर महाराजांना या बाबतीत वेगळाच प्रकार दिसून आला. वास्तविक रामकृष्ण नाम हे वाचेने घेणे सुलभ आहे; पण बुद्धि स्थिर करून हरीचा जप करणारा पुरुष दुर्लभ आहे. हेच अभंगाच्या पहिल्या चरणांत ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**हरि बुद्धि जपे तो नर दुर्लभ । वाचेसी सुलभ रामकृष्ण ॥**

नाम सुलभ असतांना तें दुर्लभ कां झाले याचा विचार अभंगाच्या भावार्थानंतर पाहूं.

रामकृष्ण नाम हे सुलभ जरी दिसत असले तरी त्याचे श्रेष्ठ सामर्थ्य आहे, त्यापासून उन्मनीनामक श्रेष्ठ अवस्था प्राप्त होते. तसेच सर्व सिद्धि त्यास प्राप्त होतात; हे अभंगाच्या दुसऱ्या चरणांत ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**रामकृष्ण नामी उन्मनी साधली । तयासी लाधली सकळ सिद्धि ॥ २ ॥**

'उन्मनी अवस्था' म्हणजे काय त्याचा आपण थोडक्यांत विचार करूं. सर्व प्राणी नेहमी जागृति, स्वप्न, सुषुप्ति या तीन अवस्थांचा अनुभव घेत असतात. जागृतावस्थेत स्थूल शरीर, स्वप्नावस्थेत सूक्ष्म शरीर तसेच सुषुप्ति अवस्थेत कारण शरीर आहे. एवढ्यासाठी तिन्ही शरीरें किंवा पंच कोशांचा निरास होणे म्हणजेच कार्यकारणाचा नाश होय. जागृति व स्वप्न या दोन अवस्था कार्यरूप व सुषुप्ति अवस्था कारणरूप आहे आणि कार्यरूप व कारणरूप या अवस्था ज्या ठिकाणी लयाला जातात (नाश पावतात) त्यास उन्मनी अवस्था म्हणतात.

**तुका म्हणे तें उन्मनी । नाश कार्याकारणी ॥ ४ ॥** तु.म. ३३५५

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, ज्या ठिकाणीं कार्यकारणाचा नाश होतो, त्या अवस्थेस उन्मनी असे म्हणतात. (जग हे कार्य व अविद्या हे कारण या दोघांचा नाश होऊन सर्वत्र देवाची प्रतिती येणे यालाच 'उन्मनी' म्हणतात. म्हणजे केवळ स्वरूपानुभवाची अवस्था ती 'उन्मनी' होय.) मन हे परमात्मस्वरूपी लीन होणे यालाच उन्मनी अवस्था म्हणतात ही अवस्था प्राप्त होण्याला अखंड रामकृष्ण नामाचा जप केला पाहिजे म्हणजे मन रामरूप होईल.

**राम म्हणता रामचि होईजे ॥ १ ॥** तु. म. ३८१

**अर्थ :-** जो कोणी सर्वकाळ रामनाम स्मरण करील तो रामरूपच होईल.

**मन हे राम झाले मन हे राम झाले ।** ज्ञा. म. ७६४

**अर्थ :-** रामाचे भजन (चिंतन) करीत असतांना मन रामच झाले.

**सदानामघोष करूं हरिकथा । तेणे सदा चित्ता समाधान ॥** ४०२८

**अर्थ :** तु. म. म्हणतात, आम्ही सर्वकाळ नामघोष करून हरीची कथा करतो; त्यामुळे आमच्या चित्तांत सर्वकाळ समाधान असते.

**निजभक्ति पावल्या संपूर्ण । भक्तीं न मागतां जाण । अष्ट महासिद्धी आपण । त्याचे आंगण वोळंगती ॥ ३३२ ॥** ए. भा. १९-३३२.

**अर्थ :-** निजभक्ति पूर्णपणें प्राप्त झाली कीं भक्ताने न मागतांच अष्टमहासिद्धि आपण होऊन त्याच्या अंगणांत येऊन उभ्या राहतात.

**या या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करीं ।**
**रिद्धि सिद्धि द्वारीं । कर जोडुनी तिष्ठती ॥ २ ॥** तु. म.२५४६

**अर्थ :-** या वैष्णवांचे घरीं वस्ती होण्याविषयीं प्रेमसुख इच्छा करीत आहे, त्यांच्या द्वारी रिद्धि-सिद्धि हात जोडून उभ्या आहेत. सर्वांत आत्मसिद्धि हीच परम सिद्धि आहे.



**देऊळाचिया कामा कळसु । परम गंगेसी सिंधुप्रवेशु । कां सुवर्णशुद्धी कसु । सोळावा जैसा ॥ ९८१ ॥ तैसें आपुलें नेणणें । फेडीजे का जाणणें । तेंही गिळूनि असणें । ऐसी जे दशा ॥ ९८२ ॥ तियेपरतें कांहीं । निजपणें येथ नाहीं । म्हणोनि म्हणिपे पाहीं । परमसिद्धि ते ॥ ९८३ ॥** ज्ञा.१८-९८१,८३

**अर्थ :-** देवळाच्या कामाला जशी कळस ही शेवटची मर्यादा आहे अथवा गंगेस जसा समुद्रप्रवेश हीं शेवटली हद्द आहे अथवा ज्यांप्रमाणे सोन्याच्या शुद्धपणांत सोळावा कस हा शेवटला कस आहे; ॥ ९८१ ॥ त्याप्रमाणें जे ज्ञान आत्मस्वरूपाचें अज्ञान नाहीसें करतें तें ज्ञानहि गिळून असणें, अशी जी अवस्था. ॥ ९८२ ॥ त्या नैष्कर्म्य स्थितीच्या पलीकडे या जगांत कांहीं मिळविण्याचे राहिले नाहीं, म्हणून सर्व सिद्धीत ही सिद्धि (नैष्कर्म्य) श्रेष्ठ म्हटली जाते.

ही परमश्रेष्ठ असणारी अशी आत्मसिद्धि देखिल भगवन्नाम कीर्तनाने प्राप्त होते. **तयासी लाधली सकळ सिद्धि ॥ २ ॥**

सिद्धि, बुद्धि (ज्ञान) धर्म इत्यादिक हरिपाठांत म्हणजे हरिचिंतनांत स्थिरावतात तसेच त्रिविध तापाने पोळलेले प्रापंचिक जीव साधुच्या संगतीत शांत होतात हेच ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या तिसऱ्या चरणांत सांगतात -

**सिद्धी बुद्धि धर्म हरिपाठी आले । प्रपंची निवाले साधुसंगें ॥ ३ ॥**

मागे हरिपाठाच्या तेराव्या अभंगांत सिद्धि, वैभव संपन्न बुद्धि याचा विचार येऊन गेला आहे, त्यामुळे त्याचा विचार करण्याची गरज नाहीं. आतां धर्म हा हरिपाठात कसा येतो हे थोडक्यांत पाहूं.

धर्म हा कल्याण करणारा आहे त्याचे प्रवृत्ति धर्म, निवृत्ति धर्म वगैरे अनेक प्रकार आहेत. त्यामध्ये मुख्य धर्म म्हणजे चित्तामध्ये देवाची धारणा होय.

**मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसानी अंतीं ॥ २ ॥** तु. म.३४२५

**अर्थ :-** सर्व धर्मांमध्ये श्रेष्ठ धर्म हाच आहे कीं, आयुष्याच्या आरंभापासून अखेरपर्यंत (अवसानी) प्रसंगावधानी होऊन हरीला चित्तांत ठेवणे होय. तसेच नामस्मरण हाच धर्म.

**निजधर्म हा चोखडा । नाम उच्चारु घडघडां ॥**
**भुक्तिमुक्तीचा सवंगडा । हा भवसिंधुतारक ॥ २ ॥** ज्ञा. म. १४२

**अर्थ :-** आपला हाच हिताचा धर्म आहे, असा त्यांचा निश्चय असल्यामुळे तें श्रीहरीच्या नामाचा उच्चार धडधडा करतात कारण भक्ति हीच मुक्तीला पाठविणारी नौका असल्यामुळे संसारातून तारण्यास तीच समर्थ आहे. सर्व धर्माला कारण हरिनाम आहे.

**सकळ धर्मांचें कारण । नामस्मरण हरिकीर्तन ।**
**दया क्षमा समाधान । संतजन साधिती ॥ १ ॥** ज्ञा. म. १४२

**अर्थ :-** यज्ञ यागादि अनंत साधनें संसार तरुन जाण्यास सांगितली आहेत. त्यांत मुख्य साधन श्रीहरीचे कीर्तन, नामस्मरण, दया, क्षमा व समाधान ही आहेत आणि हीच साधक संतजन म्हणजे साधक लोक संपादन करतात. तसेच त्रिविध ताप संतसंगतीने जातात.त्याचे तीन प्रकार आहेत.

**१) अध्यात्मिक ताप** :- शरीरात रोगराई निर्माण होणे.
**२) अधिभौतिक ताप** :- चोर, व्याघ्र, सर्प इत्यादिकांपासून पिडा होणे.
**३) अधिदैविक ताप** :- अतिवृष्टी, अनावृष्टी, वीज पडणे, अग्नि



लागणे इत्यादिकांपासून दुःख होणे, या सर्वांची निवृत्ति साधूच्या संगतीने होते.

**त्रिविध तापाची झाली बोळवण । देखिल्या चरण वैष्णवांचे ॥**
**पाप ताप दैन्य जाय उठाउठी । जालिया या भेटी हरिदासांची ॥**

**अर्थ :-** ( तु. म. २२३४ ) या हरिदासांची भेट झाली असतां सर्व प्रकारची पापें, त्रिविध ताप आणि सर्व प्रकारचे दारिद्र्य तात्काळ जाते.

**या संतांसी भेटतां । हरे संसाराची व्यथा ।**
**पुढतां पुढती माथां । अखंडित ठेवीन ॥ ३ ॥** ज्ञा. म. ७१३

**अर्थ :-** या संतांच्या भेटीत संसाराची व्यथा नाहीशी होते त्यांच्या चरणावर मी वारंवार मस्तक ठेवीन.

**प्रपंची निवालें साधुसंगें ॥ ३ ॥**

या अभंगातून ज्ञानेश्वर महाराजांनी आपला स्वानुभव प्रकट केला आहे. रामकृष्ण नामाने माझ्या हृदयांत रामकृष्ण स्वरूपाचा ठसाच उमटला आहे; त्यामुळे मला दाही दिशांमध्ये आत्माराम भरलेला दिसत आहे. हेच ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या शेवटच्या चरणांत सांगतात.

**ज्ञानदेवी नाम रामकृष्ण ठसा । येणे दशदिशा आत्माराम ॥ ४ ॥**

या ठिकाणी नामाला ठसा म्हटले आहे. ज्याप्रमाणे ठसा असतो त्या ठस्यात जी अक्षरें असतात असा ठसा (शिक्का) दुसऱ्या कागदावर उमटवला असता तो जशाचा तसा उमटतो त्यात कांहीं बदल होत नाहीं. तद्वत् नामकृष्ण नाम हा ठसा आहे. सर्व जगत हा कागद आहे. त्या कागदावर रामकृष्ण नामरूपी ठसा (उमटवला) मारला असता रामकृष्ण स्वरूप जसेच्या तसे उमटते याचे तात्पर्य, असे आहे कीं जगातील पदार्थांमध्ये परमात्मा आहे असे नाम घेणाऱ्यास दिसून येते.

**जें जें दृष्टी दिसे तें तें हरिरूप ।**

सर्व साधारण असा नियम आहे कीं मनुष्याच्या चित्तांत पूर्णतया जे बिंबले असेल तेच त्याला सर्वत्र दिसत असते याविषयी भगवान श्रीकृष्ण उद्धवास सांगतात.

**एथ मुख्यत्वें भगवद्भक्ति । हा विश्वास धरितां चित्तीं ।**
**भगवत्पर झालिया वृत्ती । सर्वभूतीं मद्भाव ॥** ए. भा. २६-३८२

**अर्थ :-** ह्यात भगवद्भक्तीच मुख्य आहे, असा मनामध्ये विश्वास धरला असतां वृत्ती भगवत्परच होते आणि तेणेंकरून सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी मद्भाव उत्पन्न होतो.

**जें जें दृष्टीं देखे आपण । थोर अथवा सूक्ष्म सान ।**
**तें तें होय हरीचें निजदर्शन । सहजें भजन अहेतुक ॥** ए. भा. २६-३८६

**अर्थ :-** तो दृष्टीने जें जें 'दृष्य' पाहतो, तें मोठे असो कीं लहान असो, त्यांत हरीचेच दर्शन होते. हेच अहेतुक व सहज भजन होय.

**माझें निजभजनें तुटे भेद । स्वयेंचि प्रकटअभेद बोध ।**
**तेणें वोसंडे परमानंद । स्वानंदकंद स्वयंभ ॥** ए. भा. २६-४०५

**अर्थ :-** माझ्या भजनाने भेदभाव नाहींसा होतो, तेव्हां अभेदज्ञान तेथे आपोआपच प्रगट होते त्यामुळे परमानंद भरून जाऊन तो स्वतः सिद्ध स्वानंदाचा गड्डाच बनून राहतो.

या अवस्थेची ज्याला प्राप्ती झाली त्यालाच भगवत्तोत्तम भक्त असे म्हणतात.

**हरिरुवाच - सर्व भूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः ।**
**भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ॥** ए. भा. २-४५

**अर्थ :-** हरिमुनि म्हणाले, आपला आत्मा तोच परमात्मा असे



ईशस्वरूप प्राणिमात्रामध्ये जो पाहतो त्याचप्रमाणे सर्व भूतांचा समावेश अभेदरूपाने असणाऱ्या आपल्या भगवद्रूपामध्ये जो पाहतो तो उत्तम भागवत ( भगवद्भक्त होय ).

**सर्वांभूतीं भगवंत । भूतें भगवंतीं वर्तत । भूतीं भूतात्मा तोचि समस्त ।**
**मी म्हणणें तेथ मीपणा न ये ॥ ६४४ ॥ सर्व भूतीं भगवंत पाहीं ।**
**भूतें भगवंताचे ठायीं । हें अवघें देखे जो स्वदेहीं । स्वस्वरूप पाहीं स्वयें होय ॥** ए. भा. २-६४४,४५

**अर्थ :-** सर्व प्राणीमात्रांमध्ये भगवंत आहे आणि सर्व प्राणिमात्रा भगवंतामध्ये आहेत; प्राणिमात्रांमध्ये असणारा असा जो परमात्मा तो मी आहे, असे म्हटले म्हणून कांही मीपणाचा दोष येत नाहीं. ॥ ६४४ ॥ सर्व प्राणिमात्रांमध्ये भगवंत आहे आणि भगवंतामध्ये सर्व प्राणिमात्र आहेत, असे जो मानतो आणि हे सारे जो आपल्याच देहामध्ये पाहतो तो स्वस्वरूपच बनून राहतो. तो स्वतःच स्वस्वरूप आपले खरे मूळचे म्हणजे ब्रह्मस्वरूपच होतो. ॥ ६४५ ॥ तुकाराम महाराज देखिल आपला अनुभव सांगतात -

**जेथें देखें तेथें तुझीच पाऊलें । विश्व अवघें कोंदाटलें ।**
**रूपगुणनाम अवघा मेघश्याम । वेगळें तें काय उरलें ॥ १ ॥** तु.म.१८३६

**अर्थ :-** हे देवा, मी जिकडे पाहीन तिकडे तुझेच पाय माझ्या दृष्टीस पडतात; सर्व विश्व तुझ्या योगाने (रूपाने) भरले आहे. रूप, गुण, नाम हे सर्व तुझे मेघश्यामस्वरूप मला दिसत आहे, त्यावांचून दुसरे कांहीं उरले नाहीं.

ही अवस्था प्राप्त होणे ही भक्तिज्ञानाची पराकाष्ठा आहे असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**पै परमाणु भूतळीं । हिमकणु हिमाचळीं । मजमाजीं न्याहाळीं । अहं**

**तैसें ॥ ३८५ ॥ हो कां तरंगु लहानु । परि सिंधूसी नाहीं भिन्नु । तैसा ईश्वरीं मी आनु । नोहेचि गा ॥ ३८६ ॥ ऐसेनि या समरसें । दृष्टी जें उल्हासे । तें भक्ति पैं ऐसें । आम्ही म्हणों ॥ ३८७ ॥** ज्ञा.१४-३८५,८७.

**अर्थ :-** पृथ्वीवर असलेला अल्प परमाणु जसा पृथ्वीरूप आहे अथवा बर्फाच्या पर्वतावरील बर्फाचा कण जसा बर्फाच्या पर्वतरूपच आहे, त्याप्रमाणे (तूं आपला मीपणा माझ्या ठिकाणी) पाहा. ॥ ३८५ ॥ समुद्रावरची लाट जरी लहान असली, तरी ती समुद्राहून वेगळी नाही तसा मी ईश्वराचे ठिकाणी दुसरा (ईश्वराहून वेगळा) खरोखर नाहीं. ॥ ३८६ ॥ बा अर्जुना, अशा ऐक्याने जेव्हां दृष्टी विकसित होते त्याला आम्ही भक्ति असे म्हणतो. ॥ ३८७ ॥

नामदेव महाराजांनी आपला अनुभव व्यक्त केला आहे.

**करू हे कीर्तन राम नारायण । जनी जनार्दन हेंचि देखे ॥** ना. म.

जाता जाता याचा विचार करावयाचा तो असा पुरुषाच्या अंतःकरणावर अनेक विषयाचे ठसे उमटत असतात, पण ते तात्काळ पुसले जातात. परंतु रामकृष्ण नामाचा ठसा पुसला जात नाहीं; अशा पुरुषास सर्वत्र दशदिशांना आत्मारामच प्रतितीस येतो. ही पराभक्तीची परिसिमा आहे हे एकनाथ महाराज सांगतात.

**जे भक्तीमार्जी जाण । पूज्य पूजक होय श्रीकृष्ण ।**
**मग पूजाविधीविधान । देवोचि आपण स्वयें होये ॥** ए.भा. ३१-३६०

**अर्थ :-** त्या भक्तीमध्ये पूज्य व पूजक दोन्ही श्रीकृष्णच असतो, तेव्हां पूजा, अर्चा वगैरे सर्व उपचार देव आपण स्वतःच घेतो.

**ऐशी लाहोनि चौथी भक्ती । परमहंसाची श्रीकृष्णगती । ते कृष्णस्वरूप स्वयें होती । श्रीकृष्णकीर्ति वर्णितां ॥ जे स्वरूपीं नाहीं च्युती । तें**



**कृष्णस्वरूप निश्चिंती । भक्ति तद्रूप स्वयें होती । श्रीकृष्णकीर्ति वर्णिता ॥**

**अर्थ :-** श्रीकृष्णाची कीर्ति वर्णन केली असतां अशा प्रकारची पराभक्ती प्राप्त होऊन परमहंसाची गती जो श्रीकृष्ण, त्या कृष्णाचे स्वरूप तें म्हणजे कीर्ति वर्णन करणारे स्वतःच होतात. ॥ ३६४ ॥ ज्या स्वरूपांत कधी च्युति नाहीं तेच निश्चित कृष्णस्वरूप होय. कृष्णाची कीर्ति वर्णन केली म्हणजे भक्त स्वतः तद्रूप होऊन राहतात. ॥ ३६५ ॥

दशदिशा :- दिशा दहा आहेत पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, अग्नेय, नैऋत्य, वायव्य, ईशान्य, उर्ध्व (वरची) आणि अध (खालची). **'दिशा म्हणजे व्यापक'**

ज्या भक्ताचा व्यापक बोध झाला आहे त्याला जिकडे तिकडे परमात्मा दिसतो. या दृष्टीने ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

**ज्ञानदेवी नाम रामकृष्ण ठसा । येणे दशदिशा आत्माराम ॥ ४ ॥**

**- भावार्थ समाप्त -**

व्याख्यान :- भावार्थात सांगितल्याप्रमाणे विचार करावयाचा तो असा.

शंका - नाम सुलभ असतांना तें दुर्लभ कां झाले ?

उत्तर - वाचेने नाम घेणें सुलभ आहे तरीहि सर्वांची प्रवृत्ति तिकडे होत नाहीं हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी या प्रश्नांचे उत्तर समाधानकारक दिले आहे.

**जे प्राणियां कार्मी भरु । देहाचिवरी आदरु । म्हणोनि पडिला विसरु । आत्मबोधाचा ॥ २० ॥ अव्हांटलिया आस्थाबुद्धि ! विषयसुखचि परमावधि । जीवु तैसा उपाधि । आवडे लोकां ॥ २१ ॥ एऱ्हवीं तरी खवणेयांचा गांवीं । पाटाउवें काय करावीं । सांगें जात्यंधा रवी । काय आथी ॥ २२ ॥ कां बहिरयांचां आस्थानीं । कवण गीतातें मानी । कीं**

Scanned by CamScanner

कोल्हेया चांदणीं । आवडी उपजे ॥ २३ ॥ पैं चंद्रोदया आरौतें । जयांचे डोळे फुटती असते । ते काउळे केवीं चंद्रातें । वोळखती ॥ २४ ॥ तैसे वैराग्याची शिंव न देखती । जे विवेकाची भाषा नेणती । ते मूर्ख केंवीं पावती । मज ईश्वरातें ॥ २५ ॥ ज्ञा. ४

अर्थ :- प्राण्यांचा सगळा भर विषयवासनेवर (पडला) व त्यांचा सगळा जीव काय तो देहावर आहे; म्हणून त्यांना आत्मज्ञानाचा विसर पडला. ॥ २० ॥ आत्मबोधाची आस्था ज्या बुद्धीने कळगावयाची ती आडमार्गाला लागल्यामुळें (लोकांना) विषयसुख हेच आत्यंतिक सुख वाटू लागले व देहादिक प्रपंच हा प्राणाप्रमाणे प्रिय झाला. ॥ २१ ॥ नाहीं तर नग्न लोकांच्या गांवीं उंची वस्त्रें काय करायची ? जन्मांधाला सूर्य काय होय ? सांग बरे. ॥ २२ ॥ किंवा, बहिऱ्यांच्या सभेत गाण्याला कोण किंमत देणार ? किंवा कोल्ह्याच्या मनात चांदण्यांबद्दल प्रेम कधी उत्पन्न होईल काय ? ॥ २३ ॥ चंद्राचा उदय होण्याच्या अगोदरच ज्यांचे असलेले डोळे फुटतात (निरुपयोगी होतात) ते कावळे चंद्राला कसे बरे ओळखणार ? ॥ २४ ॥ त्याप्रमाणे वैराग्यरूपी नगराच्या शिवेचेहि ज्यांनी कधी दर्शन घेतले नाहीं, विवेक कशाला म्हणतात, हे ज्यांना माहित नाहीं त्या मूर्खांना माझी ईश्वराची कशी बरे प्राप्ति होणार ? ॥ २५ ॥

कारण सर्व जीवमात्रांची प्रवृत्ती विषयाकडे आहे त्याचा तसा स्वभाव आहे.

**या विषयांवांचूनि कांहीं । आणीक सर्वथा रम्य नाहीं । ऐसा स्वभावोचि पाहीं । इंद्रियांचा ॥ ज्ञा. २-१२०**

**अर्थ** :- या इंद्रियांचा हा स्वभावच असा आहे कीं, त्यांना या विषयांवांचून दुसरे कांहींच गोड वाटत नाहीं.



**मनाचा स्वभाव इंद्रियाची ओढी । पतनाचे जोडी वरी हांव ॥**

**अर्थ** :- (तु. म. १०९८) स्वभावतः इंद्रियांची धांव ही विषयाकडे आहे व तिकडेच धांवणे हा मनाचा स्वभाव आहे, तें नेहमी अधोगतीच्या लाभाची हांव करीत आहे.

मन बुद्धि इंद्रियादिक विषयांत रंगून गेले आहेत, असे एकनाथ महाराज सांगतात.

**अनादिसंसारमाळेच्या ठायीं । नित्य विषय भोगिले पाहीं । ते टसावले चित्ताच्या ठायीं । वारंवार देहीं सेवितां ॥ ३७८ ॥ चित्तासी विषयांची अतिप्रीति । तेणें वाढली विषयासक्ती । ते प्रवेशलें विषयांप्रती । न निघे मागुती सर्वथा ॥ ३७९ ॥ बुद्धीसी विषयांचें ध्यान । चित्तीं विषयांचें चिंतन । विषयांलागी तळमळी मन । विषयाभिमान तेणें झाला ॥ ३८० ॥ ए. भा. १३**

**अर्थ** :- अनादि अशा संसारमालिकेमध्ये विषयांचा उपभोग नेहमी घेतला आणि देहानें वारंवार त्या विषयांचे सेवन केले, म्हणजे तें चित्तामध्ये वतनदार होऊन बसतात. ॥ ३७८ ॥ चित्ताला विषयांची अत्यंत प्रीति असतेच; त्यामुळे विषयासक्ति वाढते आणि तें एकदा विषयांत घुसले म्हणजे मुळीच परत फिरत नाहीं. ॥ ३७९ ॥ बुद्धीला विषयांचे ध्यान लागले आणि चित्तांत विषयांचे चिंतन सुरु झाले म्हणजे त्या विषयांसाठीच मन तळमळू लागते. तेणेकरून विषयाभिमान उत्पन्न होतो. ॥ ३८० ॥

अशा रीतीने भगवान व तत्प्राप्तीची जी साधनें आहेत त्यांच्याकडे या बहिर्मुख लोकांची प्रवृत्ति होत नाहीं, त्यामुळे कितीहि दुःख भोगावे लागले तरी जीव हा विषयाकडे प्रवृत्त होत असतो. यासाठी संत हे मेघवाणीने उपदेश करतात तरीहि जीव ऐकत नाहीं त्यामुळे त्यांना खेद होतो.

**वाजतसे बोंब कोणी नायकती कार्नी ।**
**हरि हरि न म्हणती तया थोर जाली हानी ॥ १ ॥** ज्ञा. म. ४६२

**अर्थ :-** जीवाचे कल्याण व्हावे म्हणून वेद, शास्त्रें व पुराणें जीवाच्या ठिकाणीं भगवन्नाम उच्चार करण्याविषयी बोंबा ठोकताहेत, पण कोणीच कानांनी ऐकत नाहीं, म्हणजे वेदशास्त्राच्या म्हणण्याकडे लक्ष देत नाहींत पण त्यांच्या म्हणण्याप्रमाणे जे वाचेने हरिनामाचा उच्चार करीत नाहीं त्यांची अतिशय हानी झाली आहे. त्यामुळेच नाम सुलभ असतांना दुर्लभ आहे.

**ज्ञानदेव म्हणे नाम हें सुलभ । सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे ॥ ६ ॥**

**अर्थ :-** ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरीचे नाम सर्व पारमार्थिक साधनांत सोपे आहे, पण तें सर्व मनुष्यांना दुर्मिळ झाले आहे कारण हरीचे नाम कोणी घेत नाहीं. त्याची सुलभता व योग्यता जाणून तें नाम सदोदित घेणारा पुरुष क्वचितच् आढळून येतो. याचा अर्थ नाम घेणारा दुर्लभ आहे या विषयी गर्गसंहितेत म्हटले आहे.

**ब्रह्मत्वादपि देहत्वादिद्रंत्वा दमरादपि ।**
**अमृतासिद्धि लाभाच्च हरिभक्तिः सुदुर्लभा ॥** गर्गसंहिता

ब्रह्मत्व, देवत्व, इंद्रत्व, अमरत्व, अमृतप्राप्ती, सिद्धीचा लाभ इत्यादिकांपेक्षा हरिभक्ति ही अत्यंत दुर्लभ आहे, या दृष्टीने ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, **''हरि बुद्धी जपे तो नर दुर्लभ''** पण ज्याचे पूर्व सुकृत चांगले आहे व त्यामुळे त्याला संतसमागम घडत आहे असा एखादा मनुष्य नामसाधनाकडे वळतो व वाचेने सुलभ 'रामकृष्ण' नाम घेतो.

**वाचेसि सुलभ रामकृष्ण ।**

**- समाप्त -**

## * अभंग सतरावा *

**हरिपाठ कीर्ति मुखे जरी गाय ।**
**पवित्रची होय देह त्याचा ॥ १ ॥**
**तपाचे सामर्थ्ये तपन्निला अमूप ।**
**चिरंजीव कल्प वैकुंठी नांदे ॥ २ ॥**
**मातृ पितृ भ्राता सगोत्र अपार ।**
**चतुर्भुज नर होऊनि ठेले ॥ ३ ॥**
**ज्ञान गूढ गम्य ज्ञानदेवा लाधले ।**
**निवृत्तीने दिधले माझ्या हातीं ॥ ४ ॥**

**अर्थ :-** हरीचा जप करून वाणीने हरीची कीर्ति जो गाईल त्याचा देह पवित्र होईल. ॥ १ ॥ हरिनामसंकीर्तनरूपी तप, त्या सामर्थ्यानें ज्याने अगणित तपाचरण केले तो अनंत कल्पापर्यंत वैकुंठात वास्तव्य करतो. ॥ २ ॥ आई, बाप, भाऊबंद तसेच अनेक गोत्रज हे सर्व पुरुष चतुर्भुज होऊन वैकुंठी राहतात म्हणजे सरूपता मुक्तीचा लाभ होतो. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, भगवन्नामाचे गूढ रहस्य हे माझे गुरु निवृत्तिनाथ यांनी माझ्या हाती दिल्यामुळे तें मला प्राप्त झाले आहे. ॥ ४ ॥

**विवरण :-** ज्ञानेश्वर महाराजांनी आतापर्यंत हरीनामस्मरणाचे महत्त्व वेग वेगळ्या प्रकारांनी सांगितले आहे. या अभंगातून एका महत्त्वाच्या उपपत्तीद्वारा आपला विचार प्रगट करीत आहेत. हरीचे पठण तसेच भगवंताचे गुण, त्याच्या लिला त्याच्या ठिकाणी असणारी दया व उदारता इत्यादि प्रकारची कीर्ति जो मुखाने गातो त्याचा देह पवित्र होतो हेच अभंगाच्या प्रथम चरणांत सांगतात.

हरिपाठ कीर्ति मुखे जरी गाय । पवित्रची होय देह त्याचा ॥

हरिनाम - संत महात्मे स्वतः नाम घेतात व दुसऱ्यास घ्यावयास सांगतात. **सदानाम घोष करूं हरिकथा** तु. म. ४०२८

अर्थ :- आम्ही सर्वकाळ नामघोष करून हरीची कथा करतो.

**माझी मज झाली अनावर वाचा ।**
**छंद या नामाचा घेतलासे ॥ २ ॥** तु. म. ४००५

अर्थ :- ज्या माझ्या वाणीने हरिनामाचा एवढा छंद घेतला आहे, ती माझी वाणी मला पूर्वसंस्कारानुसार अनावर झाली आहे.

**कामामध्ये काम । कांहीं म्हणा रामराम ॥** तु. म. २४५९

अर्थ :- अहो जन हो, तुम्हाला संसारासंबंधी अनेक कामे आहेत; त्यांत काहीतरी वेळेची सवड काढून रामनाम घेण्याचे काम करा.

गुण :- **षड्गुण ऐश्वर्य संपन्न ।**
**एक भगवंतचि जाण ॥ ३ ॥** तु. म. ३२९६

अर्थ :- यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य ह्या सहा गुणांनी संपन्न असा एक भगवंतच आहे असे तुम्ही समजा.

लिला :- **कपट्या माभळभटा दिले पिर्ढे दान । शोषिली पूतना विषे पाजिताचि स्तन । उखळी बांधिता उपटिले विमलार्जुन । भक्षूनि मृत्तिका वदनी दाविली भुवनें ॥ ४ ॥** निळोबाराय

दया :- **देवा तूं कृपा करुणासिंधु ।** तु. म. ६९९

अर्थ :- हे देवा, तूं कृपेचा व करुणेचा समुद्र आहेस.

उदारता :- **उदार तूं हरि । ऐसी कीर्ति चराचरी ।**
**अनंत हे थोरी गर्जताती पवाडे ॥ १ ॥** तु. म. १५७२



अर्थ :- हे हरि, तूं मोठा उदार आहेस अशी तुझी सर्व जड व चेतन अशा जगतांत कीर्ति पसरलेली आहे व तुझ्या थोरवीचे असंख्य पवाडें वेद-शास्त्रें-पुराणें गर्जत आहेत.

**तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देतां न म्हणसी पात्रापात्र ।**
**मैं कैवल्या ऐसें पवित्र । कीं वैरियांही दिधलें ॥** ज्ञा. ११-९८

अर्थ :- तुझा उदारपणा स्वतंत्र आहे (याचकाच्या इच्छेवर अवलंबून नाहीं) द्यावयास लागला म्हणजे, हा योग्य आहे अथवा अयोग्य आहे, अशी निवड तूं करीत नाहीस. मोक्षासारखी पवित्र वस्तु ती पण तूं आपल्या शत्रूंना देखील दिलीस.

जो मुखाने हरिनाम गातो त्याचे शरीर पवित्र होते. **पवित्रची होय देह त्याचा ॥ १ ॥** या चरणाचा विचार भावार्थानंतर पाहूं.

नामचिंतनरूप तपाचे त्याने पुष्कळ आचरण केले. त्या सामर्थ्याने अनंत कल्पापर्यंत वैकुंठात वास्तव्य करतो. हेच ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या दुसऱ्या चरणांत सांगतात.

**तपाचे सामर्थ्ये तपन्निला अमूप । चिरंजीव कल्प वैकुंठी नांदे ॥**

या ठिकाणी तप म्हणजे काय याचा विचार थोडक्यात पाहूं. एकनाथ महाराज म्हणतात, शरीर शोषण होणे म्हणजे तप असे म्हणाल तर प्रारब्ध भोगाने कांही खावयास मिळाले नाहीं तर आपोआप शरीर शोषण होते. त्यामुळे दरिद्री मनुष्यहि तपी होईल. एवढ्याचसाठी (चैतन्यरूप हरीचे हृदयांत चिंतन करणे यालाच सत्यरूप तप म्हणतात.)

**शरीर शोषण नांव ते तप । ते प्रारब्ध भोगानुरूप ।**
**हृदयी हरि चिंतने चिद्रुप । तप सद्रुप त्या नांव ॥** चतुःश्लोकी भागवत १०८

**रामकृष्ण उच्चार अनंतराशी तप ॥ २ ॥**

अर्थ :- वाचेने निरंतर रामकृष्ण नामाचा जप करण्याने तपाच्या अनंत राशी घडतात.

एकनाथ महाराज भागवतात शुद्ध तपाचा विचार सांगतात.

**त्यागोनि कामाची कामस्थिती । तैं तपाची उत्तम गती । अखंड लागे माझी स्मृती । शुद्धतप प्राप्ती या नांव ॥ ४५३ ॥ माझ्या ठायीं अनुताप । त्या नांव गा शुद्ध तप । कां हृदयीं चिंतितां चित्स्वरूप । हें परमतप तपांमाजी ॥ ४५४ ॥** ए. भा. १९-४५३,५४

अर्थ :- कामाची वासना निखालस टाकून दिली, तरच उत्तम तप हातून घडते. अखंड माझेच स्मरण लागून राहते. ह्याचेच नांव शुद्ध तपःसिद्धी ॥ ४५३ ॥ अनुतापपूर्वक मत्स्वरूपी चित्त लागणे ह्याचेच नांव 'शुद्धतप' होय. किंवा माझे चित्स्वरूप हृदयामध्यें चिंतन करणे हेंच सर्व तपांमध्ये 'श्रेष्ठ तप' होय. ॥ ४५४ ॥

एकनाथ महाराजांनी भावार्थ रामायणांत भरताच्या मुखातून तपाचा विचार सांगितला आहे.

**विसरोनिया रघुराया । जे जे केली तपश्चर्या । साधनाभिमाने गिळीले माया । श्रमचि वाया वाढविला ॥ अनिमिषजे नामस्मरण । तें उग्र तप दारुण । स्मरणापरते निजसाधन । सर्वथा आन असेना ॥** भा. रा. ८१-१८-१९

**निवृत्ति म्हणे नाम हेचि सार तप । जप करा अमुप निरंतर ॥**

**सकळतपांचे ते तप । सोपा राममंत्र जप ॥** ए.म.

अशा नामचिंतनरूपी तपाचे सामर्थ्य ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

**चिरंजीव कल्प वैकुंठी नांदें ।**

या ठिकाणी 'चिरंजीव' म्हणजे चिरकाळ, अनंतकाळ नामस्मरण



करणारा अनेक कल्पापर्यंत वैकुंठात राहतो. ब्रह्मदेवाचा एक दिवस व एक रात्र यास कल्प म्हणतात. ज्या वैकुंठात राहतो त्याचे वर्णन भागवतात आलेले आहे ते एकनाथ महाराज सांगतात -

**सप्तावरणांबाहेरी । मायावरणाभीतरीं । वैकुंठ रचिलें श्रीहरी । हें बोलिजे निर्धारीं वेदान्तीं ॥ ४३३ ॥ तेथ आगमाचें मनोगत । माया ते भगवल्लीला म्हणत । स्वलीला वैकुंठ रची भगवंत । क्षयो तेथ असेना ॥ ४३४ ॥ जेथ लीलाविग्रही मेघश्याम । स्वये वसे पुरुषोत्तम । तेथ नाहीं गुण काळ कर्म । मायादि भ्रम रिघेना ॥ ४३५ ॥** ए.भा.२०-४३३,३५

अर्थ :- सात आवरणांच्या बाहेर (सप्त लोकांच्या पलीकडे) आणि मायावरणांच्या आंत श्रीहरीनें वैकुंठाची रचना केली आहे. असे वेदांतात म्हटले आहे. ॥ ४३३ ॥ त्यांत आगमशास्त्राच्या (वैष्णव तत्त्वज्ञान व शास्त्र) मताप्रमाणे माया ही भगवंताची 'लिला' असे म्हणणे आहे. भगवंताने आपल्या लीलेनें वैकुंठ रचले आहे. म्हणून त्याला नाश नाहीं. ॥ ४३४ ॥ जेथे लिला मात्रेंकरून इच्छित देह धारण करणारा मेघकांतियुक्त प्रत्यक्ष पुरुषोत्तमच रहात असतो, तेथें गुण, काळ, कर्म किंवा माया इत्यादि भ्रम राहात नाहीं. ॥ ४३५ ॥

**रामकृष्णस्मरण जप । तेंचि तयाचें अमूप तप ।**
**तो वास करील कोटी कल्प । वैकुंठपीठ नगरीशी ॥ ३ ॥** ज्ञा. म. ७०४

अर्थ :- रामकृष्ण नामाचा जप करणाराचे हेच मोठे तप होय. तो वैकुंठभुवनांत कोटिकल्प राहील.

असा जो भक्त आहे तो केवळ स्वतःच वैकुंठाला जातो असे नाहीं तर आईबाप, भाऊ तसेच त्याचे सर्व गोत्रज हे सर्व पुरुष चतुर्भुज होऊन वैकुंठात राहतात. म्हणजे त्यांना 'सरूपता' मुक्तीचा लाभ होतो.

हे ज्ञा. म. अभंगाच्या तिसऱ्या चरणांत सांगतात.

**मातृपितृ भ्राता सगोत्र अपार । चतुर्भुज नर होऊनि ठेले ।। ३ ।।**

त्यांचा सर्वांचा उद्धार होतो याविषयी एकनाथ महाराज सांगतात -

**भावे करितां भगवद्भक्ति । सकळ पितर उद्धरती । ऋषीश्वरां नित्य तृप्ती । भगवद्भक्ति स्वानंदे ।। ४६४ ।। स्वानंदे भगवद्भक्ति । तेणे सर्वभूतें सुखी होती । पुत्रें केल्या भगवद्भक्ति । आप्त उद्धरती मातापितरें ।। ४६५ ।।** ए. भा.५-४६४,६५

**अर्थ :-** भावपूर्वक भगवद्भक्ति केली असता साऱ्या 'पितरांचा' उद्धार होतो. भगवद्भक्ताच्या आनंदाने 'ऋषी' नित्य तृप्तच होतात. ।। ४६४ ।। भगवद्भक्तीच्या आनंदाने सर्व 'प्राणिमात्र' सुखी होतात. पुत्राने भगवद्भक्ती केल्यास त्याची मातापितरें आणि आप्त इष्ट सुद्धा उद्धरून जातात. ।। ४६५ ।।

**चतुराक्षरी मंत्र सरळ । जपतां नारायण श्री गोपाळ ।**
**चतुर्भुज होती सकळ । सरूपता पावती ।**

चतुःश्लोकी भागवतात वैकुंठात गेलेल्या भक्तांना चतुर्भुजता कशी प्राप्त होते याचे वर्णन आहे.

**हरिभक्त शोभायमान । हरिचरणी आवडी गहन । नित्य नवीन प्रेमे हरिदर्शन । तेणें हरिसमान स्वयें झाले ।। भजनें पावले हरिरूपासी । म्हणोनि झाले वैकुंठवासी । यालागी त्यांच्या स्वरूपासी । परिक्षितीपाशी शुक सांगे ।। वैकुंठवासी भक्तजन । घनश्याम राजीवलोचन । गंभीर गिरा प्रसन्न वदन । शोभायमान निजतेजें ।। मुकुट कुंडले मेखळा । गळा अपाद रूळे वनमाळा । कांसे कसिला सोनसळा । जेवी मेघमंडळामाजी बीज ।। अजानुबाहू भुजा चारी । बाहु अंगदें अति साजिरी । जडित मुद्रिका बाणल्या करी । वरी**



**कंकणावरी मणिमुद्रा ।। ज्यांची वदता सुंदरता । तंव ते पावले हरिस्वरूपता । त्याहूनिया सुंदरत्व आतां । बोले बोलतां सलज्ज ।।**
चतुःश्लोकी भागवत ओवी १७७ ते १८१, १८९

ज्ञानेश्वर महाराजहि हेच सांगतात.

**ज्ञानदेवा सांग झाला हरिपाठ । पूर्वजा वैकुंठ मार्ग सोपा ।।**

अर्थ :- ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मजकडून हरीचे चिंतन यथासांग झाले आता माझ्या पूर्वजांना वैकुंठास जाण्याचा मार्ग सोपा झाला आहे.

सर्व सामान्य मनुष्यास हरीचे चिंतनात एवढे सामर्थ्य आहे असे ज्ञान नसते म्हणून तें एवढ्या महत्त्वाच्या साधनास आंचवतात. त्यासाठी गुरुकृपाच पाहिजे. भगवन्नामाचे गूढ रहस्य निवृत्तिनाथांनी माझ्या हातांत दिल्यामुळे तें मला प्राप्त झाले आहे, हे ज्ञानेश्वर महाराज अभंगांच्या शेवटच्या चरणांत सांगतात.

**ज्ञान गूढ गम्य ज्ञानदेवा लाधले । निवृत्तीने दिधलें माझ्या हाती ।।**

भगवन्नाम, प्रेमभक्ति ही गूढ रहस्य आहेत त्याचे ज्ञान सर्वांस होणे शक्य नाही. त्याची दुर्गमता भगवान श्रीकृष्ण भागवतांतून सांगतात. त्याचे वर्णन एकनाथ महाराज करतात.

**तंव श्रीकृष्ण म्हणे उद्धवा । हा माझा निजगुह्य गोप्य ठेवा । तुज म्यां सांगितला कणवा । पुरुषार्थ पांचवा या नांव ।। ४०२ ।। हें वेदशास्त्रां अगम्य । सकळ देवांसी अतिदुर्गम । जेणें लुब्धें मी पुरुषोत्तम । तें हें भक्तप्रेमरहस्य ।। ४०३ ।।** ए. भा. २४-४०१,२

**अर्थ :-** तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, "उद्धवा ! हा माझा गुह्य ज्ञानाचा गुप्त ठेवा आहे. तो मी तुला प्रेमाने सांगितला. ह्यालाच 'पांचवा पुरुषार्थ' असे नांव आहे. ।। ४०१ ।। हे वेदशास्त्रांना अगम्य व सर्व देवांना अत्यंत दुर्गम आहे. ज्याच्या योगाने मी पुरुषोत्तम लुब्ध होऊन

जातो, तें हें भक्त प्रेमाचे रहस्य आहे. ॥ ४०२ ॥

गुरुकृपेशिवाय हे गूढ रहस्य कां व कसे कळत नाहीं याविषयी एकनाथ महाराज सांगतात -

**चैतन्य नित्य निराधार । निर्धर्मक निर्विकार । त्याचा केला जीर्णोद्धार । सत्य साचार जगद्गुरु ॥ ४४५ ॥ सद्गुरुकृपा नव्हतां । नव्हती देवाची कथावार्ता । देवासी देवपर्णी स्थापितां । सत्य सर्वथा सद्गुरु ॥ ४४६ ॥ सद्गुरु कृपेवीण पाहीं । देवो असतुचि झाला होता नाहीं । त्यासी देवपर्णी ठेऊनि ठायीं । भजविता पाहीं गुरुरावो ॥ ४४७ ॥ त्या सद्गुरूची कथा । चुकोनि झालों बोलता । थोर अपराधु हा माझे माथां । क्षमा श्रोतां करावी ॥ ४४८ ॥** ए. भा. ९

**अर्थ :-** नित्य, निराधार, निर्धर्म व निर्विकार अशा चैतन्याचा सद्गुरूंनीच खरोखर जीर्णोद्धार केला, म्हणून सद्गुरु हेच सत्स्वरूप होत. ॥ ४४५ ॥ सद्गुरूंची कृपा नसती तर देवाची कोणीहि विचारपूस केली नसती. देवाला देवपण देणारा खरोखर एक सद्गुरूच आहे. ॥ ४४६ ॥ खरोखरच सद्गुरूंच्या कृपेशिवाय, देव असूनहि नाहीं सारखा झाला होता. त्याला देवपणाने ठिकाणावर आणून त्याचे भजन करावयास लावणारा एक गुरुराजच होय. ॥ ४४७ ॥ त्या सद्गुरूंची कथा मी चुकून बोललो. हा फार मोठा अपराध झाला. श्रोत्यांनी त्याबद्दल क्षमा करावी. ॥ ४४८ ॥

श्री निवृत्तिनाथासारखे दयावंत महात्मे ज्याच्यावर कृपा करतात त्यांनाच हे गूढ रहस्य प्राप्त होते. इतरांना होत नाही. या दृष्टीने ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**ज्ञानगूढ गम्य ज्ञानदेवा लाधले । निवृत्तीने दिधले माझ्या हाती ॥**

**- भावार्थ समाप्त -**



**व्याख्यान :-** अभंगातील पहिल्या चरणाचा विचार सांगत असतांना **पवित्रचि होय देह त्याचा ॥** या चरणाचा भावार्थानंतर विचार करूं असे सांगितले होते तें असे वास्तविक शरीर हे अपवित्रच आहे.

**शरीर दुःखाचें कोठार । शरीर रोगाचें भांडार । शरीर दुर्गंधीची थार । नाहीं अपवित्र शरीरा ऐसे ॥ १ ॥** तु. म. ७३२

**अर्थ :-** हे शरीर दुःखाचे कोठार , रोगाचे भांडार आणि दुर्गंधीला आधारस्थानच आहे, या शरीराप्रमाणे या जगांत दुसरे अपवित्र कांहींहि नाहीं.

ज्ञानेश्वर महाराज मदालसेच्या अभंगातून सांगतात.

**हा देहो नाशिवंत मळमूत्राचा बांधा । वरी चर्म घातलें रे कूर्मकीटकांचा सांदा । रवरव दुर्गंधी रे अमंगळ तिचा बांधा । स्मरे त्या हरिहरा शरण जाईं गोविंदा ॥ ५ ॥** (मदालसा) ज्ञा.म. ८४५

**अर्थ :-** देहाची स्थिती पहा, नाशिवंत असून यांत दुर्गंधीयुक्त मलमूत्र असून वर चामडें घातलेला अपवित्र वस्तूंचा बनलेला आहे. अशा कुत्सित शरीरास पुन्हां यावयाचे नसेल तर हरिहराचें स्मरण करून परमात्मशरण हो.

स्थुल, सूक्ष्म व कारण असे शरीराचे तीन प्रकार आहेत. त्यात स्थूल शरीर हे मलमूत्रादिकांच्या द्वारे अपवित्र होते. सूक्ष्म शरीर म्हणजे मन हे कामक्रोधाच्या द्वारा अपवित्र होते. तसेच कारण शरीर हे अज्ञानामुळे अपवित्र होते.

यावर अशी शंका निर्माण होते कीं शरीर अपवित्र असणे हा ज्या वस्तुचा सहजस्वभाव आहे. ती वस्तु पवित्र कशी होऊ शकेल ? कारण सर्वांचे शरीर सारखेच असणार, तें नाम घेणाऱ्याचे असो किंवा नाम न घेणाऱ्याचे असो. ज्या ज्या अपवित्र वस्तुमुळे शरीरास

अपवित्रता आली आहे. त्या त्या वस्तु त्यातून गेल्याशिवाय तें पवित्र होऊ शकणार नाहीं. पण त्या वस्तु त्यातून गेल्या तर शरीरच नष्ट होईल.

या शंकेचे उत्तर असे आहे कीं, शरीरास जी अपवित्रता आली आहे ती त्यातील रक्त, रेत, अस्थि, मज्जा इत्यादिकामुळे आली नसून ती तत्त्वतः देहाहंकार व त्यातून निर्माण होणारे कामक्रोधादि विकारामुळे आली आहे. परमात्मा मांस, चर्म, हाडे यांना अपवित्र समजत नाहीं, असे तुकोबाराय सांगतात.

**मांस चर्म हाडें । देवा अवघीच गोडें ॥ तु. म.**

**अर्थ :-** चोखोबारायाच्या अस्थि देवाला प्रिय होत्या. यासाठी अहंकार, काम, क्रोध यामुळे शरीर अपवित्र आहे.

**अहंकार तो नासा भेद । जगीं निंद्य- ओवळा ॥ १ ॥ तु. म.३५७०**

**अर्थ :-** ह्या जगामध्ये मुख्य (ओवळा) अपवित्र अभिमान आहे. संतांनी त्याची निंदा केली आहे आणि त्याच्यायोगाने भेद वाढून एकंदरीत तो नाशाला कारण होतो.

तात्पर्य, ज्या अहंकारादि विकारामुळे शरीरांत अपवित्रता आली तें विकार गेल्याशिवाय शरीर पवित्र होणार नाहीं. त्यासाठी तीर्थयात्रा यज्ञ यागादि कितीहि साधनें केली तरी शरीर पवित्र होणार नाहीं. म्हणून जो अखंड हरीचे गुणानुवाद गातो त्याच्या अंतःकरणातून हे विकार नष्ट होतात असे एकनाथ महाराज सांगतात.

**एका जनार्दनी गाता हरीचे नाम ।**
**निमाली इंद्रियें विषय विसरली काम ॥ ए.म.**

तुकाराम महाराज देखील सांगतात -

**तुका म्हणे नाम । ज्याचे नाशी क्रोध काम ।**



**हरी भवश्रम । उच्चारितां वाचेसी ॥ ४ ॥ तु. म. १९७१**

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, ज्या श्रीहरीचे नाम काम - क्रोधादि विकार नाहीसे करते, तसेच वाचेने नामाचा उच्चार केला असतां संसार श्रमाचा परिहार होतो. (जन्ममरणाचा नाश होतो.)

अशा रितीने सूक्ष्म शरीराची पवित्रता भगवान नामस्मरणानेच होते. तसेच कारण देहाची पवित्रता म्हणजे अज्ञान निवृत्तीहि हरीच्या नामस्मरणानेच व त्याच्या कृपेने होते असे भगवान श्रीकृष्ण उद्धवास सांगतात.

**माझी कथा कां माझें नाम ; सकळ पातकां करी भस्म । हेंचि चित्तशुद्धीचें वर्म । अतिसुगम उद्धवा ॥ ३६४ ॥ नाना योग याग वेदाध्ययन । करितां पवित्र नव्हे मन । तें करितां हरिकथाश्रवण । होय अंतःकरण पुनीत ॥ ३६५ ॥ ए. भा. २६**

**अर्थ :-** माझी कथा किंवा माझे नाम हे साऱ्या पातकांचे भस्म करून टाकते. उद्धवा, चित्तशुद्धीचें अत्यंत सुगम वर्म तें हेंच आहे. ॥ ३६४ ॥ अनेक प्रकारचे योग वगैरे अनेक साधने, यज्ञ किंवा वेदाध्ययन केले तरी मन पवित्र होत नाहीं. तीच हरिकथा श्रवण केली असता अंतःकरण पवित्र होते. ॥ ३६५ ॥

इतर साधनांनी प्राप्त होणारी पवित्रता पुन्हा मलीन होते पण नामस्मरणाने प्राप्त होणारी पवित्रता कधीच मलीन होत नाहीं. असे एकनाथ महाराज सांगतात.

**आकाश पर्जन्यें नव्हे वोले । कां रविबिंब थिल्लरजळें । असोनियां तेणें मेळें । कदाकाळें तिंबेना ॥ ३२० ॥ तेवीं हरिकीर्ति कीर्तनकल्लोळें । जयाची निष्कामदशा उजळे । ते वर्ततां देहकर्ममेळें ।**

**देहविटाळें अलिप्त ।। ३२८ ।। निजभक्तांचें शरीरकर्म । स्वयें चालवी पुरुषोत्तम । यालागीं भक्तांसी कर्मभ्रम । अधमोत्तम बाधीना ।। ३२२ ।। ए. भा. ३१**

**अर्थ :-** आकाश पावसानें कांहीं भिजत नाहीं, किंवा सूर्याचे प्रतिबिंब डबक्याच्या पाण्यांत पडले तरी त्याच्या संगतीनें तें कधी ओले होत नाहीं. ।। ३२० ।। ज्याप्रमाणे हरिकीर्ति-कीर्तनाच्या गजराने ज्यांची निष्कामदशा उजळते, ते देहकर्मांत वागत असतांनाहि देहाच्या विटाळापासून अलिप्त असतात. ।। ३२१ ।। आपल्या भक्तांचे शरीरकर्म पुरुषोत्तम स्वतः चालवीत असतो. ह्याकरिता भक्तांना चांगल्या वाईट कर्माचा भ्रम बाधत नाहीं. ।। ३२२ ।।

नामाचे पावित्र्य तीर्थादिकांचे पेक्षाहि श्रेष्ठ आहे असे नामदेव महाराज सांगतात.

**तीर्थांचे पै तीर्थ नाम हे समर्थ ।**
**होईल कृतार्थ रामनामें ।। १ ।।**
**तपें दानें व्रतें यज्ञाचिया कोडी ।**
**तुकितां झाली थोकडी हरिनामें ।। २ ।।** ना.म.

नाम हे स्वतः पूर्ण पवित्र आहे म्हणूनच तें इतरांस पवित्र करू शकते असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**नाम पवित्र आणि परिकरु । कल्पतरुहुनि उदारु ।**
**तें तूं धरी कारे सधरु । तेणें तरसी भव दुस्तरु ।।** ज्ञा. म. १३६

**अर्थ :-** भगवंताचे नाम सुंदर व पवित्र असून कल्पतरूपेक्षांहि उदार आहे. तें तूं धैर्याने धारण कर, म्हणजे या दुस्तर भवसिंधूपासून मुक्त होशील.



पद्मपुराणांत महीधर नामक एका राजाची कथा आहे. तो राजा मोठा नामधारक होता. नामसंकीर्तनानें त्या राजास एवढी पवित्रता प्राप्त झाली होती कीं, त्यास जेव्हां विष्णुदूत यमलोकावरून वैकुंठास घेऊन जाऊ लागले तेव्हां त्याच्या शरीरावरून येणाऱ्या वायूने नरकांतील अनेक पापी जीवांचा उद्धार झाला. एवढी भक्तांच्या देहाची पवित्रता आहे.

तुकाराम महाराज सांगतात -

**पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्वकाळ ।। १ ।।**
**तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील राशी पातकांच्या ।। २ ।।**
तु. म. २२३३

**अर्थ :-** जो कोणी (अच्युत) = च्युत न होणारा असा अविनाशी विष्णु, त्याच्या नामाचा सर्वकाळ उच्चार करतो, त्याचा देह पवित्र आणि वाणी पुण्यवंत जाणावी. ।। १ ।। अशा वैष्णवांच्या चिंतनाने अनेक दोषी लोकांचा उद्धार होईल आणि त्यांच्या सर्व पातकांच्या राशी दहन होतील. ।। २ ।।

म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज सांगतात,

**पवित्र तो होय देह त्याचा ।। १ ।।**

**किंवा**

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ।।**

**- समाप्त -**

*** * ***

## * अभंग अठरावा *

हरिवंशपुराण हरिनामसंकीर्तन ।
हरिवीण सौजन्य नेणे कांहीं ॥ १ ॥
तया नरा लाधलें वैकुंठ जोडले ।
सकळही घडलें तीर्थाटन ॥ २ ॥
मनोमार्गे गेला तो येथें मुकला ।
हरिपाठीं स्थिरावला तोचि धन्य ॥ ३ ॥
ज्ञानदेवा गोडी हरिनामाची जोडी ।
रामकृष्णीं आवडी सर्वकाळ ॥ ४ ॥

**अर्थ :-** जो हरिवंशपुराण वाचतो, यथार्थ हरिनामाचे कीर्तन करतो व हरिवांचून दुसरें कोणीहि प्रिय जाणत नाही, त्या मनुष्याला वैकुंठाचा लाभ झाला आणि सर्व तीर्थयात्रा घडल्या असे समजावे. ॥ १-२ ॥ मनोवृत्तीप्रमाणें वागणारा असल्या लाभाला आंचवतो. हरिभजनामध्ये जो स्थिर झाला तोच धन्य होय. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मला हरिनामाच्या लाभाचीच गोडी असून रामकृष्णस्वरूपाचीच सर्वकाळ आवड आहे. ॥ ४ ॥

**हरिवंशपुराण हरिनामसंकीर्तन । हरिवीण सौजन्य नेणे कांहीं ॥**

**विवरण :-** या अभंगातून ज्ञानेश्वर महाराज हरिनामाची महती सांगतात. श्रुती, स्मृती आणि पुराणें असे शास्त्राचे तीन भाग केलेले आहेत. त्यातील पुराणें म्हणजे इतिहास होय आणि इतिहास म्हणजे जशी हकीकत घडली असेल तशी ती लिहिणे होय. पुराणांत कथाभाग जास्त आहेत. पुराणें मुख्यत्वेकरून अठरा आहेत. तुम्ही कोणतेहि पुराण पहा, त्यात तीनच गोष्टी मुख्य दिसतील. कोणीतरी



राक्षस तपश्चर्या करतो, मग ब्रह्मदेव प्रसन्न होऊन 'वरंब्रूहि' म्हणतात, मग तो इच्छित वर मागतो. पण जगाच्या कल्याणाचे कांहींच मागत नाही. जसे ज्ञानेश्वर महाराज आपल्या सद्गुरुजवळ मागतात,

> जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।
> भूतां परस्परे पडो । मैत्र जीवाचे ॥ ज्ञा. १८-१७९४

असे पसायदान मागतात. परंतु राक्षसांची तशी बुद्धी नसते. पुढे त्या वराने उन्मत होऊन तो बळावतो. मग देव अवतार घेऊन त्याला मारतो. बहुतेक पुराणांच्या कथेचा भाग याच सूत्राभोवती फिरतो.

**शंका :-** 'पुढच्यास ठेच मागचा शहाणा' या म्हणीप्रमाणे देवांनी नंतर शहाणे होऊं नये काय ? यातच तर श्रुतीचे सार आहे. श्रुतीचा सिद्धांत असा आहे की, 'यथा कर्म तथा श्रुतम्'. जो ज्याप्रमाणे कर्म करील, त्याला त्याप्रमाणे फल मिळालेच पाहिजे. चांगल्याचे फळ चांगले व वाईटाचे वाईट. तात्पर्य, ईश्वर संकल्पाप्रमाणे जो जसे कर्म करील त्याप्रमाणें त्याला फळ मिळेल असे पुराणांवरून दिसून येते. सामान्य लोकांना श्रुतीचे तत्त्व पटविण्यासाठी पुराणे आहेत त्यात कथाभागहि पुष्कळ आहेत. उदा. नळदमयंतीची कथा, श्रीयाळराजाची कथा वगैरे सांगिलेल्या आहेत. त्यापैकी भक्ताला कोणते आवडते व कोणते आवडत नाही. रामराज्य वियोग किंवा द्रोपदीस्वयंवर हे त्याला आवडत नाही; तर त्याला एकच आवडते तेच प्रथम चरणांत ज्ञा. म. सांगतात.

**हरिवंशपुराण हरिनामसंकीर्तन । हरीवीण सौजन्य नेणे कांहीं ॥**

येथे ज्ञानेश्वर महाराजांनी हरिवंशाला पुराण म्हटले आहे, पण हरिवंश हे स्वतंत्र पुराण नाही तर तो भारतअंतर्गत खिलपर्व आहे. त्याला हरिवंशपर्व असे म्हटले आहे. भारताचे तीन पर्व आहेत

**१) हरिवंशपर्व २) विष्णुपर्व ३) भविष्यपर्व.** अठरा पुराणांच्या मालिकेत हरिवंशाचे नांव नाहीं. हरिवंशपर्वांत कृष्णचरित्र आलेले आहे. पण महाराजांनी येथे 'पुराण' शब्द वापरला आहे म्हणून येथे लक्षणेने अर्थ केल्यास उपपत्ती नीट लागेल. हरिवंश आणि भगवत्‌गुण लिलांचा विचार करणारी अन्य पुराणें किंवा हरीच्याच गुणांचा ज्यांत साकल्येकरून विचार केला आहे असे भक्तीमार्गप्रवर्तक श्रीमत् भागवतमहापुराण आहे, असो. भक्ताला हरिवंशपुराण आवडते म्हणजे परमात्म्याच्या अवतारलिला आवडतात.

**मज्जन्मकर्मकथनं मम पर्वानुमोदनम् ।**
**गीतताण्डववादित्रगोष्ठीभिर्मद्गृहोत्सवः ।।** ए.भा.११-३६

**अर्थ :-** माझ्या जन्माच्या त्याचप्रमाणे माझ्या लीलांच्या गोष्टीं सांगणे, माझे जयंत्यादि उत्सव करणे, त्या कार्यक्रमात आनंदाने सामील होणे, गायन, नर्तन, वादन, कथा यांच्या सहाय्याने माझ्या मंदिरामध्ये उत्सव करणे, या गोष्टी भगवंताला आवडतात. भगवंतांनी अवतार कां व कसे घेतले आणि अवतार घेऊन काय काय केले इत्यादि गोष्टी भक्तांना आवडतात. थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे नामसंकीर्तन प्रेमाने ऐकावयाचे व गावयाचे हेच भक्ताला आवडते. ए. म. भागवतात सांगतात.

**ध्यानावस्थें करी ध्यान । नातरीकथानिरूपण । अनुसंधानीं सावधान । रितें मन राहूं नेदी ।। माझी जन्मकर्में निरूपितां । आवडी उल्हास थोर चित्ता । स्वेद रोमांच द्रवतां । सप्रेम कथा उल्हासे ।।** ए. भा. ११-१२५३,५४.

**अर्थ :-** तो भक्त ध्यानाच्या स्थितीत ध्यान करतो, नाहीतर कथा निरूपण करतो; निरंतर माझ्याकडेच लक्ष ठेवण्याविषयी तो दक्ष असतो. मनाला रिकामे असे कधी राहूच देत नाहीं. माझे जन्म व लिला यांचे वर्णन करतांना त्याच्या चित्ताला आवडीने परम आल्हाद वाटतो आणि



त्याच्या अंगाला घाम फुटून रोमांच उभे राहिले असता प्रेमभराने कथाहि उल्हासित होते.

**एक विषय तो सकळांचा हरि । त्याच्या आवडीनें आवडी इतरीं ।**
**अंध बहिर हे प्रेतलोकाचारी । त्यांची कीर्ति गाइली पुराणांतरी वो ।।**
तु. म. ११०

**अर्थ :-** सर्व गोपींचा विषय एक हरीच आहे. त्याच्या प्रीतीने त्या इतर वस्तुवर प्रीति करतात. लौकीकामध्ये त्या गोपी हरीवांचून कांहीं न पाहणाऱ्या अंध व कांहीं न ऐकणाऱ्या बधिर अशा प्रेतरूप झाल्या आहेत पण त्यांची कीर्ति पुराणांनी वर्णन केली आहे.

असे भक्त हे परमात्म्याच्या ठिकाणी अत्यंत अनन्य असतात. अनन्यतेची व्याख्या नारदभक्तीसूत्रांत केलेली आहे. **अन्याश्रयाणां त्यागो इति अनन्यता ।** म्हणजे ज्या वस्तूच्या ठिकाणी अनन्य असावयाचे आहे, तीवांचून अन्य आश्रयांचा पूर्णपणे त्याग करणे म्हणजेच अनन्यता होय.

हनुमंताच्या बाबतीत तर अनन्यतेची परिसीमाच झालेली आहे. ज्या वस्तुमध्ये 'राम' नाहीं तो जर रत्नहार असला तरी त्यांना तो तुच्छ वाटतो हा कथाभाग सर्वपरिचित आहे, म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, **हरिवीण सौजन्य नेणें कांहीं ।** हरिशिवाय प्रिय कोणी नाहीं. अशी एकरूपता ज्यांच्या ठिकाणी झाली त्यांना यापूर्वी सर्व कांहीं मिळालेले आहे. सर्व साधनें, सर्व व्रतें, तपें इत्यादींचे पुण्य त्यांना आपोआप प्राप्त झाले आहे, किंबहुना त्यांना वैकुंठच प्राप्त झाले आहे.

**तया नरा लाधले वैकुंठ जोडले । सकळही घडले तीर्थाटन ।।**

जे भक्त हरीवांचून दुसरे कोणी प्रिय जाणत नाहीत त्या भक्ताला वैकुंठाचा लाभ झाला आणि त्याच्या सर्व तीर्थयात्रा घडल्या असे

समजावे. कारण जर भक्ताला देवाचे वेड असते तर मग देवालाहि भक्तांचे वेड असणारच. तुकाराम महाराज म्हणतात -

**तुका म्हणे येथें पिसे । तेथें तैसें असेल ॥** तु. म. ६६१

तुकाराम महाराज या ठिकाणीं रूपकाने सांगतात कीं, ज्याप्रमाणे सासुरवासी कन्येला आईवडीलांचे वेड असते, तसे आईवडीलांनाहि तिचेच वेड असते. तद्वत् भगवंताच्या विषयी आम्हाला वेड आहे, म्हणून त्याच्या ठिकाणी आमच्याविषयी हा भाव असणारच.

**तो सकळही पढिन्नला । तपें तोचि तपिन्नला । अष्टांग अभ्यासिला । योगु तेणें ॥ हें असो बहुत पार्था । तो उतरला कर्मे सर्वथा । जयाची अखंड गा आस्था । मजचिलागीं ॥ अवधिया मनोबुद्धिचिया राहटी । भरोनि एकनिष्ठेचिया पेटी । जेणें मजमाजीं किरीटी । निक्षेपिर्ली ॥** ज्ञा. ९-४२२,२४

**अर्थ :-** अशा अनन्य झालेल्या भक्ताचे वर्णन भगवंत करतात - त्याने (भक्ताने) सर्व अध्ययन केले, तपाची आचरणें केली किंवा अष्टांग योगाचा अभ्यास केला. अर्जुना, हे फार वर्णन पुरे. ज्याची आवड अखंड माझ्या ठिकाणी आहे, तो पूर्णपणे कर्मरूपी बंधनातून पार पडला, ज्याने आपल्या मनबुद्धीचे सर्व व्यवहार माझ्याविषयीच्या एकनिष्ठेच्या पेटीत घालून ती पेटी माझ्या स्वरूपामध्ये ठेवली.

मग अशा भक्ताचे पावित्र्य काय वर्णन करावे. तुकाराम महाराज सांगतात

**तीर्थें तया ठायां । येती पुनीत व्हावया ।**
**पर्वकाळ पायां । तळीं वसे वैष्णवां ॥** तु. म.२४१४

**अर्थ :-** त्या वैष्णवाच्या ठिकाणीं सर्व तीर्थे पुनीत होण्यासाठी येतात. सर्व पर्वकाळ त्याच्या पायांच्या ठिकाणीं वास्तव्य करतात.



**जयाचें नांव तीर्थरावो । दर्शनें प्रशस्तीसि ठावो ।**
**जयाचेनि संगें ब्रह्मभावो । भ्रांतासी ॥** ज्ञा. ६-१०२

**अर्थ :-** ज्याचे नांव तीर्थराज आहे व ज्याचे दर्शन झाले असता समाधान होते व ज्याच्या संगतीने भ्रमिष्ट जीवांना ब्रह्मता प्राप्त होते.

आतां वर सांगितल्याप्रमाणे जर भक्ति केली नाहीं व आपल्या मनाप्रमाणे वागले तर काय होते हे तृतीय चरणांत सांगतात -

**मनोमार्गें गेला तो तेथें मुकला । हरिपाठी स्थिरावला तोचि धन्य ॥ ३ ॥**

जो केवळ आपल्या मनाप्रमाणे वागतो, संतसंगतीचा आश्रय सोडून देतो तो परमात्म्याच्या अनुभवाला मुकतो.

**एकीं वयसेचें जाड बांधलें । मग मन्मथाचिये कासें लागलें ।**
**तें विषयमगरीं सांडिलें । चघळुनियां ॥** ज्ञा. ७-८५

**अर्थ :-** ज्ञानेश्वर महाराज सांगतात, कित्येकांनी तारुण्यरूपी कासपेटा कमरेला बांधला व मग मदनाच्या कासेला लागले तें विषयरूपी मगरींनी चघळून टाकले.

मनाला आले तसे वागणे म्हणजे काय तर त्या मनाला कोणाचा धाकच न राहणे. हत्तीला ज्याप्रमाणे अंकुशाची गरज असते त्याप्रमाणें मनालाहि अंकुश असावा लागतो आणि हा अंकुश म्हणजेच हरिपाठ, हरिनामाचा नित्य छंद त्या मनाला लावणे. मग असा छंद लागला कीं तो भक्त धन्य होतो, परमपद पावतो, श्रीहरीच्या स्वरूपी एकरूप होतो. ज्ञानेश्वर महाराज हे सर्व सांगतात तें कांहीं इतर अनुमानादि प्रमाणांच्या आधाराने सांगत नाहींत तर त्यांचा प्रत्यक्ष अनुभव तसा आहे आणि प्रत्येक अभंगाच्या शेवटी त्यांनी हा आत्मानुभव सांगितला आहे. याहि अभंगाच्या शेवटच्या चरणांत असाच अनुभव सांगतात-

**ज्ञानदेवा गोडी हरिनामाची जोडी । रामकृष्णीं आवडी सर्वकाळ ॥**

महाराज सांगतात, मला संतसंगतीशिवाय व भगवन्नामाशिवाय कांहीं आवडत नाहीं. हेच नाम संतांनाहि आवडते व देवालाहि आवडते म्हणून देवाकडे मागणी करतात.

**संतसंगतीं देईं चरणसेवा । जेणें तुझा विसर न पडावा ।**
**हाचि भाव माझिया जीवा । पुरवीं देवा मनोरथ ।** तु. म. ६९२

**अर्थ :-** हे देवा, ज्यायोगाने तुझा विसर पडणार नाहीं, अशा संतांची संगती व तुझी चरणसेवा मला द्यावी हाच भाव माझ्या जीवाच्या ठिकाणी आहे. तें माझे मनोरथ तुम्ही पूर्ण करा.

अशाप्रकारे संत देवाकडे नेहमी अशीच मागणी करतात. संतांची संगती कां मागतात तर -

**तेथें रामनाम होईल श्रवण । घडेल भोजन उच्छिष्टाचे ।।** २३३७

**अर्थ :-** त्या संतांच्या संगतीमध्ये रामनामाचे निरंतर श्रवण होईल आणि संत जे भोजन करतील त्यांच्या उच्छिष्टाचे सेवन घडेल.

नामस्मरणाविषयीं एवढी आर्तता संतांच्या ठिकाणी असते व म्हणून तें परमात्म्याला प्रिय होतात तसे सर्व जीवांनी व्हावे हे ज्ञानेश्वर महाराजांच्या उपदेशाचे प्रयोजन आहे, म्हणून तें सर्वांना वारंवार आपल्या हिताचा राजमार्ग दाखवितात. तो मार्ग म्हणजेच -

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥**

**विठोबा रखुमाई जयजय विठोबा रखुमाई ।**

## ❋ अभंग एकोणिसावा ❋

**नामसंकीर्तन वैष्णवांची जोडी ।**
**पापें अनंत कोडी गेलीं त्यांची ॥ १ ॥**
**अनंत जन्मांचे तप एक नाम ।**
**सर्व मार्ग सुगम हरिपाठ ॥ २ ॥**
**योगयागक्रिया धर्माधर्म माया ।**
**गेले तें विलया हरिपाठें ॥ ३ ॥**
**ज्ञानदेवी यज्ञ याग क्रिया धर्म ।**
**हरिवीण नेम नाहीं दुजा ॥ ४ ॥**

**अर्थ :-** हरिनामसंकीर्तनाची वैष्णव जनांनी जोड केलेली असते. त्यायोगाने त्यांची अनंतकोटी पातकें नाहीशी होतात. ॥ १ ॥ अनंतजन्मी केलेल्या तपांचे फळ एक हरीचें नामस्मरण आहे. सर्व साधनांमध्ये हरीचे चिंतन हे सुलभ साधन होय. ॥ २ ॥ अष्टांगयोग, यज्ञक्रिया, धर्म व अधर्मरूपी माया ही सर्व हरीच्या चिंतनाने लयाला जातात. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, आमच्या ठिकाणी यज्ञ, याग, क्रिया, धर्म सर्व कांहीं हरि आहे, त्यावांचून दुसरा कांहीं नेमधर्म नाहीं. ॥ ४ ॥

**नामसंकीर्तन वैष्णवांची जोडी । पापें अनंत कोडी गेलीं त्यांची ॥**

**विवरण :-** वेगवेगळ्या भक्तांची भजनें वेगवेगळी आहेत. मिमांसकाचे यजन, याजन (यज्ञयाग) हेच भजन आहे; योग्याचे भजन म्हणजे कुंडली जागृत करणे; ज्ञान्याचे भजन म्हणजे आत्मजागृती करणे आणि संतांचे भजन नामसंकीर्तन हेच आहे आणि हेच भजन अभंगाच्या प्रथम चरणांत सांगितले आहे.

वैष्णवांची संगती आणि नामसंकीर्तन ही एक जोड आहे आणि वैष्णव त्याला म्हणावे कीं ज्याचे देवावर नितांत प्रेम आहे.

**वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥ १ ॥**
**नाही आणीक प्रमाण । तन धन तृण जन ॥ धृ ॥** तु. म.२२६६

**अर्थ :-** ज्याची प्रिती ( प्रेम ) इतर कोणावरहि नसून फक्त देवावरच आहे, तो वैष्णव जाणावा. त्याला मग स्वतःचे शरीर, द्रव्य व इतर समाज हा तृणासमान ( गवताप्रमाणे ) वाटतो.

निष्ठावंत वारकरी (वैष्णव) हा रस्त्यावर मरेल पण आजाराचा बहाना करून वारी चुकू देणार नाही. तुकाराम महाराज खऱ्या वैष्णवांचे लक्षण सांगतात -

**निष्ठावंत भाव भक्ताचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुकों नये ।**
**निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास । पाहो नये वास आणिकांची ॥**
तु. म. ३५९७

**अर्थ :-** हरीच्या ठिकाणी दृढ भाव ठेवणे हाच भक्तांचा स्वधर्म आहे. अशा प्रकारच्या निश्चयाचे वर्म भक्तजनांनी नेहमी हृदयांत बाळगावे त्यात विसर पडू देऊ नये. भक्ताने सर्व कामना टाकून विठोबाच्या ठिकाणी निष्काम अढळ विश्वास ठेवावा. कोणत्याहि संकट प्रसंगी दुसऱ्या कोणाचीहि वाट पाहू नये.

मनांत भाव नाहीं आणि वरवर नामस्मरण करत आहे तसेच निष्ठा नाहीं आणि वारी करत आहे असे भक्त देवाला कदापिहि आवडत नाहींत, त्यापेक्षा भगवंतासाठी प्राणत्याग करणारे भक्त देवाला अत्यंत आवडतात. या भक्तावांचून देवाला आवडणारे असे त्रैलोक्यांत दुसरे कांहींच नाहीं.

**भक्ताहूनि देवा आवडते कांही । त्रिभुवनीं नाहीं आन दुजें ॥ २३४१**



ज्ञानेश्वर महाराज सांगतात, अशा भक्तांनी नामचिंतनाची जोड केलेली असल्यामुळे त्यांची अनंत कोटी पातकें नाश पावतात- **पापें अनंत कोडी गेलीं त्यांचीं ॥ १ ॥ भगवन्नाम हे साधारण प्रायश्चित्त** असल्यामुळे त्या योगाने ज्ञात-अज्ञात अशा सर्व पातकांचा नाश होतो. तपापेक्षा नामाचे श्रेष्ठत्व सिद्ध करतांना ज्ञानेश्वर महाराज सांगतात कीं, अनंत जन्मामध्ये केलेले तप जरी असेल तरी त्याची बरोबरी दृढतेने घेतलेल्या एका नामाइतकीच असते. म्हणजे याचा दुसरा अर्थ असा कीं एकवेळ नाम मुखाला येण्यासाठी अनंत जन्माच्या तपाची आवश्यकता आहे.

**जन्मजन्मांतरी असेल पुण्यसामुग्री ।**
**तरीच नाम जिव्हाग्री येईल श्रीरामाचे ॥** ज्ञा. म.

आणि हाच भाव अभंगाच्या द्वितीय चरणांत सांगतात -

**अनंत जन्माचे तप एक नाम । सर्वमार्ग सुगम हरिपाठ ॥ २ ॥**

भगवंत ज्ञानेश्वरीमध्ये सुद्धां सांगतात -

**जयांचे वाचेपुढां भोजें । नाम नाचत असे माझें ।**
**जे जन्मसहस्री वोळगिजे । एकवेळ मुखाशीं यावया ॥** ज्ञा.९-२०६

**अर्थ :-** जे माझे नाम एकवेळ मुखासी यावयास हजारो जन्मसेवा करावी लागते, तें माझे नाम त्या भक्ताच्या वाचेपुढें मोठ्या प्रेमाने नाचत असते.

असा हा हरिनाम मार्ग सर्व साधनमार्गांतील सुलभ मार्ग आहे. **'सर्वमार्ग सुगम हरिपाठ ॥'** भगवंताच्या प्राप्तीसाठी युगपरत्वे निरनिराळीं साधनें सांगितली आहेत.

**कृतयुगीं शमदमादिसाधन । त्रेतायुगीं वेदोक्त यज्ञ । द्वापारीं**

**आगमोक्त पूजन । तंत्रविधान विधियुक्त ।। यापरीं त्रियुगी जनां । परम संकट साधना । करितांही परी मना । अनुमात्र जाणा उपरमु नव्हे ।। ती अवघींच साधनें । कलीनें लाजविली कीर्तनें । जेथ गातां नाचतां आपणे । वश्य करणें परमात्मा ।।** ए.भा.५-४०८,१०

**अर्थ :-** कृतयुगांत शमदमादिसाधन, त्रेतायुगांत वेदोक्त यज्ञविधी आणि द्वापारयुगांत आगमोक्त तंत्रविधीयुक्त पूजन हे साधन आहे. याप्रमाणे तिन्ही युगातील लोकांना, ही परमसंकटयुक्त साधनें केली तरी मनाला अनुमात्र शांति लाभत नाहीं. पण कलीनें कीर्तनाच्या योगानें त्या सर्व साधनांना लाजविले आहे. कीर्तनाने परमात्म्याला गात, नाचत वश करून घेता येत.

परमात्म्याच्या नामस्मरणांत बाकी सर्व साधनांचा समावेश होतो. त्याच्याकडून धर्माधर्म विधिनिषेध वगैरे प्रकार घडतच नाहीत. परंतु आपल्याकडून योग्य विधियुक्त आचरण घडत आहे याची त्याला जाणीवहि नसते. तात्पर्य, अशा हरिनामाच्या पठणाने योगयागादि क्रियांची आवश्यकता राहत नाहीं. वृत्ती ही धर्माधर्मातीत, विधिनिषेधातीत होते व मायेचा लोप होतो हेच प्रस्तुत अभंगाच्या तृतीय चरणांत सांगितले आहे.

**योगयागक्रिया धर्माधर्म माया । गेले तें विलया हरिपाठीं ।। ३ ।।**

यज्ञयाग वगैरे क्रिया भगवन्नाम घेतल्याने आपोआप घडतात. गीतेमध्ये तर साक्षात् भगवंतानेच आपल्या विभूति सांगतांना सर्व यज्ञामध्ये नामजपयज्ञ ही माझी श्रेष्ठ विभूति आहे, असे सांगितले आहे. **'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि ।'**

**समस्तांही यज्ञांचा पैकीं । जपयज्ञु तो मी ये लोकीं । जो कर्मत्यागें प्रणवादिकीं । निफजविजे ।। नामजपयज्ञु तो परम । बाधूं न शके स्नानादि**



**कर्म । नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थे ।।** ज्ञा.१०-२३३

**अर्थ :-** या मृत्युलोकांमध्ये कर्माच्या त्यागात ॐकारादिकांच्या योगानें ज्यास उत्पन्न करतात, तो जपयज्ञ सर्व यज्ञांमध्ये माझी विभूति आहे. नामजपयज्ञ हा श्रेष्ठ आहे. यास स्नानादि कर्मे अडकवू शकत नाहीत. (म्हणजे स्नानादि कर्मावांचून नाम घेतले तरी चालते.) नामाने धर्म व अधर्म पवित्र होतात आणि वेदांच्या अर्थाने नाम हे परब्रह्म आहे.

म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझे यज्ञयागादिक कर्मे, धर्मकर्मे सर्व कांहीं नामच आहे, त्यावांचून माझा दुसरा कोणता नियम नाहींच.

**ज्ञानदेवी यज्ञ याग क्रिया धर्म । हरिवीण नेम नाहीं दुजा ।। ४ ।।**

ज्ञानेश्वर महाराजांप्रमाणेच तुकाराम महाराजहि नामयज्ञ श्रेष्ठ जाणणारे होते.

**हेचि माझें कर्म हाचि माझा धर्म । हाचि नित्यनेम नाम तुझे ।।**
**हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ । हेचि तपध्यान नाम तुझे ।।**

**अर्थ :-** (तु. म. २५५२)तुझ्या नामाचा उच्चार करणे हाच माझा नित्यनेम आहे व नाम हेच माझे कर्म असून धर्महि तेच आहे. तुझे नामचिंतन हाच माझा योग व यज्ञ असून तप व ध्यानहि हेच आहे.

ज्ञानेश्वर महाराज नामाविषयींची आपली उत्कट निष्ठा प्रगट करतात व त्या नामावांचून दुसरी अन्य साधनें कशी क्षीण आहेत, तें दाखवितात. मग एवढे श्रेष्ठ नाम आहे. सकलसाधनश्रेष्ठ, सुलभ आहे म्हणून सर्वांना नामचिंतनाचा आग्रह करतात.

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ।।**

**- समाप्त -**

## ❋ अभंग विसावा ❋

**वेदशास्त्रप्रमाण श्रुतींचे वचन ।**
**एक नारायण सार जपा ॥ १ ॥**
**जपतप कर्म हरिवीण धर्म ।**
**वाउगाचि श्रम व्यर्थ जाय ॥ २ ॥**
**हरिपाठी गेले तें निवांतचि ठेले ।**
**भ्रमर गुंतले सुमन कळिके ॥ ३ ॥**
**ज्ञानदेवी मंत्र हरिनामाचे शस्त्र ।**
**यमें कुळगोत्र वर्जियेलें ॥ ४ ॥**

अर्थ :- सर्वांचे सार एक नारायण आहे. त्याचा तूं जप कर. याविषयी श्रुतिशास्त्र यांचे वचन प्रमाण आहे. ॥ १ ॥ इतर जपतपादि कर्मे करण्याचे श्रम हरिभजनावांचून व्यर्थ जाणारे आहेत. ॥ २ ॥ ज्याप्रमाणे भ्रमर मकरंद सेवन करण्याच्या भरात त्या कमलकलिकेत सांपडला जातो, म्हणजे त्याला बाहेर निघून येण्याची शुद्धी रहात नाहीं, त्याप्रमाणे हरीच्या नामस्मरणांत रत झालेला साधक हरिस्वरूपीं एकमय होतो व तो फिरून प्रपंचाकडे वळत नाहीं. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरिनाम हाच माझा मंत्र आणि हेच माझे शस्त्र आहे. त्याच्या दराऱ्याने यमाने आमच्या कुळगोत्राचा त्याग केला आहे. ॥ ४ ॥

**वेदशास्त्रप्रमाण श्रुतींचे वचन । एक नारायण सार जपा ॥ १ ॥**

**विवरण :** प्रस्तुत अभंगाच्या प्रथम चरणातच ज्ञानेश्वर महाराज सांगतात वेदशास्त्रांचे प्रमाण म्हणजे मोक्षाचे साधन एक नामच आहे. मग याठिकाणी अशी शंका येते कीं, वेदशास्त्रें तर सांगतात ज्ञानाने मोक्ष



मिळतो. ज्ञानेश्वर महाराजांना नाम आवडते म्हणून तें नामाची विपर्यस्त स्तुति अथवा प्रशंसा तर करीत नाहींत ? तर याचे उत्तर असे आहे कीं श्रुति, वेद अथवा शास्त्रें या सर्वांचे सार नामच आहे.

**सार सार सार विठोबा नाम तुझे सार ।**
**म्हणोनि शूळपाणी जपताहे वारंवार ॥** ज्ञा.म.

जर नाम हे सर्वांचे सार नसते तर साक्षात् शंकरांनी नामजपाचा अंगीकार केलाच नसता, म्हणून येथे शंकेला जागा नाहीं. तुकाराम महाराज सुद्धा हीच ग्वाही देतात.

**वेद अनंत बोलिला । अर्थ इतुलाचि शोधिला ॥**
**विठोबासी शरण जावें । निजनिष्ठा नाम गावें ॥** तु. म.२१३०

अर्थ :- वेदांनी अगणित वर्णन केले आहे. (अनेक विषय सांगितले आहेत) त्यामध्ये शोध करून पाहिले असता हाच मुख्य अर्थ निघाला आहे कीं, विठोबारायाला सर्वभावानें शरण जाऊन त्याचे नाम निजनिष्ठेने (आत्मनिश्चयाने) घ्यावे.

ज्ञानेश्वर महाराजहि तेच सांगतात कीं, वेद, शास्त्र अथवा श्रुति यांचे प्रमाणभूत वचन असे आहे कीं, तुम्ही सर्व जीवनाचे सार असलेल्या नारायण नामाचा जप करा. जपतपादि कर्मे आणि धर्म सर्व एका हरिवांचून व्यर्थ जातात. म्हणजेच निष्फळ होतात. हेच दुसऱ्या चरणांत सांगतात -

**जप तप कर्म हरिवीण धर्म । वाउगाचि श्रम व्यर्थ जाय ॥ २ ॥**

परमात्म्यावांचून जपतपादि सर्व साधनें व्यर्थ ( फुकट ) आहेत. म्हणजे श्रवणवेदांताचे, मनन प्रपंचाचें आणि साक्षात्कार दुःखाचा अशी गत होते. त्याचा परिणाम गीतेमध्ये सांगतात - (गीता २-६२,६३)

**ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते । सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते । क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृति**

**विभ्रमः । स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ।।**

**अर्थ :-** विषयांचे चिंतन करणाऱ्या पुरुषाला त्याच्याविषयी आसक्ती निर्माण होते. आसक्तीमुळे काम उत्पन्न होतो. कामापासून क्रोध उत्पन्न होतो. क्रोधापासून सम्मोह. सम्मोहापासून स्मृतिभ्रंश, स्मृतिभ्रंशापासून बुद्धिनाश होतो आणि बुद्धिनाशामुळे तो पुरुष नाश पावतो.

**जें जें केले पुराणश्रवण । तें तें व्यर्थ होय मननेंविण ।**
**यालागीं श्रवण मनन । सावधान करावे ।।** ए. भा. २-५३०

**अर्थ :-** जे जे पुराण श्रवण केले त्याचे मनन केल्याशिवाय तें व्यर्थ होते. ह्याकरिता श्रवण केलेल्याचे मनन करीत असावे. म्हणजे श्रवण व मनन ही दोन्ही अर्थाकडे नीट लक्ष देऊन करावीत.

ज्ञानेश्वर महाराज सांगतात, हरिनामाच्या मार्गाने जे गेले, त्यांना संपूर्ण शांतीचा लाभ झाला. ज्याप्रमाणे कमलकलिकेतील मकरंदाचा आस्वाद घेतांना भ्रमर रंगून जातात, त्याप्रमाणे हरिनामरूपी मकरंदाचा आस्वाद घेण्यात भक्त रंगून जातात. हाच विचार तृतीय चरणांत सांगितला आहे.

**हरिपाठीं गेले ते निवांतचि ठेले । भ्रमर गुंतले सुमन कळिकें ।। ३ ।।**

भ्रमराची तीव्र गुणगुण जोपर्यंत चालू असते तोपर्यंत त्याला मकरंद मिळाला नाहीं असे समजावे. कारण आवाजात भोग नसतो व भोगांत आवाज नसतो. त्याप्रमाणे जीव अनेक खटाटोप जोपर्यंत करीत असतो, तोपर्यंत त्याला परमात्मसुख मिळालेले नाहीं असे समजावे आणि ज्याला भगवंताचा आनंद मिळाला तो शांत, स्थिर होऊन निवांत राहतो. त्याच्या मनाची धांव स्थिरावते. तुकाराम महाराज सांगतात -

**न करवे हाली चालीं । निवारली चिंता हे ।। ३ ।।** तु. म.२२९४

जे मन भगवत्सुखामध्ये रमले, त्याची हालचाल, धावपळ बंद पडते. कारण हालचाल हे बहिर्मुख मनाचे लक्षण आहे आणि परमात्मस्वरूप झालेले मन हे अंतर्मुख होते.



**मन हे राम झाले मन हे राम झाले ।**
**प्रवृत्ती ग्रासूनि कैसे निवृत्तीसी आले ।। ज्ञा. म.**

याशिवाय भक्तीचे दुसरे फल नाहीं. **ही प्रेमाची उत्कट** अवस्था आहे. प्रेमयुक्त चिंतनानेच हे सर्व शक्य होते. योगाने प्राप्त होणाऱ्या गोष्टी नामाने प्राप्त होतात. ज्ञानेश्वर महाराज शेवटच्या चरणांत सांगतात कीं, हे हरिनामरूपी **शस्त्र आमच्या** हातांत असल्यामुळे यमाने आमच्याकडे पाहणे **तर सोडलेच पण** आमचे कुळगोत्रहि त्याने वर्ज्य केले आहे.

**ज्ञानदेवी मंत्र हरिनामाचे शस्त्र । यमें कुळगोत्र वर्जियेले ।। ४ ।।**

नामाच्या या दराऱ्यापुढे साक्षात् यमसुद्धा चळाचळा कांपतो. हाच ज्ञानेश्वर महाराजांचा प्रिय मंत्र आहे.

**यमधर्म सांगे दूतां । परिसावी निजकथा ।**
**जेथे रामनामवार्ता । तयां देशा न जावे ।। ज्ञा. म.**

यमधर्म तर त्याच्या सेवकांना येथपर्यंत ताकीद देतो ज्या देशामध्ये रामनाम घेतले जाते. त्या देशांत तुम्ही जाता कामा नये. नामदेव महाराजहि सांगतात -

**यम सांगे दूता कानी । तुम्ही जाता मेदिनी ।**
**विष्णुभक्त चुकवूनि । येर बांधोनि आणा ।। ना. म.**

**यमधर्म सांगे दूतां । तुम्हा नाही तेथें सत्ता । जेथे होय हरिकथा । सदा घोष नामाचा ।। तु. म.**

अशी यमाची नागवण करण्याचे सामर्थ्य ज्या नामात आहे ते तुम्ही निरंतर घ्यावे. ते कोणते तर- **हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।**

**-समाप्त-**

## * अभंग एकविसावा *

काळ वेळ नाम उच्चारिता नाहीं ।
दोन्ही पक्ष पाहीं उद्धरती ॥ १ ॥
रामकृष्णनाम सर्व दोषां हरण ।
जडजीवा तारण हरि एक ॥ २ ॥
हरिनाम सार जिव्हा या नामाची ।
उपमा त्या दैवाची कोण वाणी ॥ ३ ॥
ज्ञानदेवा सांग झाला हरिपाठ ।
पूर्वजां वैकुंठमार्ग सोपा ॥ ४ ॥

**अर्थ :-** हरीचे नाम घेण्याला शुद्ध काळवेळेची जरुरी नाहीं, तें हवे तेव्हा घ्यावे. त्यायोगाने आपल्या आईचे कुळ व बापाचे कुळ अथवा नाम घेणारा व ऐकणारा या दोहोंचाहि उद्धार होतो. ॥ १ ॥ रामकृष्णांचे नाम सर्व पापाचा नाश करणारे आहे. याप्रमाणे सर्व पापांचा नाश करून मूर्ख जीवांना तारणारा एक हरीच आहे. ॥ २ ॥ हरिनाम हेच सार आहे. भजन करण्याकडे जिव्हेची ज्याने योजना केली आहे, त्याच्या दैवास कोणती उपमा द्यावी ? ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मजकडून हरीचे चिंतन यथासांग झाले. आतां माझ्या पूर्वजांना वैकुंठास जाण्याचा मार्ग सोपा झाला आहे. ॥ ४ ॥

**काळ वेळ नाम उच्चारिता नाहीं । दोन्ही पक्ष पाहीं उद्धरती ॥ १ ॥**

**विवरण** : या अभंगात ज्ञानेश्वर महाराज नामस्मरणाची सुलभता सांगतात. बहिरंग व अंतरंग साधनापेक्षा नामस्मरण सोपे आहे. इतर साधनांना स्थल, काल, विधी, पुरुष हट्ट (आग्रह), इच्छा यांचे सहाय्य लागते. उदा. योगाकरिता -



शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ गी. ६-११

अर्थ :- शुद्धस्थानी, अति उंच नाहीं, अति सखल नाहीं असे, दर्भावर (मृगादिकांचे) चर्म व त्यावर वस्त्र ठेवलेले, असे आपले स्थिर आसन स्थापन करावे लागते.

प्रशान्तात्मा विगतभिर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।
मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ गी. ६-१४

अर्थ :- अंतःकरण शांत असलेला, भीतिरहित, ब्रह्मचर्यव्रत पालन करणारा, माझ्या ठिकाणी चित्त ठेवणारा, मत्परायण व मनाचे संयमन केलेला असा होऊन आसनावर बसावे.

ज्याचे शरीर ताब्यात नाहीं त्याच्याकडून अष्टांग योग, (खेचरी मुद्रा) वगैरे होणे शक्य नाहीं. याला मुख्यतः ब्रह्मचर्याची फार गरज आहे.

**नागिणी उत्साहे नवहीं द्वारें निरोधून । नाडित्रयामार्जी सुषुम्ना संचरण । न साधे हा मार्ग ऐसे बोलती मुनिजन । नरहरी चिंतने अहर्निशी मुक्तिस्थान ॥ ज्ञा. म.**

असा हा योगमार्ग आचरण्यास कठीण आहेच व कर्मयोगाचेहि तसेच आहे. त्याचे आचरण यथासांग होणे कठीण आहे.

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्रमोहिताः ।**
**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥** गी. ४-१६

अर्थ :- कर्म कोणते आणि अकर्म कोणते, याविषयी शहाण्या पुरुषांना देखील भ्रम पडतो. जे जाणल्याने तूं अशुभ अशा संसारापासून मुक्त होशील, तें कर्म मी तुला सांगतो.

**तैसें नैष्कर्म्यतेचेनि भ्रमें । गिंवसिजत आहाती कर्मे ।**
**जे दुजी सृष्टी मनोधर्में । करूं शकतीं ॥** ज्ञा. ४-८७

**अर्थ :-** त्याप्रमाणे केवळ मनाच्या संकल्पाने प्रतिसृष्टी उत्पन्न करण्याचे अंगी सामर्थ्य असलेले (पुरुष देखील) आम्ही नैष्कर्म्य स्थितीस पोहोचलो आहो. या भ्रमामुळे कर्माच्या पाशांत सांपडतात.

**वांचूनि मूर्खाची गोठी कायसी । एथ मोहले गा क्रांतदर्शी ।**
**म्हणोनि आतां तेचि परियेसीं । सांगेन तुज ॥** ज्ञा. ४-८८

**अर्थ :-** याबाबतीत चांगले चांगले दूरदर्शी देखील मूढ बनतात, तेथे बिचाऱ्या मूर्खांची काय कथा ? म्हणून आतां तीच गोष्ट (कर्माकर्मविवेक) तुला सांगतो ऐक.

**कर्मणो ह्यपि बोध्दव्यं बोध्दव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ।** गी. ४-१७

**अर्थ :-** कर्म (सामान्य भूतभवोद्भवकर) म्हणजे काय ? हे जाणले पाहिजे. त्याचप्रमाणे अकर्महि (निषिद्ध कर्म) हे जाणले पाहिजे तसेच विकर्म (विशेष कर्म, विहित कर्म) हेहि जाणले पाहिजे. कारण कर्माची गती (व्याप्ती) गहन आहे. म्हणजेच कर्म, अकर्म आणि विकर्म यांचे तत्त्व अवश्य समजाऊन घेतले पाहिजे. कारण त्यांचे तत्त्व कळणे फार कठीण आहे.

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥ ४५ ॥**
**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥ ४६ ॥** गी. १८

**अर्थ :-** आपापल्या कर्मांमध्ये पूर्णपणे रत असलेल्या मनुष्याला



वैराग्य प्राप्त होते. स्वकर्मरत (मनुष्य) कोणत्या प्रकारे मोक्ष पावतो तें ऐक. ज्याच्यापासून भूतमात्रांची उत्पत्ती होतें व ज्याने हे विश्व व्यापिले आहे त्या ईश्वराची आपापल्या कर्मानें आराधना करून मनुष्य वैराग्य मिळवितो.

**तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा । पूजा केली होय अपारा । तोषालागीं ॥ म्हणौनि तिये पूजे । रिझलेनि आत्मराजे । वैराग्यसिद्धि देईजे । पसाय तया ॥ जिये वैराग्यदशे । ईश्वराचेनिं वेधवशें । हे सर्वही नावडे जैसें । वांत होय ॥** ज्ञा. १८-९१७,१९

**अर्थ :-** हे वीर अर्जुना. त्या सर्वात्मक ईश्वराची स्वकर्मरूपी फुलांनी पूजा केली असता, ती पूजा त्याच्या अपार संतोषाला कारणीभूत होते म्हणून त्या पूजेने संतुष्ट झालेल्या आत्मराजाकडून त्याला वैराग्य सिद्धी हा प्रसाद दिला जातो. त्या वैराग्यअवस्थेमध्ये ईश्वराचा वेध लागल्याकारणाने हे सर्व (संसार, स्वर्ग वगैरे) ओकलेल्या पदार्थांप्रमाणे आवडेनासे होते.

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥** गी. १८-४१

**अर्थ :-** हे शत्रूतापना अर्जुना, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांची कर्मे स्वभावसिद्ध गुणांच्या योगाने विभागलेली आहेत.

पण कर्माचे यथार्थज्ञान ज्याला आहे तोच नियमाने कर्मे करतो व त्याला योग्य फल मिळते. जसे - संध्या करण्याची वेळ ठरलेली आहे. सूर्योदय होण्यापूर्वी तारे दिसतात तोपर्यंतच अर्ध्याधिक संध्या उरकली पाहिजे, पण आपण तर आठ-नऊ वाजता उठतो. तसेच त्या संध्येत आचमनाचाहि विधी सांगितला आहे. त्यासाठी माषमात्र म्हणजे उडदाचा दाणा बुडेल एवढेच जल घ्यावे असा नियम आहे. नाहींतर सुरापानाचा दोष लागतो.

**कर्मी आचमन करावें । तेथ माषमात्र जळ घ्यावें ।**
**न्यूनाधिकत्वासवें । दोष पावें सुरापानसम ॥** ए. भा. ६-९८

म्हणून तुकाराम महाराज म्हणतात -

**कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन ॥** तु.म.२५११

अर्थ :- (वेदशास्त्रांत सांगितलेली नित्य, नैमित्तिक व काम्य) कर्म धर्म ह्यांचे आचरण शास्त्रांनी सांगितल्याप्रमाणे यथासांग होत नाहीं, त्यात कांहीं उणे झाल्यास कर्ता पतन पावतो.

संध्येला काळवेळ स्थान वगैरे पाहिजे. त्याशिवाय संध्या होत नाहीं. शिवाय ज्याचा जो विधी आहे, त्याप्रमाणे केले तर त्यापासून अपूर्व (पुण्य) उत्पन्न होईल. नाहीतर व्यर्थ श्रम होतील. पण भगवंताचे नाम तसे नाहीं. हरिनाम घेण्याला शुद्ध काळवेळेची गरज नाहीं. तें हवे तेव्हा घ्यावे. त्यायोगाने नाम घेणाऱ्याच्या आईवापांची दोन्ही कुळे तसेच नाम घेणारा व ऐकणारा दोघेहि उद्धरून जातात. हेच अभंगाच्या प्रथम चरणांत सांगतात -

**काळवेळ नाम उच्चारितां नाहीं । दोन्ही पक्ष पाही उद्धरती ॥ १ ॥**

ध्यानाला एकांत पाहिजे कारण मन हे रजोगुणाचे कार्य असल्यामुळे नुसता भ्रमरा आला तरी मनाची चलबिचल होते. पण नामाचे तसे नाहीं.

**भलत्या काळीं नामावळी । सुलभ भोळी भाविका ॥** तु. म. २५११

**अर्थ :- अशाप्रकारे नामाच्या ठिकाणी कांहींहि दोष नाहीं. भोळ्या भाविकांना हवे त्यावेळेस नाम घेण्यास कोणताच अडथळा नाहीं असे तें सुलभ आहे.**



**सुखें खावें अन्न । त्याचें करावें चिंतन ॥** तु. म. गा. ५२५

अर्थ :- निराहार न राहता कांहीं अन्न सेवन करून सुखाने देवाचे चिंतन करावे. नाथ महाराज सांगतात -

**श्रवणीं ध्यानीं अंतराय । लय विक्षेप कषाय ।**
**कां रसस्वादुही होय । हे चारी अपाय चुकवावे ॥** ए. भा. ११-७०६

अर्थ :- श्रवणामध्ये किंवा ध्यानामध्ये लय, विक्षेप, कषाय आणि रसास्वाद ह्यांनी विघ्न होत असते, याकरिता हे चारी अपाय टाळावेत-

१) **लय** :- आळसाने किंवा झोपेमुळे वृत्तीचा जो अभाव होतो त्याला लय दोष म्हणतात.

२) **विक्षेप** :- बहिर्मुख वृत्तीस विक्षेप दोष म्हणतात.

३) **कषाय** :- कषाय दोष दोन प्रकारचा आहे. वर्तमान स्त्रीधनपुत्रादिकांच्या चिंतनास बाह्यकषाय दोष म्हणतात व भूतभविष्य विषय चिंतनाच्या मनोराज्यास अंतरकषाय दोष म्हणतात.

४) **रसास्वाद** :- स्त्रीच्या नेत्रकटाक्षादि शृंगारचेष्टांचे वर्णन ऐकण्यामध्ये श्रद्धा असते हा रसास्वाद दोष आहे. या चारहि दोषामुळे योग्य ध्यान होत नाहीं. परंतु नामस्मरणाचे मात्र तसे नाहीं. तुकाराम महाराज सांगतात.

**निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्यां कीर्तन करितां डोले ॥** तु. म.२५३०

अर्थ :- जे कोणी झोपले असतांनाहि नामस्मरण करतील, तर नारायण हा त्यांच्याजवळ उभा राहतो व कोणी आसनावर बसून नामस्मरण करील तर तो डोलू लागतो.

तसा ध्यानाचा पडल्या-पडल्या अभ्यास होणार नाहीं. त्याला

योग्य आसन लावूनच बसावे लागते. परंतु नामस्मरण हे बहिर्दिशेला गेल्यावर केले तरी चालते. तुकाराम महाराज पुन्हा सांगतात -

**म्हणोनि गोड सर्वभावें । आंघोळी न लगे तोंड धुवावें ।**
**आर्तचाड जीवें । नलगे भ्यावे संसारा ।।** तु. म. २५१०

अर्थ :- नाम हे सर्वदृष्टीने चांगले आहे. तें घेण्याकरिता अंघोळ करणे किंवा तोंड धुणे यांचीहि गरज लागत नाहीं. संसारी जीवांनी द्रव्यादिकांची योग्य इच्छा धरली तरी चालेल. संसाराला भिण्याचे कांहींच कारण नाहीं.

नामाकरिता स्नानाची गरज नाहीं हे खरे पण याचा अर्थ स्नान करूच नये असे नाहीं. शरीरशुद्धीसाठी तें आवश्यक आहे.

**हांसत खेलत चालत वाट । खाना खाते सोते खाट ।।** तु. म.४३१

अर्थ :- हंसतांना, खेळतांना, वाटेने चालतांना, खातांना, खाटेवर झोपतांना जो रामाचे नांव घेतो तो मला प्रिय आहे.

एका ब्राह्मण धरणेकऱ्याला उपदेश करतांना तुकाराम महाराज हेच सांगतात -

**नको कांहीं पडो ग्रंथाचिये भरी । शिघ्रवत करीं हेचि एक ।**
**देवाचिये चाडे आळवावे देवा । ओरस देहभावा पाडोनियां ।।** ५१९

**अर्थ :-** तूं ग्रंथांचे अध्ययन करण्याच्या भरी पडू नकोस. त्वरेने हेच एक कर. देवाचीच इच्छा धरून व देहभावास ओस पाडून (देहाहंकार टाकून) देवाचेच भजन व नामस्मरण कर.

वृद्धपणी वेदाध्ययन करून काय उपयोग ? वै. प. पू. जोग महाराज सांगत असत, मनुष्याने तारुण्य आहे तोपर्यंत सर्व रक्त अभ्यासात जिरवून टाकावे. कारण बंधा रुपया आहे, म्हणजे ब्रह्मचर्य



आहे. तोपर्यंतच ग्रंथाध्ययन करावे. कारण ब्रह्मचर्य आहे तोपर्यंत वाटेल तो व वाटेल तसा अभ्यास होतो.

**ब्रह्मचारी धर्म घोकावीं अक्षरें । आश्रमीं विचार षट्कर्मीं ।।** तु. म.३५८७

अर्थ :- ब्रह्मचर्याश्रमामध्ये ब्रह्मचाऱ्याने गुरुगृही राहून वेदादिकांचे पठण व अध्ययन करावे. गृहस्थाश्रमामध्ये गृहस्थ्याने यजन (यज्ञ करणे) याजन (आपल्याकडे गुरुत्व घेऊन दुसऱ्याकडून यज्ञ करविणे) **अध्ययन** (वेदपाठ करणे) अध्यापन (दुसऱ्यास वेद पठविणे) दान (दुसऱ्यास दान देणे) आणि **प्रतिग्रह** (दुसऱ्याचे दान स्विकारणे) ही षट्कर्मे करावीत. ही ब्राह्मणाची षटकर्मे आहेत.

म्हातारपणी शास्त्राभ्यास करून काय उपयोग आहे ?

**टेकडी पातली अंगसंगे जरा । आतां उजगरा कोठवरी ।।** तु. म.५१६

अर्थ :- उघड-उघड देहसंगतीने जरा (वृद्धावस्था) प्राप्त झाली असता तुला कोठपर्यंत जागे करूं ? (किंवा कोठपर्यंत संसाराविषयीं तत्पर राहणार आहेस ?)

ज्ञानमार्गाकरिता बुद्धि तीव्र पाहिजे. तीव्र बुद्धि हा तर भगवंताचा प्रसादच आहे. म्हणून परमार्थामध्ये तैलबुद्धि लागते. बुद्धीला तीन प्रतिबंध आहेत.

**१) भूत प्रतिबंध २) वर्तमान प्रतिबंध ३) भावी प्रतिबंध.**

**१) भूत प्रतिबंध :-** श्रवण करीत असता मेलेल्या पुत्रादिकांचे किंवा गेलेल्या ऐश्वर्यादिक भोगांचे चिंतन होणे.

**२) वर्तमान प्रतिबंध :-** विषयासक्त बुद्धिमांद्यादि दोष हे दृढ ज्ञानास प्रतिबंध करतात.

**३) भावी प्रतिबंध** :- अनेक जन्माचे प्रारब्धकर्म ज्ञानास प्रतिबंध करते. त्यास आगामी किंवा भावी प्रतिबंध म्हणतात.

**बुद्धी मेचवेना धोंडी । हा ठायवरी मवाळें सांडी ।**
**आठवो देशधडी । जाला दिसे ॥** - ज्ञा. १४-२४७

अर्थ :- बुद्धि ही जडपणात धोंड्यालाहि दाद देत नाहीं (मागे सारते). म्हणजे तेथपर्यंत तिने मऊपणा टाकलेला असतो आणि स्मरणशक्ति देशोधडी झालेली असते.

ज्यांची बुद्धी दगडासारखी जड आहे, त्याला परमात्मा फार दूर आहे. दगडाची व त्याच्या बुद्धीचा टक्कर लागली तर दगड मागे सरेल इतकी त्याची बुद्धि जड असते. दहा वेळा सांगून ज्याच्या लक्षांत येत नाहीं असा मनुष्य शास्त्राचा अधिकारी नाहीं त्यांच्यासाठी उपाय म्हणजे

**देवाचिये चाडे आळवावे देवा । ओस देहभावा पाडोनियां ॥** ५१९

नामस्मरण सर्वांत सोपें साधन आहे. तें सर्वांनी घ्यावे असे संत सांगतात म्हणजे त्याचे सामर्थ्य लहान आहे असे नाहीं. पण तें घेण्यासाठी काळवेळेची गरज नाहीं. तें कधीहि म्हणजे सकाळी, संध्याकाळी, रात्री, दिवसा, तरुणपणी, म्हातारपणी, बालपणी केव्हांहि घेता येते. त्याच्या नामाने त्याचा एकट्याचाच उद्धार होतो असे नाहीं, तर त्याचा आईबापांचे कुळांचाहि उद्धार होतो. **दोन्ही पक्ष** पाही **उद्धरती** । आणि असाच विचार तृतीय चरणांत मांडतात -

**मातृपितृभ्राता सगोत्र अपार । चतुर्भुज नर होऊनि ठेले ॥**

नामस्मरण करणारा, करविणारा आणि ऐकणारा तिघांनाहि सारखेच फळ आहे. एवढेच नव्हे तर रामकृष्ण नाम सर्व पापांचा नाश करणारे आहे. याप्रमाणे सर्व पापांचा नाश करून मूर्ख जीवांना तारणारा



एक हरीच आहे. असे दुसऱ्या चरणांत सांगतात.

**रामकृष्ण नाम सर्व दोषाहरण । जडजीवां तारण हरि एक ॥ २ ॥**

नामाने सर्व दोष नाहीसे होतात.

**तुका म्हणे महापातकी पतित । ऐसियाचे हित हेळा मात्रे ॥** ८०१

अर्थ :- तुकाराम महाराज म्हणतात, ह्याअगोदर जे कोणी पंचमहापातकी पतित असतील नंतर नामाने त्यांचे हित हेळामात्रे होईल म्हणजे एका क्षणांत होईल. (पाठभेद - होती जीवनमुक्ति हेळामात्रें ।)

अर्थ :- पंचमहापातकी एका क्षणांत जीवंतपणी मुक्ती प्राप्त करून घेतात.

**दोषां झाली घेघेमारी । पळती भरले दिशा चारी ।**
**न येती माघारी । नाहीं उरी परताया ॥** तु. म.२३३४

अर्थ :- म्हणून सर्व दोषांवर (घेघेमारी) नेटाचा हल्ला झाल्यामुळे तें चारी दिशांनी पळतात आणि तें परत येऊं शकत नाहीत, कारण परत येण्याला तें मुळीं शिल्लकच राहू शकत नाहीत.

**अनेक दोषांचे काट । जें जें गादले निघोंट । होती हरिनामे चोखट । क्षण एक न लगतां ॥ १ ॥ तुम्ही हरि म्हणा हरि म्हणा ॥ महादोषांचे छेदना ॥ धृ ॥ अतिप्रीतीचा बांधला । नष्ट चांडाळी रतला । क्षण न लागतां नेला । वैकुंठासी हरि म्हणतां ॥ २ ॥ अमित देषांचें मूळ । झाले वाल्मीकासी सबळ । झाला हरिनामें निर्मळ । गंगाजळ पै जैसा ॥ ३ ॥ हर म्हणतां तरले । महादोषी उद्धरिले । पहा गणिकेसी नेलें । वैकुंठासी हरि म्हणतां ॥ ४ ॥** तु. म.२४९२

अर्थ :- जे अनेक प्रकारच्या पातकांच्या (काट) मळाने (निघोट) परिपूर्ण (गादले) भरले आहेत, त्यास हरीच्या नांवाने शुद्ध होण्याला

एक क्षणदेखील लागत नाहीं. याकरिता 'हरिहरि' या नामाचा उच्चार करा. (असे दोन वेळा सांगतात) त्यायोगाने महापातकांचा नाश होईल. अजामिळ हा ब्राह्मण अतिप्रीतीने बांधला गेल्यामुळे मांगिणीच्या ठिकाणी रममाण झाला. अशा त्या नष्टास नामोच्चाराच्या योगाने क्षणहि न लागता हरीने वैकुंठास नेले. सर्व दोषांची मूळ अशी जी ब्रह्महत्या, त्या वाल्मिकीकडून अगणित घडल्यामुळे त्याचे तें पाप सबळ झाले, पण तो हरिनामोच्चाराच्या योगाने गंगेच्या पाण्याप्रमाणे पवित्र झाला. अशा या हरिनामोच्चाराच्या योगाने मागे पुष्कळ तरले तसेच अनेक महादोषी लोकांचा उद्धार झाला आणि पहा कीं गणिका वेश्या अतिदोषी असूनहि तिने हरि म्हटल्यामुळेच तिला वैकुंठाला नेले. असे नामाचे सामर्थ्य आहे. म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

**जडजीवा तारण हरि एक ॥ २ ॥**

**अंगा मनासि रुचि यावें । येतुलेनि कृत्याकृत्य नाठवे ।**
**जो करणेयाचेनि नांवें । भलतेंचि करी ॥ ज्ञा-१३-७७७**

अर्थ :- शरीरास व मनास आवडेल तेवढे असले म्हणजे झाले, मग तें कर्म करण्यास योग्य आहे किंवा नाहीं याचा तो कांहीं विचार करीत नाहीं व जे करावयाचे म्हणून भलतेच करतो. उदा. शेळीप्रमाणे विषय सेवन करणारा व विहित-निषिद्ध न मानणारा हा पामर होय. पण अशाचा सुद्धां या नामाने उद्धार होतो. कारण परमात्मा दयाळू आहे.

**आंधळ्यापांगळ्यांचा एक विठोबा दाता । प्रसवला विश्व तोचि सर्व होय जाणता । घर्डी मोडी हेळामात्रे पापपुण्य संचितां। भवदुःख कोण वारी तुजवांचोनि चिंता ॥ १ ॥ तु. म. ३४३**

अर्थ :- (या अभंगातील आंधळापांगळा हा परमार्थातील पुष्कळ पायऱ्या चढून गेलेला असा उत्तम साधक आहे. आंधळ्या पांगळ्यास



(मूढांना व पाप्यांना) दान देणारा एक विठोबा आहे. त्याच्यापासूनच सर्व जग निर्माण झाल्यामुळे तोच सर्व जाणणारा आहे. तो एका क्षणामध्ये ब्रह्मांडाची घडामोड करीत आहे. पापपुण्य संचित कर्म त्यानेच उत्पन्न केले आहे. त्या देवास मी विनंती करतो कीं तुझ्यावांचून संसाराचे दुःख व त्याविषयीची काळजी कोण दूर करील ? परमात्मा अज्ञानी जीवाचे मागचे दोष पहात नाहीं.

**ख्याती केली अजामेळें । होतें निघालें दिवाळें ।**
**मोकलिला प्रायश्चित्तीं । कोणी न धरितीं हातीं ॥ तु. म.-३५४०**

अर्थ :- सर्वच पुण्याईचे दिवाळे निघाले होते, तरी अजामेळाने नामाच्या जोरावर मोठाच पुरुषार्थ केला. खरे म्हणजे त्यास सर्वच प्रायश्चित्तांनी टाकून दिले होते, तें कोणीच त्याचा अंगीकार करीनाशी झाली होती.

**न कळे तें कळो येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ न दिसें तें दिसो येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणतां वाचे ॥ तुका म्हणे जीव आसक्त सर्वभावे । तरतील नामें विठोबाच्या ॥ तु. म. २४८५**

अर्थ :- एका विठोबाचे नांव घेतल्याने न कळणारा देव तो (उगलें) आपोआप कळून येईल. एका विठोबाच्या नांवाचे चिंतन केल्याने न दिसणारा देव आपोआप दिसून येईल. एका विठोबाचे नांव वाचेनें निरंतर घेतल्याने न होणारा असा अलभ्य लाभ व अपार स्वरूप लाभ होतो. तुकाराम महाराज म्हणतात, संसाराच्या ठिकाणी आसक्त असणाऱ्या जीवांनी कायावाचामनाने चिंतन केले तर ते भवसागरातून तरतील. एकनाथ महाराज मनुष्य देहाचे अधिक महत्त्व सांगतात -

**बाहुल्यें मनुष्य देहीं । निजज्ञान घातले पाहीं । जेणें ज्ञानें देहीं ।**

**विदेह पाहीं पावती ।। आहार निद्रा भय मैथुन । सर्वां योनींसी समसमान । मनुष्य देहींचेज्ञान । अधिक जाण सर्वांशी ।। देखोनि मनुष्यदेहासी । सुख झाले भगवंतासी । अधिकार ब्रह्मज्ञानासी । येणें देहेंसी मत्प्राप्ती ।। पावोनियां मनुष्यपणा । जो न साधी ब्रह्मज्ञाना । तो दाढीचा मेंढा जाणा । विषयाचरणा विचरतु ।। मनुष्यदेहींचेनि ज्ञानें । सच्चिदानंदपदवी घेणें । एवढा अधिकार नारायणें । कृपावलोकने दिधला ।। मनुष्यदेहीं ब्रह्मज्ञान । पुढील जन्मीं मी करीन । म्हणे तो नागवला जाण । सोलींव अज्ञान त्यापासीं ।।** - ए. भा. ९-३२६, ३१

**अर्थ :-** त्या मनुष्यामध्ये पुष्कळसे आपले ज्ञान भरून ठेवले, ज्या ज्ञानाने तें त्या देहांत असूनहि विदेह स्थितीला पोहोचतात. आहार, निद्रा, भय आणि मैथून ही साऱ्या योनींना सारखी आहेत. परंतु मनुष्य देहीचे ज्ञान हे सर्वांपेक्षा विशेष आहे. अशा त्या मनुष्यदेहाला पाहून भगवंताला मात्र सुख झाले. कारण या देहाला ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेण्याचा अधिकार आहे आणि या देहाने माझी प्राप्ती होण्यासारखी आहे, असे भगवंताला वाटले. मनुष्यजन्माला येऊनहि जो ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेणार नाहीं, तो विषयाचरणातच सर्वकाळ चूर असणारा दाढीवाला बोकडच समजला पाहिजे. मनुष्य देहातील ज्ञानाने सच्चिदानंद पदवी प्राप्त करून घेता येते, एवढा अधिकार नारायणाने कृपा करून दिला आहे. मनुष्य देहातच ब्रह्मज्ञान प्राप्त करून घ्यावयाचे तर तें मी पुढच्या जन्मात संपादन करीन, असे म्हणेल तो बुडाला असे समजावे, त्याच्याजवळ असलेले अस्सल अज्ञान तें हेंच होय.

**दिलें इंद्रियें हात पाय कान । डोळे मुख बोलावया वचन । जेणें तूं जोडसी नारायण । नासे जीवपण भवरोग ।।** तु. म. ७०५

**अर्थ :-** हात, पाय, कान, डोळे व शब्द बोलण्याकरिता मुख



इत्यादि सर्व इंद्रियें हे देवा, तूं मला दिली आहेस. ह्या इंद्रियांचा खरा विनियोग केल्यामुळे तूं जो नारायण त्याची मला प्राप्ती होऊन जीवपणा व संसारव्यथा नाहींशी होईल.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरीचे नाम हेच सार आहे. भजन करण्याकडे आपल्या जिव्हेची ज्याने योजना केली आहे, त्याच्या दैवास उपमा कोणी द्यावी ? तर ती देता येत नाहीं. हे अभंगाच्या तृतीय चरणांत सांगतात

**हरिनाम सार जिव्हा या नामाची । उपमा त्या दैवाची कोण वाणी ।। ३ ।।**

भगवन्नामस्मरण करणे यातच जिव्हेचे सार्थक आहे. तुकाराम महाराज म्हणतात -

**घेईं घेईं माझे वाचें । गोड नाम विठोबाचें ।।** तु. म. ३३६१

**अर्थ :-** हे माझे वाचे, तूं या विठोबाचे गोड नाम निरंतर घेत जा. (असे दोन वेळा सांगतात)

**मृत्युलोकीं आम्हा आवडती परी । नाहीं एका हरिनामेंवीण ।।** २११५

**अर्थ :-** ह्या मृत्युलोकामध्ये आम्हाला हरीच्या नामाशिवाय दुसरे कांहीं (परी) प्रकार आवडत नाहीत.

**काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें ।।** तु. म. २४७९

**अर्थ :-** एका विठ्ठलाचे चिंतन केल्याने कोणती गोष्ट घडत नाहीं ? तर सर्वकांहीं घडते, घडूं शकते.

भगवंताने ज्या कामाकरिता जिव्हादिक सर्व इंद्रियें दिली आहेत, त्या कामाकरिता जो त्यांचा विनियोग करतो तो दैववान आहे. त्या दैवाला उपमा ती कोणती द्यावी ? **उपमा त्या दैवाची कोण वाणी ।।**

**तुका म्हणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ।।** तु. म. ३७०६

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, ज्यांच्या अंगीं सर्व कला = चातुर्ये वसत आहेत. साधक आपल्या मनबुद्धीला उपदेश करतात -

**मना एक करी । म्हणे मी जाईन पंढरी ।**
**उभा विटेवरी । तो पाहेन सांवळा ॥** तु. म.३३७७

**अर्थ :-** हे मना, तूं एक गोष्ट करीत जा, ती अशी कीं, मी पंढरीला जाईन व तेथे विटेवर उभा असलेला सांवळा श्रीहरी पाहीन असे नित्य चिंतन करीत जा म्हणजे कधीतरी तुझी इच्छा पूर्ण होईल.

असा इंद्रियांचा परमार्थांत उपयोग करणारा दैववान होय. मग तो संसारांत असला तरी दैववानच आहे. आरोनि संसारी जिव्हे वेगु करी ॥ भगवंताचे नाम घेणारा खरोखरच दैवशाली आहे.

आतां ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझ्याकडून हरीचे चिंतन यथासांग झाले. आतां माझ्या पूर्वजांना वैकुंठात जाण्याचा मार्ग सोपा झाला आहे, हे अभंगाच्या शेवटच्या चरणांत सांगतात.

**ज्ञानदेवा सांग झाला हरिपाठ । पूर्वजां वैकुंठ मार्ग सोपा ॥ ४ ॥**

याचप्रमाणे तुकाराम महाराजहि म्हणतात -

**याजसाठीं केला होता अट्टाहास । शेवटचा दिस गोड व्हावा ॥**
**आतां निश्चिंतीनें पावलों विसावां । खुंटलिया धांवा तृष्णेचिया ॥** तु. म. ४०१३

**अर्थ :-** शेवटचा दिवस चांगला व्हावा, म्हणजे हरीच्या चिंतनात देह पडावा एवढ्याकरिताच भगवत्भक्तीचा खटाटोप केला होता. आतां मी काळजीशिवाय विश्रांतीस प्राप्त झालो आहे. त्याचे कारण असे कीं, आतां तृष्णेच्या धांवा थांबल्या आहेत. म्हणून ज्ञानेश्वर महाराज सर्व जीवांना उपदेश करितात - **हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा।**

**- समाप्त -**

## * अभंग बाविसावा *

**नित्यनेम नामीं तें प्राणी दुर्लभ ।**
**लक्ष्मीवल्लभ तयाजवळी ॥ १ ॥**
**नारायणहरि नारायणहरिं ।**
**भुक्ति मुक्ति चारीं घरीं त्यांच्या ॥ २ ॥**
**हरिवीण जन्म तो नर्कचि पै जाणा ।**
**यमाचा पाहुणा प्राणी होय ॥ ३ ॥**
**ज्ञानदेव पुसे निवृत्तीसी चाड ।**
**गगनाहूनि वाड नाम आहे ॥ ४ ॥**

**अर्थ :-** सतत हरीचें नाम घेण्याचा ज्यांचा नियम आहे, असे प्राणी दुर्मिळ आहेत. त्यांच्याजवळ लक्ष्मीचा पती विष्णु असतो. ॥ १ ॥ नेहमी नारायणहरि - नारायणहरि अशा नामाचा जे जप करतात त्यांच्या घरी सर्व ऐश्वर्य व सलोकतादि चारी मुक्ति असतात. ॥ २ ॥ जन्मास येऊन जर हरीची ओळख झाली नाहीं, तर त्या जन्मास नरकच समजावे. तो प्राणी यमाच्या घरचा पाहुणा होतो, म्हणजे यमलोकास जातो. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराजांनीं आपले गुरु जे निवृत्तिनाथ, त्यांस हरीचे नाम केवढे आहे ? असा आपल्या इच्छेनुरूप प्रश्न केला असतां त्यावर गुरु निवृत्तिनाथांकडून, ''आकाशापेक्षाहि नाम मोठे आहे'' असे उत्तर मिळाले. ॥ ४ ॥

**विवरण :**

**नित्यनेम नामी तें प्राणी दुर्लभ । लक्ष्मीवल्लभ तयांजवळी ॥ १ ॥**

नामस्मरण सोपे आहे. उच्चारण्यास कठीण नाहीं. तरी अखंड नामस्मरण करणारा विरळाच.

**विरळा ऐसा कोणी । तुका त्यासी लोटांगणी ।।** तु. म. २८३१

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, खरा ब्रह्मज्ञानी असा संत क्वचित एखादाच असतो. जर कोणी असा खरा संत असेल तर त्यास मी साष्टांग प्रणाम करीन.

- वास्तविक भगवन्नाम एकांतात प्रेमपूर्वक घेतले पाहिजे.

**आवडीं विठ्ठल गाईजे एकांती । अलभ्य तें येती लाभ घरा ।।** तु. म. २७२०

**अर्थ :-** विठोबाचे नाम मोठ्या प्रितीनें, एकभावाने एकांतात बसून गा, त्यायोगाने जे मिळण्यास कठीण असे लाभ तुमच्या घरी चालून येतील. एकांतामध्येच खरा रंग, एकतानता, प्रेम इत्यादि गोष्टी खऱ्या अर्थानें जमून येतात. गौळणी परमात्म्याला एकांतात घेऊन जात असत आणि त्याच्याशी प्रेम, रासक्रीडा वगैरे अनेक लिलाद्वारा त्याचे सुख भोगीत होत्या. आम्ही एकादशी, सोमवार, गुरुवार वगैरे दिवशी दंभाने भजन करतो. नित्यनेमानें, प्रेमाने भजन करणारे फार थोडे आहेत.

**जया परमार्थाची चाड । तेणे सांडावे लिगाड ।**
**धरूनि भजनाची चाड । नित्यनेम आदरे ।।** ए. म.

**सप्रेमभावें करितां भक्ति । हरिचरणीं ठेविली चित्तवृत्ती । निजस्वार्थाचिये स्थितीं । अतिप्रीति निजनिष्ठा ।। ७४५ ।। ऐसे ज्यांचे जिव्हेवरी । नाम नाचे निरंतरीं । ते धन्य धन्य संसारी । स्वानंदें हरी गर्जतु ।। सप्रेम सद्‌भावे संपूर्ण । नित्य करितां नामस्मरण । वृत्ति पालटती आपण । तेंही लक्षण ऐक राया ।। नामासरिसाच हरी । रिघे हृदयामाझारीं । तेणें धाकें अभ्यंतरी । हो लागे पुरी हृदयशुद्धी ।।** ए. भा.२-७७४,७६

**अर्थ :-** आपला खरा स्वार्थ साधण्याच्या अवस्थेत सप्रेम भक्ति करीत असता अत्यंत प्रितीनें व निजनिष्ठेने भक्त आपली सारी वृत्ती



हरीच्या चरणावरच ठेवीत असतो. याप्रमाणे ज्याच्या जिव्हेवर नाम निरंतर नाचत असते, जे स्वानंदाने हरिनामाचा गजर करीत असतात तें संसारामध्येच अत्यंत धन्य होत. पूर्ण प्रेमाने व सद्‌भावाने नित्य नामस्मरण केले असता वृत्ती आपोआप पालटून जाते, तेहि लक्षण सांगतो ऐक. नामाबरोबच हृदयामध्ये हरी शिरतो. त्या धाकाने अंतरात पूर्णपणे हृदयशुद्धी होऊं लागते.

नियमाशिवाय मनुष्याचा जन्म फुकट आहे. मनुष्याच्या जीवनामध्ये कांहीं थोडा फार तरी नियम पाहिजे. तो नसेल तर तसा मनुष्य म्हणजे भार वाहणारा बैल आहे असे तुकाराम महाराज सांगतात.

**कांहीं नित्यनेमाविण । अन्न खाय तो श्वान ।**
**वायां मनुष्यपण । भार वाहे तो वृषभ ।।** तु. म.३०२२

**अर्थ :-** जो मनुष्य भोजनापूर्वी हरीची पूजा, गीता, विष्णुसहस्रनामाचा पाठ अगर कांहीं हरिनामाचा जप ह्यांचा कांहीं एक नियम न (करता) ठेवता अन्न खातो तो कुत्रा आहे. तो व्यर्थ मनुष्यपणाचा भार वाहतो. तो केवळ बैलच आहे. कित्येकांना नियम म्हणजे मोठे बंधन वाटते.

**नवल कैसें राजाधिराजा । कीर्तन तेचि महापूजा । ऐशीं आवडी अधोक्षजा । कीर्तनें गरुडध्वजा उल्हासु सदा ।। कीर्तन पढिये गोविंदा । यालागी सन्मार्गी नारदा । तो कृष्णकीर्ति पढे सदा । नामानुवादा गर्जतु ।। कीर्तन करितां नामानुवाद । संकटी रक्षिला प्रल्हाद । कीर्तनें तुष्टे गोविंद । छेदी भवबंध दासांचा ।।**

ए.भा.५-३४६,४८

**अर्थ :-** हे राजाधिराजा, हे केवढे आश्चर्य आहे पहा ! कीं, श्रीकृष्णाला कीर्तन हीच मोठी पूजा वाटते. इतकी श्रीकृष्णाला

कीर्तनाची आवड कीं, त्याच्या योगानेच त्या गरुडध्वजाला सदा आनंद वाटतो. श्रीकृष्णाला कीर्तन प्रिय आहे; म्हणून तो नारदाला फार मान देतो, कारण नारद निरंतर श्रीकृष्णाचीच कीर्ति गात असतो व त्याच्याच नामाचा घोष करीत असतो. नामस्मरण केल्यामुळेच प्रल्हादाचे संकटांतून त्याने रक्षण केले. कीर्तनाने श्रीहरीला संतोष होतो आणि तो भक्तांचे भवबंध तोडून टाकतो. जनावरें देखील नियमाने वागतात परंतु माणसे वागत नाहींत.

**आतां नियमुचि हा एकला । जीवें करावा आपुला ।**
**जैसा कृतनिश्चयाचिया बोला । बाहेरा नोहे ।।** ज्ञा. ६-३८०

**अर्थ :-** आतां तूं जो निश्चय करशील, त्याच्या आज्ञेच्या बाहेर जो नियम कधी जाणार नाही; अशाप्रकारचा हा एकच नियम तूं जीवाभावापासून कर.

उदा. एका मुलाने शौचासचे उरलेले पाणी एका झाडाला टाकण्याचा नियम केला होता. बारा वर्षानंतर त्याला त्या झाडातील भूत प्रसन्न झाले व काय पाहिजे तें माग म्हणूं लागले. मुलगा म्हणाला की, मला प्रभू रामचंद्रांची भेट घडवून दे. त्यावर भूत म्हणाले, प्रभू रामचंद्रांची नाहीं परंतु मी तुला हनुमंताची भेट घडवून देतो. भूताने खूण सांगितली कीं, हनुमंतराय म्हाताऱ्याचे रूप घेऊन रामायण कथा ऐकायला येतात व सर्वांच्या नंतर जातात. असा भूताच्या सांगण्यावर त्या मुलाने विश्वास टेवला व त्या हनुमंतरायरूपी म्हाताऱ्याचे पाय धरले. हनुमंतरायांनी प्रसन्न होऊन त्याला प्रभू रामचंद्रांची भेट घडवून दिली. अर्थात शौचासचे अमंगल पाणी परंतु तेच नित्यनेमाने झाडाला टाकण्याने एवढा फायदा होतो, तर मग नित्यनेमाने नामस्मरण केल्याने किती फायदा होईल ? तर साक्षात् लक्ष्मीपती श्रीविष्णु त्याच्याजवळ



वास करतात हेच प्रथम चरणांत सांगतात -

**नित्यनेम नामी तें प्राणी दुर्लभ । लक्ष्मीवल्लभ तयाजवळी ।। १ ।।**

त्याचप्रमाणे नेहमी 'नारायणहरि नारायणहरि' असा जप जे करतात त्यांच्या घरी सर्व ऐश्वर्य व सलोकतादि चारी मुक्ती असतात असे दुसऱ्या चरणांत सांगतात.

**नारायणहरि नारायणहरि । भुक्ति मुक्ति चारी घरी त्यांच्या ।। २ ।।**

तुकाराम महाराज गोकुळ वासी लोकांचे वर्णन करतात.
**घरोघरी झाला लक्ष्मीचा वास । दैन्य दारिद्र्यास त्रास आला ।।**

**अर्थ :-** तेव्हापासून घरोघरी लक्ष्मीचे वास्तव्य झाले त्यामुळे पूर्वीचे दारिद्र्य त्रासून पळून गेले.

**हरि म्हणता भुक्ति हरि म्हणतां मुक्ति ।**
**चुके यातायाती हरि म्हणतां ।।** तु. म.२४५४

अर्थ :- जर मुखाने हरी म्हटले तर सर्व भोग मिळतात व हरिनामाच्या उच्चाराने मुक्तीहि मिळते. तसेच हरीच्या उच्चाराने सर्व (यातायाती) खटाटोप नाहीसा होतो.

**नाम प्रल्हाद उच्चारी । तया सोडवी नरहरी ।**
**उचलोनि घेतला कडियेवरी । भक्त सुखे निवाला ।।** ज्ञा. म.

जन्माला येऊन जर हरीची ओळख झाली नाहीं तर त्या जन्माला नरकच समजावे. तो प्राणी यमाघरचा पाहुणा होतो; म्हणजे यमलोकास जातो. हेच अभंगाच्या तिसऱ्या चरणांत सांगतात -

**हरिवीण जन्म तो नर्कचि पै जाणा । यमाचा पाहुणा प्राणी होय ।।**

नरकाची कल्पना पृथ्वीवरील कोणत्याहि दुःखाशी केली जाऊं शकत नाहीं एवढा तो भयंकर असतो. श्रीमद्‌भागवतात सर्व नरकांचे वर्णन आढळते. थोडक्यांत नरक हे अतिशय यातनादायक ठिकाण आहे.

**देव ऐसा ठाव नाहीं जया जना । तयासी यातना यम करी ॥ २ ॥**

**अर्थ :-** (तु. म. २८) सर्वांच्या ठिकाणी देव आहे असे ज्यास माहीत नाहीं त्यास यमाची फार यातना होते.

**दुष्ट अभक्त जे निष्ठुर मानसीं । केली हे तयांसी यमपुरी ॥ यमदूत त्यांसी करिती यातना । नाहीं नारायणा भजले जे ॥ जे नाहीं भजले एका भावें हरी । त्यासी दंड करी यमधर्म ॥ यमधर्म म्हणे तया दोषियांसी । कारे केशवासी चुकलेती ॥ चुकलेती कथा पुराणश्रवण । होते तुम्हां कान डोळे मुख ॥ कान डोळे मुख संतांची संगती । न धराच चित्तीं सांगितलें ॥ सांगितलें संतीं तुम्हांसी उगवुनि ॥ गर्भासी येऊनि यमदंड ॥ दंडुं आम्ही रागें म्हणे यमधर्म । देवा होय श्रम दुर्जनांचा ॥** तु. म.१५

**अर्थ :-** जे कोणी दुष्ट व भक्तिहीन असून ज्यांचे मन निर्दय आहे त्यांच्याकरिता देवाने यमलोक केला आहे. जे कोणी नारायणाला भजले नाहींत, त्यांना त्या यमलोकामध्ये यमदूत यातना करितात. ज्यांनी एका भावाने हरीचे भजन केले नाहीं, त्यांना यमधर्म शिक्षा करतो. त्या पाप्यांना यमधर्म म्हणतो, अरे तुम्ही त्या केशवाचे भजन कां केले नाहीं ? कथा पुराण श्रवण कां केले नाहीं ? तुम्हाला कान, डोळे, तोंडहि होते ना. हे सर्व असूनहि संतांची संगती केली नाहीं व त्यांनी सांगितलेला उपदेशहि चित्तात घेतला नाहीं.



तुम्हाला जन्मला येऊन एक यमदंड आहे असे संतांनी स्पष्ट सांगितले आहे. आतां तुम्हाला आम्ही शिक्षा करू असे मोठ्या रागाने यमधर्म त्यांना म्हणतो. कारण जे दुराचारी आहेत, त्यांचा देवाला ताप होतो. म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**हरीवीण जन्म तो नर्कचि पै जाणा । यमाचा पाहुणा प्राणी होय ॥**

श्री ज्ञानेश्वर महाराजांनी आपले गुरु जे निवृत्तिनाथ त्यांना हरीचे नाम केवढे आहे ? असा आपल्या इच्छेनुरूप प्रश्न केला असता त्यावर गुरु निवृत्तिनाथांकडून आकाशापेक्षाहि नाम मोठे आहे असे उत्तर मिळाले. हेच अभंगाच्या शेवटच्या चरणांत सांगतात -

**ज्ञानदेव पुसे निवृत्तीसी चाड । गगनाहुनि वाड नाम आहे ॥ ४ ॥**

खरोखरच गगनादिक-आकाशापेक्षा पंचमहाभूतापेक्षा परमात्मा फार मोठा आहे. कारण त्याचेपासूनच ही पंचमहाभूतें उत्पन्न झाली आहेत. म्हणूनच तो सर्वांत मोठा आहे.

सत्यज्ञानानंत गगनाचे प्रावर्ण ।
**नाहीं रूप वर्ण गुण जेथे ॥** ज्ञा. म.

आकाशादिकांची उत्पत्ती ॐ कारापासून झाली आहे व परमात्मा ॐकार रूप आहे. म्हणून नाम - नामी एकच आहे. यासाठीच ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥**

**- समाप्त -**

## * अभंग तेविसावा *

**सात पांच तीन दशकांचा मेळा ।**
**एकतत्त्वीं कळा दावी हरी ॥ १ ॥**
**तैसे नव्हे नाम सर्व मार्गा वरिष्ठ ।**
**येथे कांहीं कष्ट न लगती ॥ २ ॥**
**अजपा जपणें उलट प्राणाचा ।**
**तेथेही मनाचा निर्धारू असे ॥ ३ ॥**
**ज्ञानदेवा जिणें नामेवीण व्यर्थ ।**
**रामकृष्णीं पंथ क्रमियेला ॥ ४ ॥**

**अर्थ :-** कोणी संसार सात तत्त्वात्मक आहे, कोणी पांच तत्त्वात्मक आहे, कोणी तीन तत्त्वात्मक आहे, तर कोणी दहा तत्त्वात्मक आहे असे मानतात. हीं सर्व तत्त्वें हरि आपल्या एका चैतन्य तत्त्वावर दाखवितो. ॥ १ ॥ असा तत्त्वविचार करण्यापैकी हरीचे नाम नाहीं. तें सर्व साधनांपेक्षा श्रेष्ठ आहे. तें घेण्याला कष्ट पडत नाहीत. ॥ २ ॥ रात्री व दिवसा मिळून एकवीस हजार सहाशे वेळा सोऽहं सोऽहं असा आपल्या हृदयांत प्राणाच्या वरती जाण्यांत आणि अपानाच्या खाली जाण्यांत होणाऱ्या उभयतांच्या भेटीत सहज जप होत असतो त्यास अजपाजप असे म्हणतात. या साधनातसुद्धा मनाचा पक्का निश्चय असावा लागतो. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरीच्या नामस्मरणावांचून जगणे मला व्यर्थ वाटते म्हणून मी रामकृष्ण नामाच्या भजनमार्गानें चालतो म्हणजे निरंतर हरीचे भजन करीत आहे. ॥ ४ ॥

**सात पांच तीन दशकांचा मेळ । एकतत्त्वीं कळा दावी हरी ॥**



विवरण : प्रस्तुत अभंगामध्ये ज्ञानेश्वर महाराजांनी नाम हे सर्व मार्गामध्ये सर्वांपेक्षा वरिष्ठ आहे हे दर्शविले आहे. नाम हे सर्व तत्त्वांपेक्षा श्रेष्ठ तत्त्व आहे. शास्त्रामध्ये तत्त्वविचार प्रसंगी अनेक तत्त्वांची कल्पना केली आहे.

कोणी सात तत्त्व मानतात, कोणी पांच, कोणी तीन, कोणी दहा किंवा सर्वांची बेरीज करून कोणी पंचवीस तत्त्वें मानतात कोणी छत्तीसहि तत्त्वें मानलेली आहेत.

एक तीन पांच मेळा पंचविसांचा । छत्तीस तत्त्वांचा मूळ हरी ॥

सांख्यशास्त्रकार पंचवीस तत्त्वें मानतात. सांख्यशास्त्र हे कपिल महामुनींचे आहे. यांत प्रकृतिपुरुषाचा विचार केलेला आहे. त्यांची पंचवीस तत्त्वें एकनाथ महाराज सांगतात -

**अहं महत्तत्त्व पंचतन्मात्रा । हा स्थूल प्रकृतीचा उभारा । महाभूतें इंद्रियें अकरा । हे षोडश विकारांची संख्या ॥ यात मिळाल्या प्रकृतीपुरुष । तत्त्वसंख्या पंचवीस । प्रकृतीमार्जी गुणांचा वास । हा तत्त्वविलास तत्त्वांचा ॥** ए. भा. १६, २७४, ७५

**अर्थ :-** अहंकार महत्तत्त्व = बुद्धि आणि पृथ्वी (गंध), वायु (स्पर्श) आकाश (शब्द), उदक (रस) व तेज (तेज) या पंचतन्मात्रा = पंचविषय (हा प्रकृतीचा सामान्य विकार आहे) मिळून स्थूल प्रकृति होते आणि पंचमहाभूतें व अकरा इंद्रियें मिळून विकारांची संख्या सोळा आहे. मन, अहंकार व पंचतन्मात्रा=(पंचविषय) ह्यांत आणखी प्रकृति व पुरुष ही दोन मिळविली म्हणजे एकंदर तत्त्वांची संख्या पंचवीस होते. प्रकृतिमध्ये गुणांचे वास्तव्य असते हा तत्त्वांचा तत्त्वविलास आहे.

न्याय - वैशेषिक शास्त्रकार सात पदार्थ मानतात. **१) द्रव्य २) गुण ३) कर्म ४) सामान्य ५) विशेष ६) समवाय ७) अभाव.**

सप्तैव धातव इति तत्रार्थाः पञ्च खादयः ।
ज्ञानमात्मोभयाधारस्ततो देहेन्द्रियासवः ॥ ए. भा. २२-११

अर्थ :- सातच तत्त्वें आहेत असे प्रतिपादन करणारे फक्त आकाशादि पांच भूतें, जीव व सर्वाधार आत्मा मिळून सात तत्त्वें मानतात आणि त्यापासून शरीर, इंद्रियें, प्राण ही उत्पन्न झाली असे म्हणतात.

**जीं जीं ऋषीश्वर बोलती । तीं तीं तत्त्वें सत्य होतीं । हे सर्वज्ञ ज्ञाते जाणती । तेचि अर्थी हरि बोले ॥ ज्याचेनि मते जैसे ज्ञान । तो तैसें करी तत्त्वव्याख्यान । या हेतू बोलती ब्राह्मण । ते सत्य जाण उद्धवा ॥** ए. भा. २२-५५, ५६,

अर्थ :- मोठमोठ्या ऋषींनी जी तत्त्वें सांगितला आहेत ती सर्व खरीच आहेत. हे सर्वज्ञ ज्ञात्यांना माहित आहेत ह्याविषयीच श्रीकृष्ण सांगतात, ज्याचे ज्ञान जसे असते, त्याप्रमाणे तो तत्त्वें सांगत असतो. उद्धवा ह्याच हेतूने ब्राह्मण बोलतात तेहि खरेच समजावे.

**केवळ दोराचा सर्पाकार । हा श्वेत कृष्ण कीं रक्तांबर । ज्यासी जैसा भ्रमाकार । त्यासी साचार तो तैसा ॥ तेवीं आत्मतत्त्व एकचि जाण । अविकारी निजनिर्गुण । तेथ नाना तत्त्वांचे व्याख्यान । बोलती ब्राह्मण मायायोगें ॥** ए. भा. २२-६०, ६१

अर्थ :- केवळ दोरच जेथे सर्पाकाराने भासतो. तेथे तो साप पांढरा, काळा की तांबडा कसा म्हणावा ? तर ज्याला जसा भ्रम होतो, तसा त्याला तो दिसत असतो. त्याप्रमाणे आत्मतत्त्व हे एकच आहे व ते निर्गुण आणि निर्विकार आहे. परंतु मायेमुळे ब्राह्मण अनेक तत्त्वांचे प्रतिपादन करतात. म्हणून नाथ महाराज सांगतात -

**एक पांच तीन मेळा पंचविसाचा । छत्तीस तत्त्वांचा मूळ हरि ॥**

अर्थ :- कोणी संसार हा एक तत्त्वांचा, कोणी तीन तत्त्वांचा,



कोणी पांच तत्त्वांचा, कोणी पंचवीस तत्त्वांचा तर कोणी छत्तीस तत्त्वांचा आहे असे मानतात. परंतु या सर्व तत्त्वांचे मूळ एक हरीच आहे. वैशेषिक शास्त्रकार सात पदार्थ मानतात. सांख्य शास्त्राबद्दलहि माहिती दिली आहे. वास्तविक परमात्मा मूळ एकच आहे. तो मूळ आपल्या स्वसंकल्पाने अनेक बनला. **एकोऽहं बहुस्याम् ।**

**एकले न कंठेचि म्हणोनिया येणे । केली निर्माण चौदाही भुवनें । गगन सूर्यचंद्र मेघ तारांगणें । पांचही महाभूते भौतिक भिन्ने भिन्ने वो ॥** निळोबाराय

आतां तुम्ही त्याला एक म्हणा किंवा अनेक म्हणा. तो आहे तसा आहे. शास्त्रांत महाभूतांची उत्पत्ती सांगितली आहे.

आत्मनः आकाशः संभूतः । आत्म्यापासून आकाश निर्माण झाले.

हे सांगण्याच्या दोन रिती आहेत. १) अन्वय दृष्टी २) व्यतिरेक दृष्टी. सांख्य म्हणजे ज्ञानमार्ग तत्त्वशोधनार्थ आहे. हे कळणे फार कठीण आहे. कारण कोणी संसार सात तत्त्वात्मक, पांच तत्त्वात्मक, दहा तत्त्वात्मक आहे असे मानतात. ही सर्व तत्त्वें हरि आपल्या एक चैतन्य तत्त्वावर दाखवतो. असे ज्ञानेश्वर महाराज प्रथम चरणात सांगतात.

सात पांच तीन दशकांचा मेळा । एकतत्त्वी कळा दावी हरी ॥

हा तत्त्वविचार म्हणजे क्षेत्रक्षेत्रज्ञ विवेक होय. तो किती सूक्ष्म व कठीण आहे याचे व्याख्यान ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरीच्या १३ व्या अध्यायात केले आहे.

**हे बहु उखीविखी । ऋषीं केली नैमिषीं । पुराणें इयेविषीं । मतपत्रिका ॥ अनुष्टुभादि छंदें । प्रबंधीं जियें विविधें । ते पत्रावलंबन मदें । करितातिं अझुनी ॥ वेदींचें बृहत्सामसूत्र ।**

**देखणेपणें पवित्र । परी तयाही हे क्षेत्र । नेणवेचि ॥ आणीक आणीकीहीं बहुतीं । महाकवीं हेतुमंतीं । ययालागीं मती । वेंचिलिया॥ परी ऐसें हें एवढें । कीं आमुकेयाचेंचि फुडें । हें कोणाही वरपडें । होयचिना ॥** ज्ञा. १३-६६, ७०

**अर्थ :-** नैमिष अरण्यांत ऋषींनी या क्षेत्रसंबंधाने पुष्कळ वादविवाद केला आहे. ह्याविषयीं पुराणेहि शास्त्रभूत आधार आहेत. अनुष्टुप छंदादि जी निरनिराळ्या प्रकारची (या क्षेत्रासंबंधी) काव्यरचना आहे; ती ज्या ग्रंथांत आहे त्या ग्रंथांचा अद्यापपर्यंत लोक गर्वाने आश्रय करतात. ऋग्वेदातील जे बृहत्सामनामक सूत्र आहे ते ज्ञानदृष्टीने पवित्र आहे. त्यामध्ये (पुष्कळ ज्ञान भरलेले आहे) तथापि या सूत्रासहि हे क्षेत्र समजले नाही. आणखी पुष्कळ युक्तियुक्त अशा मोठ्या ज्ञात्यांनी या क्षेत्रनिर्णयाकरिता आपापली बुद्धी खर्च केली. परंतु हे क्षेत्र असे आहे, अथवा एवढे आहे असे अजूनपर्यंत कोणास कळले नाही. (क्षेत्र = शेत ब्रह्मांडरूपी शेत ------)

हें तत्त्व सर्वसामान्य पुरुषांनाच काय पण जेथे शंकर ब्रह्मादिक देवांना देखील तो तत्त्वविचार गूढच राहिला, तेथे इतरांची कथा काय ? सामान्य लोक हा गूढ असा तत्त्वविचार कसा करणार म्हणून ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या दुसऱ्या चरणांत सांगतात -

**तैसे नव्हे नाम सर्व मार्गां वरिष्ठ । तेथे कांहीं कष्ट न लगती ॥**

तुकाराम महाराज म्हणतात, या तत्त्वांचा विचार फुकट आहे.

**रज्जुसर्पाकार । भासयलें जगडंबर ॥** तु. म. ६६१

**अर्थ :-** आतां मला हा जगदाभास (दिसणारे जगत्) दोरीवर सर्प भासल्याप्रमाणे स्वरूपावर मिथ्या भासत आहे.

परमात्मा एकच सत्य आहे, बाकी सर्व मिथ्या आहे.



**तुका म्हणे तूंचि खरा । येर वाउगा पसारा ॥** तु. म. १८४०

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, देवा तूंच एक खरा आहेस. बाकी तुझ्या व्यतिरिक्त सर्व व्यर्थ मायिक पसारा आहे.

परंतु असा तत्त्वविचार करण्यापैकी हरीचे नाम नाहीं. तें सर्व साधनांपेक्षा श्रेष्ठ आहे. तें घेण्याला काही कष्ट पडत नाहीत.

शारीरिक, वाचिक, बौद्धिक, मानसिक असे नामस्मरणाकरिता कष्ट लागत नाहीत. कित्येक योगी म्हणतात, मनुष्यमात्रांकडून जे नित्य श्वासोश्वासाची सहज क्रिया एकवीस हजार सहाशे वेळा होते; तिचे अखंड अनुसंधान ठेवणे हेच श्रेष्ठ साधन आहे. ह्याच सहज घडणारा जप अखंड करावा. यासच अजपाजप अशी संज्ञा आहे. हेच अभंगाच्या तृतीय चरणांत सांगतात -

**अजपा जपणे उलट प्राणाचा । तेथेंही मनाचा निर्धारू असे ॥**

रात्री व दिवसा मिळून एकवीस हजार सहाशे वेळा सोऽहं सोऽहं असा आपल्या हृदयांत प्राणाच्या वरती जाण्यांत आणि अपानाच्या खाली जाण्यांत होणाऱ्या उभयतांच्या भेटीत सहज जप होत असतो. त्यास अजपाजप असे म्हणतात. परंतु या साधनात सुद्धा मनाचा पक्का निश्चय लागतो. सोऽहं अशी नामाची प्राणावर धारणा म्हणजे कल्पना करावी लागते. त्याप्रमाणे उदक सोडावे लागते. इतके केले तरी ते नामस्मरणावांचून फुकट आहे. म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मी नामस्मरणरूपी वाटेने चालू लागलो. हेच शेवटच्या चरणांत सांगतात -

**ज्ञानदेवा जिणें नामेवीण व्यर्थ । रामकृष्णीं पंथ क्रमियेला ।। ४ ।।**

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरिनामावांचून मला जीवन जगणे व्यर्थ वाटते. म्हणून मी रामकृष्णनामाच्या भजनमार्गाने चालतो म्हणजे निरंतर हरीचे भजन करीत आहे. **रामकृष्णी पंथ क्रमियेला ।**

आम्ही हा पंथ क्रमियेला - केला. तो कोणता तर नामस्मरण हा मार्ग श्रेष्ठ असून सरळ आणि सुलभ आहे.

**एक गावें आम्ही विठोबाचें नाम । आणिकांपें काम नाहीं आतां।**
**मोडूनिया वाटा सूक्ष्म दुस्तर । केला राज्यभार चाले ऐसा ।।** तु. म. ८०१

**अर्थ :-** आम्ही एका विठोबाचेच नाम गाऊं, त्यावांचून इतरांशी (इतर देव व इतर साधनें) आमचे कांहीं काम नाहीं. सूक्ष्म (न समजण्यासारखा कर्ममार्ग) आणि दुस्तर (उल्लंघन करून जाण्यास कठीण असा योगमार्ग.) असे मार्ग (परमार्थाची साधनें) मोडून टाकून राज्याचे चतुरंग सैन्य चालेल असा सरळ भक्तिरूपी राजमार्ग तयार केला.

**मार्गीं बहुत । याचि गेले साधुसंत ।।** - तु. म. ३३०४

**अर्थ :-** श्रीहरीची वारी व भजनपूजन करणे, ह्याच मार्गाने पुष्कळ साधुसंत गेले आहेत.

**हे वाट गोमटी वैकुंठासी जाता ।**
**रामकृष्ण कथा दिंडी ध्वजा ।। १ ।।** तु. म. ३४७

**अर्थ :-** हातामध्ये वीणा व खांद्यावर पताका घेऊन नामस्मरण व कीर्तन करणे ही वाट वैकुंठास जाण्यास फार चांगली आहे.



**होतो जयजयकार गर्जत अंबर । मातले वैष्णव वीर रे ।**
**तुका म्हणे सोपी केली पायवाट । तरावया भवसागर रे ।।** २४०

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, हरीच्या नामाचा जयजयकार होत आहे. त्यायोगाने आकाश गर्जत आहे. अशाप्रकारे वैष्णव वीर हे भक्तिसुखानें मस्त झाले आहेत. त्यांनी संसारसमुद्रांतून पार होण्याकरिता सोपी अशी पायवाट केली आहे.

**जग चले उस घाट कोन जाय । नहि समजत फिरफिर गोते खाय ।।**
**नहि एक दो सब संसार । जो बुझे सो आगला स्वार ।।** ४३३

**अर्थ :-** ज्या मार्गानें जग जात आहे त्या मार्गाने ( संसार = प्रवृत्ति मार्गाने ) असा कोण जाईल ? अविचारी लोक जातात. त्याचा परिणाम काय होईल ? तें कोणी जाणत नसल्यामुळे वारंवार जन्ममृत्युचे गोते खातात असे एक-दोन नाहीं तर सर्व प्राणिमात्र असेच गोते खातात व जो हे जाणतो तो आघाडीचा स्वार ( शूर ) होतो.

म्हणून ज्ञानेश्वर महाराज सर्व जीवप्राणीमात्रांना साध्या, सरळ सोप्या मार्गाचा उपदेश करतात. बाबांनो, तुम्ही मुखाने हरि हरि म्हणा.

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।**
**पुण्याची गणना कोण करी ।।**

**- समाप्त -**

* * *

## * अभंग चोविसावा *

जप तप कर्म क्रिया नेम धर्म ।
सर्वांघटीं राम भावशुद्ध ॥ १ ॥
न सोडी रे भावो टाकी रे संदेहो ।
रामकृष्णीं टाहो नित्य फोडी ॥ २ ॥
जात वित्त गोत कुळ शीळ मात ।
भजे कां त्वरित भावनायुक्त ॥ ३ ॥
ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनी ।
वैकुंठभुवनीं घर केले ॥ ४ ॥

**अर्थ :-** जपतपादि कर्मे व अनेक नियमधर्म ज्या भावनेने हा करतो त्या भावनेपेक्षा सर्व देहांमध्ये एक आत्माराम पाहणें ही भावना शुद्ध आहे. ॥ १ ॥ म्हणून अशा शुद्ध भावनेचा त्याग करू नको या भावनेमध्ये बिघाड आणणाऱ्या सर्व संशयास फेकून दे आणि रामकृष्ण नामाचा सारखा टाहो फोडीत रहा. ॥ २ ॥ जातीच्या, पैशाच्या, गोताच्या, कुळाशीळादि गोष्टींच्या भानगडीत पडूं नकोस. शुद्ध भावनेने युक्त होऊन त्वरेने हरीला भज. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझ्या ध्यानांत, मनांत नेहमी रामकृष्णाची वस्ती आहे. त्यामुळे वैकुंठ लोकामध्ये माझी वस्ती झाली आहे. ॥ ४ ॥

**जप तप कर्म क्रिया नेम धर्म । सर्वांघटी राम भावशुद्ध ॥ १ ॥**

**विवरण :-** मागील दोन तीन अभंगातून इतर अनेक साधनेपेक्षा नामस्मरणरूपी साधन सोपे कसे आहे, तें सांगितले. आतां या अभंगात जपतपादि कर्मे व अनेक नेमधर्म ज्या भावनेने हा करतो त्या भावनेपेक्षा सर्व देहामध्ये एका आत्मारामालाच पाहणे ही भावना शुद्ध आहे असे सांगितले आहे.





**जप :-** गायत्री जप वगैरे अनेक प्रकारचे जप आहेत. स्नान झाल्यावर जपू नयेत, जेवण झाल्यावर जपू नयेत असेहि पुष्कळ जप आहेत.

**तप :-** कृच्छ्रांद्रायणव्रत - पहिले दिवशी एकवार भोजन करणे, दुसरे दिवशी नक्त भोजन (= रात्री भोजन करणे,) तिसरे दिवशी न मागता प्राप्त होईल तें खाणे आणि चवथे दिवशी उपोषण, याप्रमाणे बारा दिवस करण्याचे हे व्रत म्हणजे कृच्छ्र व्रत होय.

**चांद्रायण व्रत :-** पौर्णिमेस पंधरा घास खाणे व नंतर वद्य पक्षांत एक-एक घास कमी कमी करून अमावस्येपर्यंत व नंतर शुक्ल पक्षांत रोज एक एक घास वाढविणे. अशाप्रकारचे व्रत करणे, याला चांद्रायण व्रत म्हणतात. (म्हणजेच चंद्राच्या कलेप्रमाणे)

**कर्म :-** कर्म नित्य आणि नैमित्तिक असे दोन प्रकारचे असते. या सर्वांच्या बुडाशी मुख्य भाव पाहिजे. तो नसेल तर सर्व व्यर्थ होते. कर्म स्वभावतः जड आहे. त्यापासून योग्य प्राप्ती होण्यासाठी भाव आणि नामस्मरण याची जोड पाहिजे.

म्हणून ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या पहिल्या चरणातून जप, तप, क्रिया-कर्मादिकांचे फल सांगतात -

**जप तप कर्म क्रिया नेम धर्म । सर्वांघटी राम भावशुद्ध ॥ १ ॥**

सर्वांघटी म्हणजे सर्व देहांमध्ये आत्मारामालाच पाहणे, ही भावना शुद्ध आहे. अशा शुद्ध भावाची प्रतिती येणे हेच जपतपादि सर्व साधनांचे श्रेष्ठ फल आहे. म्हणून या शुद्ध भावनेत सर्वांचे पर्यावसान झाले पाहिजे.

जप, तप, कर्म, क्रिया, नेम, धर्म इत्यादिकांचे आचरण करणारे अनेक लोक आहेत. पण त्यांच्या त्या साधनांचे शुद्ध भावनेत पर्यावसान

झालेले नसते. त्याची कारणे ही आहेत कीं कर्त्याच्या ठिकाणी कर्तृत्वमद व फलासक्ती हें दोष असतात.

भगवत्‌भावनेने त्या कर्माचे आचरण होत नाही. अज्ञानी जनांची हीच प्रवृत्ती असते. भगवंत अर्जुनाला सांगतात -

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**
**न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ।।** गी. ९-२४

**अर्थ :-** कारण, सर्व यज्ञांचा मीच भोक्ता आणि स्वामी आहे. पण तें (लोक) मला यथार्थ रूपाने जाणत नाहीत. म्हणून घसरतात.

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ।।** गी. १७-२८

**अर्थ :-** हे पार्था, अश्रद्धेने केलेले हवन, दिलेले दान, आचरलेले तप व केलेले कर्म जे असेल त्याला असत् असे म्हणतात. मरण पावल्यावर (म्हणजे परलोकी) त्याचे फल नाहीं व इहलोकीहि नाहीं.

कर्म मार्गामध्ये श्रद्धा नसेल तर उपयोग नाहीं. अंतःकरण व कर्मेंद्रियें यांच्या एकीकरणाशिवाय योग्य कर्म होणार नाहीं.

**ना सांडूनि हे सोये । मोडोनि श्रद्धेची बाहे । दुराग्रहाची त्राये । वाढऊनियां ।। मग अश्वमेध कोडी कीजे । रत्ने भरोनि पृथ्वी दीजे । एकांगुष्ठीही तपिजें । तपसाहर्स्री ।। जळाशयाचेनि नांवें । समुद्र कीजती नवे । परी किंबहुना आघवें । वृथाचि तें ।। खडकावरी वर्षलें । जैसे भस्मीं हवन केलें । कां खेंव दिधले । साउलिये ।। नातरी चडकणा । गगन हाणितलें अर्जुना । तैसा समारंभु सुणा । गेलाचि तो ।। घाणा गाळिले गुंडे । तेथ तेल ना पेंडी जोडे । तैसें दरिद्र तेवढें । ठेलेंचि आंगीं ।। गांठी बांधली खापरी । येथें**



**अथवा पैलतीरीं । न सरोनि जैसे मारी । उपवासीं गा ।। तैसे कर्मजातें तेणें । नाहीं ऐहिकीचें भोगणें । तेथ परत्रु तो कवणें । अपेक्षावा ।। म्हणौनि ब्रह्मनामश्रद्धा । सांडूनि कीजे जो धांदा । हें असो शीणु नुसधा । दृष्टादृष्टीं तो ।।** ज्ञा. १७-४१४,२२

**अर्थ :-** नामाचा हा मार्ग मोडून टाकून, श्रद्धेला आधार नाहीसा करून व दुराग्रहाचे बळ वाढवून मग कोट्यावधी अश्वमेध केले, रत्नांनी भरून पृथ्वी दान दिली. एका अंगठ्यावर उभे राहून हजारो वर्षे तपश्चर्या केली, तलाव म्हणून समुद्र जरी नवे बनविले, परंतु फार काय सांगावे ! तें सर्व व्यर्थच आहे. ज्याप्रमाणे खडकावर पाऊस पडावा, अथवा राखेत जसा होम करावा अथवा सावलीला जसे आलिंगन द्यावे अथवा अर्जुना, आकाशाला चापटीने मारावे, त्याप्रमाणे तो खटाटोप व्यर्थ गेला. घाण्यामध्ये गोटें गाळले असता ज्याप्रमाणे तेल अथवा पेंड कांहींच प्राप्त होत नाहीं, परंतु स्वतःस दारिद्य तेवढे राहतेच. पदरांत बांधलेली खापरखुंटी नदीच्या अलीकडच्या तीरावरील गांवांत अथवा पलीकडच्या तीरावरील गांवांत (पैसा म्हणून) न चालल्याकारणाने उपाशी मारते, त्याप्रमाणे या नामाच्या श्रद्धेशिवाय केलेल्या सर्व कर्मांनी ऐहिकभोग मिळत नाहीत. तेथे परलोकाची कोणी आशा करावी ? म्हणून ब्रह्मनामावरील श्रद्धा सोडून जो खटाटोप करावयाचा तो राहू दे. कारण तो इहपरलोकी नुसता शीण आहे. श्रद्धा नसलेले कर्म फुकट आहे.

**साधनें घालिती काळाचिये मुखीं । गर्भवास सेखी न चुकती ।** ५१९

**अर्थ :-** ह्याहून इतर साधनांचा आश्रय केल्याने ती अखेरीस तुला काळाच्या तोंडी नेऊन टाकतील, तसे झाल्याने पुन्हा जन्म घेणे चुकणार नाही. योग्य ज्ञान भावना असेल तर त्यापासून मोक्ष प्राप्त होईल. शास्त्रकारांनी विनियोग सांगितला आहे.

**ब्रह्मार्पणं ब्रह्महविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥** गी-४-२४

**अर्थ :-** कर्मच ब्रह्म आहे अशी समता ज्याची आहे असा पुरुष जे अर्पण करतो ते ब्रह्म, ज्याची आहुति देतो तें ब्रह्म, ज्या अग्नीत आहुती देतो तें ब्रह्म, स्वतः आहुति देणाराहि ब्रह्म व ज्याप्रत जाणार तेहि ब्रह्म. (अशी त्याची स्थिति असते.) उदा. जेवणापूर्वी आपण ताटाला उदक फिरवितो. संकल्प सोडतो आणि तोंडाने वरील श्लोक म्हणतो पण मनाने मात्र मी केले असे समजतो. सर्वठिकाणी परमात्मा आहे, असा दृढभाव पाहिजे. नुसते ज्ञान कांहीं करूं शकत नाहीं.

**सर्वभूतीं भगवत्दृष्टी । हेचि भांडवल माझे गांठीं । येणें भांडवलें कल्पकोटी । करोनि सृष्टीं मीं अकर्ता ॥ मज पाहतां निजात्मपुष्टी । सर्वभूतीं भगवत्दृष्टी । हेचि भक्ति माझी गोमटी । ब्रह्मांडकोटी तारक ॥ हेचि भक्ति म्यां कल्पादी । सर्वभूतीं भगद्बुध्दि । नाभिकमळीं त्रिशुन्द्धी । ब्रह्मा या विधी उपदेशिला ॥ व्रत तप करितां दान । योगयाग करितां ध्यान । वेदशास्त्रार्थे साधितां ज्ञान । माझ्या भक्तीसमान ते नव्हती ॥ नाना साधनांचिया कोटीं । साधकीं साधितां आटाटी । माझ्या प्रेमाची नातुडे गोठी । मद्भक्तभेटीवांचूनि ॥** ए. भा. २९-३६८, ७२

**अर्थ :-** सर्व प्राणिमात्रांना भगवत्दृष्टीने पाहणे हेच काय तें माझ्या गाठीला आहे आणि ह्याच भांडवलावर कोट्यावधी सृष्टी करूनहि मी अकर्ताच राहतो. आत्मदृष्टीने मजकडे पाहिले असता सर्वभूती भगवत्दृष्टी ठेवणे हीच माझी सुंदर भक्ति आहे व ती कोट्यावधी ब्रह्मांडांना तारणारी आहे. सर्वभूतीं भगवत्भावना धरणे हीच भक्ति मी कल्पारंभाच्या वेळी नाभिकमळातून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवाला उपदेशरूपाने सांगितली. व्रत, तप, दान केले किंवा योगयाग ध्यान केले अथवा वेदशास्त्रार्थाचें



ज्ञान मिळविले, तरी ती माझ्या भक्तीच्या बरोबरीला लागावयाची नाहीत. साधकांनी मोठ्या अट्टाहासाने नानाप्रकारची कोट्यावधी साधनें जरी केली, तरी माझ्या भक्ताच्या भेटीशिवाय माझ्या प्रेमाची वार्ता त्यांना मिळावयाची नाहीं.

**मी एक परमात्मा सर्वभूतीं । न देखे द्वैताची प्रतिती ।**
**ऐशी ज्याची भजनस्थिती । एकान्तभक्ती त्या नांव ॥** ए.भा.२०-४१९

**अर्थ :-** सर्व प्राणिमात्रांमध्ये एक मीच परमात्मा भरलेला आहे अशी त्याची दृष्टी झाल्यामुळे द्वैताची प्रतिती त्याला दिसतच नाही. अशी ज्याची भजनस्थिती असते तिलाच 'एकान्तभक्ति' असे म्हणतात.

नाथ महाराज म्हणतात, सर्व भूतांत परमात्मा पाहणाऱ्याचे ठिकाणी स्वतः विषयीचा अहंकार जातो. बरोबरच्याशी स्पर्धा, उत्तम विषयी असूया (मत्सर, द्वेष) हीनांचा तिरस्कार हें दोष सत्त्वर निश्चयाने निघून जातात.

**सर्वभूतीं भगवद्भजन । ऐसें ज्यासी अखंड साधन । त्या नराचा देहाभिमान । क्षणार्धे जाण स्वयें जाये ॥ जातां देहींचा अहंकार । निघे सकुटुंब सपरिवार । स्पर्धा असूया तिरस्कार । येणेंसीं सत्वर समूळ निघे ॥** ए. भा. २९, ३२१, २२

**अर्थ :-** सर्व प्राणीमात्रांमध्ये भगवत्भावना करणे हेच ज्याचे अखंड साधन त्या पुरुषाचा देहाभिमान क्षणार्धांत आपोआप निघून जातो तो अहंकार निघून जात असता तो स्पर्धा, असूया, तिरस्कार ह्या आपल्या कुटुंबसहवर्तमान समूळ बाहेर पडतो.

**जिकडे पाहे तिकडे देव । ऐसा भाव दे कांहीं ॥ १ ॥**
**काय केलो एकदेशी । गुणदोषीं संपन्न ॥ २ ॥ पडे तेथें तुझ्या पायां । करी वायां नवजेसें ॥ ३ ॥ तुका म्हणे विषमें सारी । ठाणें धरी जीवासी ॥ ४ ॥** तु. म. ११५६

अर्थ : मी जिकडे दृष्टी भरून पाहीन तिकडे मला देवच दृष्टीस पडावा. देवा तुम्ही काहीतरी असा भाव मला द्या. मी अनेक प्रकारच्या गुणदोषांनी संपन्न झाल्यामुळे मला एकदेशीपणा आला आहे, ह्यापासून काय उपयोग आहे ? मी ज्या ठिकाणी मस्तक ठेवीन त्यावेळी त्या ठिकाणी ते मस्तक तुमच्या पायावरच असावे. त्यावांचून मी वाया जाईन, असे तुम्ही करूं नका. तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जीवाशी = (अंतःकरणातील भूतमात्रांविषयीचा) विषम भाव नाहीसा करून त्या ठिकाणी तुम्ही (ठाणे =) वास्तव्य करा.

**जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ।**
**हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥** ज्ञा. १०-११८

**अर्थ :-** जो जो प्राणी दिसेल तो तो प्रत्यक्ष परमात्मा आहे असे समजावे. हाच माझा भक्तियोग आहे, हे निश्चित समज.

**सर्वांभूतीं पाहे एक वासुदेव । पुसोनिया ठाव अहंतेचा । तोचि साधुसंत ओळखावा निका । येर तें आईका मायाबद्ध ॥** ना. म.

**विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेदभ्रम अमंगळ ॥**
**आइका जी तुम्ही भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥**
**कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचें ॥**
**तुका म्हणे एका देहाचे अवयव । सुख दुःख जीव भोग पावे ॥**
तु. म.३८६८

**अर्थ :-** सर्व जगत् विष्णुमय जाणणे हाच वैष्णवांचा खरा निश्चयात्मक धर्म आहे. भेदाभेद मत विचार हा केवळ अमंगळ भ्रम आहे. अहो तुम्ही भागवत भक्तहो, ऐका आणि जे हित करावयाचे असेल तर तें खरे करा. कोणत्याहि जीवाचा मत्सर करू नये हेच सर्वेश्वर पूजनाचे



वर्म आहे. तुकाराम महाराज म्हणतात, ज्ञानेंद्रिये कर्मेंद्रियें हे सर्व एकाच देहाचे अवयव आहेत आणि त्यांनी सेवन केलेल्या विषयाचे सुख-दुःख भोगणारा अंतर्यामी एक जीवच आहे.

सर्व प्राणिमात्रांमध्ये भगवत्भाव ठेवा. तो आतां सोडू नका हेच दुसऱ्या चरणांत सांगतात -

**न सोडी रे भावो टाकी रे संदेहो । रामकृष्णी टाहो नित्य फोडी ॥**

तुकाराम महाराज म्हणतात, मी माझ्या सर्व संसाराचा त्याग केला.
**पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसोनि संदेह बुद्धिभेद ॥** ४०२४

**अर्थ :-** माझ्या बुद्धीत असणारा, जीवेश्वरातील भेद व प्रमाणप्रमेय संशय याचे निराकरण करून पांडुरंगाने माझ्यावर खरा अनुग्रह केला आहे.

संशय टाकून शुद्ध भावाने रामकृष्ण नामाचा सतत टाहो फोड, म्हणजे अट्टाहासाने नामस्मरण कर. धर्म-अधर्म न कळणाऱ्या जीवांना तुकाराम महाराज उपदेश करतात -

**कळे न कळे ज्या धर्म । ऐका सांगतो रे वर्म ।**
**माझ्या विठाबाचे नाम । अट्टाहासे उच्चारा ॥** तु. म. २४६०

अर्थ :- अरे, ज्यांना धर्म कळेल अथवा कळत नसेल, असे जे कोणी असतील त्यांना मी एक मार्मिक वर्म सांगत आहे, तें तुम्ही ऐका. माझ्या विठोबाच्या नामाचा जोरजोराने उच्चार करा.

**होतो जयजयकार गर्जत अंबर । मातले वैष्णव वीर रे ॥** तु. म. २४०
**हाका आरोळिया गीत वाद्य सुखसोहळे ।**
**जाय ते न कळे केव्हां रजनीं दिवस ॥** तु. म.२१८६

**अर्थ :-** तें मोठ्याने आरोळ्या फोडून देवास हाका मारतात आणि नाना प्रकारची वाद्यें वाजवून त्याचेच गाणे गातात. अशा सुखसोहळ्यांत

तें असल्यामुळे दिवस अथवा रात्र केव्हां गेली, हे त्यांना समजत नाहीं.

**गर्जत जावी नामावळी । प्रेमें टाळी वाहोनि ॥**
**येणें सुखें पुढती धांवे । भेटी सर्वे गोपाळ ॥** तु. म. २४८६

**अर्थ :-** प्रेमाने टाळी वाजवून मुखाने हरीचे नाम मोठ्याने गर्जत जावे. त्या सुखाने प्रत्यक्ष गोपाळ हा भेटण्याकरिता सामोरा येतो.

**उठाउठीं करी स्मरणाचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥** ३६७२

**अर्थ :-** म्हणून तुम्ही त्वरेने हरीचे स्मरण करा. तसे केल्याने तुम्हाला भेट देण्याकरिता भगवंत धावा करतो. या भेटीबाबत देवाला दम धरवत नाहीं. हा एवढा अट्टाहास करणे, टाहो फोडणे कशाकरिता तर परमात्म्याच्या ठिकाणी वृत्ती स्थिर राहण्याकरिता.

भगवन्नामाकरिता जात, गोत, कुळ, धन, संपत्ती या कुठल्याहि गोष्टीची गरज नाहीं, म्हणून तात्काळ तूं भक्तियुक्त अंतःकरणाने भजन कर हेच तिसऱ्या चरणांत सांगतात.

**जात वित्त गोत कुळ शीळ मात । भजे कां त्वरित भावनायुक्त ॥**

**अगा कुळाचिया चोखटपणा नलगा । अभिजात्य झणीं श्लाघा । व्युत्पत्तीचा वाउगा । सोसु कां वाहावा ॥ कां रूपे वयसा माजा । आथिलेपणे कां गाजा । एक भाव नाहीं माझा । तरी पाल्हाळ तें ॥ कणेंविण सोपटें । कणसें लागलीं आथि एक दाटें । काय करावें गोमटें । वोस नगर ॥ नातरी सरोवर आटलें । रानी दुःखिया दुःखी भेटलें । कां वांझ फुली फुललें । झाड जैसें ॥**
ज्ञा. ९-४३१, ३४

**अर्थ :-** अरे, आमचे कुळ शुद्ध आहे या अभिमानांत राहूं नका, तसेंच आमचे कुल श्रेष्ठ आहे असा कदाचित आनंद मानाल, तर



मानूं नका व शास्त्राध्ययनाची पोकळ हांव कां बाळगावी ? उत्तम सुस्वरूपाने व तारुण्याने मस्त कां व्हावे ? संपन्नपणाचा डौल कशाला मिरवावा? कारण माझ्याविषयी एक भक्ति जर नसेल तर हा सारा पसारा व्यर्थ आहे. धान्या वांचून पिशा असलेली कणसें दाट एकसारखी आली तरी त्यांचा काय उपयोग ? शहर चांगले आहे, परंतु त्यात वस्ती नाहीं तर त्याचा काय उपयोग ? अथवा सरोवरातील पाणी आटावे किंवा रानामध्ये एका दुःखी मनुष्याची दुसऱ्या दुःखी मनुष्याशी गांठ पडावी; अथवा एखाद्या झाडाला वांझ फुलांचा बहर यावा. कर्णाचे उद्गार आहेत. मनुष्य जन्माच्या कुळावरून तरत नसून कर्मामुळे तरतो.

**दैवायत्तं कुले जन्म मदायत्ते तु पौरुषम्** - महाभारत

देव अंतरातला भाव किंवा श्रद्धा पाहतो असे तुकाराम महाराज म्हणतात -

**अंतरीची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥**
**देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥** तु. म.३६८५

**अर्थ :-** देव हा आपणाविषयीच्या भक्तांच्या अंतःकरणांत असणाऱ्या गोडीचे ग्रहण करतो आणि आपणाविषयी त्यांच्या अंतःकरणांत भक्तिप्रेमाची जोड किती आहे हे पाहतो. खरोखर देव हा एकच दीनांचा खरा दयाळ आप्त आहे (असे त्रिवार सांगतात).

**नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु ।**
**हा आकारासीच प्रवादु । वस्तूसि नाहीं ॥** ज्ञा.१३-९०४

**अर्थ :-** नाम, रूप, संबंध, जाति, क्रिया व भेद या सर्व आकारासंबंधी बोलणे आहे. वस्तूला हे बोलणे नाहीं.

**ठायींच बैसोन करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥** २४४९

अर्थ :- एका ठिकाणीं बसून व एकचित्त करून मोठ्या प्रितीने अनंतास आळवावे. (ठायीच =) परमात्मा आपल्या जवळच आहे. तो आपणास तारणार आहे अशी पूर्ण श्रद्धा पाहिजे नाहीतर श्रद्धा नसली तर उपयोग नाही.

मोले घातले रडाया । नाहीं असूं आणि माया ॥ तु. म. २८७४

अर्थ :- पैसे देऊन रडावयास लावलेल्या मजूर माणसास अश्रू येत नाहीं व त्याच्या हृदयांत मायाहि नसते.

म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. असे आमचे नाहीं. माझ्या ध्यानीमनी रामकृष्ण असल्यामुळे वैकुंठरूप परमात्मा हेच माझे घर झाले आहे.

ज्ञानदेवा ध्यानी रामकृष्ण मनी । वैकुंठभुवनी घर केले ॥ ४ ॥
ब्रह्मपुरी वास करणे अखंड । न देखिजे तोंड विटाळाचें ॥ ६६५

अर्थ :- आतां आम्ही परब्रह्मरूप गांवामध्ये अखंड वस्ती करत आहोत. तेथे प्रपंचरूपी (अज्ञानरूपी) विटाळाचे तोंड पाहिले जात नाहीं.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझ्या ध्यानीमनी रामकृष्ण असल्यामुळे चिदानंद हेच माझे घर झाले आहे.

अनंत भक्तराशी तरले वानर । ज्ञानदेवा घर चिदानंदी ॥ ज्ञा. म.

सत्, चित् व आंदरूप आत्मा तेच माझे घर झाले आहे, अशी स्थिति सर्वांना प्राप्त होण्याकरिता ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥

- समाप्त -

## अभंग पंचविसावा

जाणीव नेणीव भगवंती नाहीं ।
उच्चारणी पाहीं मोक्ष सदा ॥ १ ॥
नारायण हरि उच्चार नामाचा ।
तेथें कळिकाळाचा रीघ नाहीं ॥ २ ॥
तेथील प्रमाण नेणवे वेदांसी ।
तें जीवजंतूसी केवी कळे ॥ ३ ॥
ज्ञानदेवा फळ नारायण पाठ ।
सर्वत्र वैकुंठ केलें असें !! ४ !!

अर्थ :- भक्त ज्ञानी आहे किंवा अज्ञानी आहे, हे भगवंत पहात नाहीं. नामस्मरणामुळे दोघांनाहि सारखीच मुक्ति मिळते. ॥ १ ॥ नारायण हरि या नामाचा उच्चार करणाऱ्याकडे कळिकाळाचा प्रवेश होत नाहीं. ॥ २ ॥ हरीच्या यथार्थ स्वरूपाचा विचार वेदांनाहि कळत नाही, मग तें स्वरूप सामान्य जीवांना कसे कळेल ? ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरीच्या नामस्मरणाने सर्व ठिकाणी वैकुंठच आहे, असा अनुभव आणून दिला आहे. ॥ ४ ॥

विवरण :

जाणीव नेणीव भगवंती नाहीं । उच्चारणी पाहीं मोक्ष सदा ॥

भगवन्नाम सोपे आहे तें उच्चारण करणारा मोठा पंडितच पाहिजे किंवा मूर्खच असला पाहिजे असा कांहीं नियम नाहीं. ज्ञानाकरिता मात्र बुद्धि तीक्ष्ण असली पाहिजे, त्याशिवाय अनुभव येणार नाही. ज्ञान उत्पन्न होण्यास तीन प्रतिबंध असतात.
१) वर्तमान प्रतिबंध २) भूत प्रतिबंध ३) भावी प्रतिबंध. हे तिन्ही प्रतिबंध गेल्याशिवाय ज्ञान प्राप्त होणार नाहीं.

**नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां हें सिद्ध ।**
**जंव हा आत्मबोध नाहीं चित्तीं ॥** तु. म. २८०३

**अर्थ :-** जोपर्यंत चित्तामध्ये आत्मबोध दृढ झाला नाहीं, तोपर्यंत ब्रह्मज्ञानाचे कितीहि प्रतिपादन केले तरी ते सिद्ध होत नाहीं.

**ब्रह्मज्ञान जरी कळे उठाउठी । तरि का हिंपुटीं वेदशास्त्रें ॥** २२४४

**अर्थ :-** जर ब्रह्मज्ञान उभाउभी (त्वरीत) समजले असते तर मग वेदशास्त्रें कष्टी कां झाली असती ?

ज्ञानमार्गांत फार अडचणीं आहेत. भक्तीमार्गांत सर्वांचा समावेश होतो. उपमन्यु, ध्रुवबाळ हे काय जाणते होते का ?

**इहीच द्वादशाक्षरी ध्रुव अढळपद पावला । प्रल्हाद रक्षिला अग्निशस्त्रापासोनि जळा ॥ बापरखुमादेवीवरु तुम्ही ध्यारे वेळोवेळा । तो कळिकाळापासूनी सोडवील अवलीळा ॥** ज्ञा. म.

म्हणजे याचा अर्थ कोणी कांहीं शिकू नये, असा नाहीं. तात्पर्य, भगवन्नामाने सर्व कांहीं होते.

**काय नव्हे केले । एकां चिंतिता विठ्ठले ॥** तु. म.

**ना तरी मधुवनीं ध्रुवासि केले । जैसें कपोल शंखें शिवतले । आणि वेदांचिये मती ठेले । लागला बोलो ॥** ज्ञा.११-१८४

**अर्थ :-** (तपश्चर्या करीत असतांना ध्रुवाच्या पुढे भगवान प्रगट झाल्यावर मनांत भगवंताची स्तुति करावी असे आले, पण ती कशी करावी हे कळेना.) तेव्हां मधुवनामध्ये भगवंतानी आपला शंख त्याच्या गालाला लावल्याबरोबर तो वेदापेक्षाहि जास्त बोलू लागला.

**तुज करितां होते ऐसे । मूढ चतुर पंडित पिसे ॥** तु. म. ३७७४



अर्थ :- देवा, तूं जर करण्याचे मनांत आणलेस तर हे जेवढे मूढजण आहेत, तें मोठे चतुर व जेवढे वेडे आहेत तें पंडित होतील. भगवंताच्या ठिकाणीं आपल्याला शरण येण्यास हा भक्त जाणता आहे किंवा नेणता आहे, अशा प्रकारची चिकित्सा नाहीं, हेच ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या प्रथम चरणांत सांगतात -

**जाणीव नेणीव भगवंतीं नाहीं । उच्चारणीं पाहीं मोक्ष सदा ॥**

भक्त ज्ञानी आहे किंवा अज्ञानी आहे, हे भगवंत पहात नाहीं. नामस्मरणामुळे ह्या दोघांनाहि (ज्ञानी-अज्ञानी दोन्ही भक्तांना) सारखीच मुक्ति मिळते. उदा.- नावाडी नावेत येणाऱ्यास, याला पोहता येते किंवा नाहीं याचा विचार करीत नाहीं. कारण नाव सर्वांना तारुन नेण्यास समर्थ आहे. त्याप्रमाणे भगवन्नाम घेणाऱ्या सर्वांना सारखीच मुक्ति मिळते.

**नामाचिया सहस्रवरीं । नावां इया अवधारी ।**
**सजूनिया संसारीं । तारू जाहलो ॥** ज्ञा. १२-९०

**अर्थ :-** माझी हजारो नांवें ह्याच कोणी नावा, त्या तयार करून संसारसागरातून भक्तांना तारणारा मी नावाडी झालो असे समज.

**जी आपणपयाते तूंचि जाणसी । आणिकातें सांगावयाही तूंचि समर्थ होसी । तरी आतां एकवेळ घाम पूसीं । आर्तीचिये निडळींचा ॥** ज्ञा. १०-१८०

**अर्थ :-** अरे देवा, तूं आपल्या स्वरूपाला तूंच जाणतोस आणि तें ज्ञान दुसऱ्यास सांगण्यास तूंच समर्थ आहेस. तर आता एक केवळ माझ्या इच्छारूपी कपाळावरील घाम पुसून टाक.

**कैवल्य कनकाचिया दाना । जो न कडसी थोर साना ।**
**द्रष्ट्याचिया दर्शना । पाढाऊ जो ॥** अमृ. २-५

अर्थ :- ज्या सद्गुरु ठिकाणी कैवल्यरूपी कनकाच्या दानाला हा लहान हा मोठा असा भेद न करता, द्रष्टा जो आत्मा त्याच्या ज्ञानाचे दर्शन करून देणारे दर्शक म्हणजे हे वाटाडे आहेत.

कोणकोणत्या भावनेने भक्त येतो हे अंतर देव पाहतो असे तुकाराम महाराज म्हणतात.

**अंतरीची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥** तु. म. ३६८५

अर्थ :- देव हा आपणाविषयी भक्ताच्या अंतःकरणांत असणाऱ्या गोडीचे ग्रहण करतो आणि आपणाविषयी त्यांच्या अंतःकरणात भक्तिप्रेमाची जोडी किती आहे तें पाहतो.

**तस्य अभिमानद्वेषित्वात् दैन्यं प्रियत्वात् ॥** नारदभक्तिसूत्र

**यालागीं शरीरसांडोवा कीजे । सकळगुणांचें लोण उतरिजे। संपत्तीमदु सांडिजे । कुरवंडी करूनि ॥ मग निस्सीमभावउल्हासें। मज अर्पावयाचेनि मिसें । फळ आवडे तैसे । भलतयाचे हो ॥** ज्ञा. ९-३८१, ३८२

अर्थ :- याकरितां परमात्म्यावरून आपले शरीर ओवाळून टाकावे आणि आपल्या अंगीं असलेल्या सर्व गुणांचें निंबलोण करावे; तसेच संपत्तीचा फुंज ओवाळून टाकून द्यावा. मग अमर्याद भक्तीच्या उत्कर्षाने मला अर्पण करण्याच्या निमित्ताने एखादे फळ वाटेल तसले कोणत्याहि झाडाचे कां असेना.

अशा प्रकारे जो भगवंताचे नाम घेतो त्याला मोक्ष प्राप्त होतो असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात - ''हरिउच्चारणी पाही मोक्ष सदा।''

**मुखी नाम हाती मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांची ।** तु. म. २५३४

अर्थ :- श्रीहरीच्या नामाची मुखांत उत्तम बैठक झाल्याबरोबर मोक्ष



हस्तगत होतो, असा अनेकांचा अनुभव आहे व त्यांनी तो सांगितला आहे. उदा. वाल्हाकोळी, अजामेळ, गणिका इत्यादि.

नारायण हरि या नामाचा उच्चार करणाऱ्याकडे कळिकाळाचा प्रवेश होत नाहीं, हेच अभंगाच्या द्वितीय चरणांत सांगितले आहे.

**नारायण हरि उच्चार नामाचा । तेथे कळिकाळाचा रीघ नाहीं ॥**

असाच विचार यापूर्वीहि हरिपाठात श्री संत ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितला आहे.

**नित्यसत्यमित हरिपाठ ज्यासी । कळिकाळ त्यासी न पाहे दृष्टी ॥**

अर्थ :- हरीचा नित्य, सत्य व अपरिमित जप करणाऱ्याकडे कळिकाळ दृष्टीने देखील पहात नाही.

तसेच संतांच्या नामाचा उच्चार केल्यानेहि काळ थरथरा कापतो असे रामेश्वर भट्ट म्हणतात.

**तुकाराम तुकाराम । नाम घेता कांपे यम ॥** रामेश्वर भट्ट

अर्थ :- तुकाराम, तुकाराम असे नाम घेतले असता यम थरथरा कापतो.

**अंडज जारज स्वदेज उद्भिज आटे । हरिनाम नाटे तें बरवे ॥ १ ॥ जे नाटे तें नाम चित्तीं । रखुमादेवीपती श्रीविठ्ठलाचे ॥ २ ॥ शरीर आटे संपत्ती आटे। हरिनाम नाटे तें बरवे ॥ ३ ॥ बापरखुमादेवीवराचे नाम नाटे । युगे गेली परी उभा विटें ॥ ४ ॥** ज्ञा. म.

याप्रमाणें भगवंताचे नाम न आटणारे आहे कारण नाम-नामीचा अभेद आहे.

**अवघाची आकार ग्रासियेला काळें ।**
**एकचि निराळें हरीचें नाम ॥** तु. म. ३९१४

अर्थ :- जेवढा म्हणून जगताचा आकार आहे, तेवढा सर्व काळानें ग्रासला आहे. एक हरीचे नाम तेवढे वेगळे आहे.

**नको कांहीं पडो ग्रंथाचिये भरी । शीघ्रवत करीं हेचि एक ॥ १ ॥**
**देवाचिये चाडे आळवावे देवा । ओस देहभावा पाडोनिया ॥ २ ॥**
**साधनें घालिती काळाचिये मुखीं । गर्भवास सेखीं न चुकती ॥ ३ ॥**
तु. म. ५११

**अर्थ :-** (एका धरणेकरी ब्राह्मणांस तुकोबाराय उपदेश करतात) तूं ग्रंथांचे अध्ययन करण्याच्या भरी पडू नकोस, त्वरेने हेच एक कर. देवाचीच इच्छा धरून व देहभावास ओस पाडून (देह अहंकार टाकून) देवाचेच भजन कर. त्याहून इतर साधनांचा आश्रय केल्याने तें अखेरीस तुला काळाच्या तोंडी नेऊन टाकतील तसे झाल्याने पुन्हा जन्म घेणे चुकणार नाहीं.

हरीच्या यथार्थ स्वरूपाचा विचार वेदांनाहि कळत नाहीं. मग तें स्वरूप सामान्य जीवांना कसे कळेल ? हेच अभंगाच्या तिसऱ्या चरणांत सांगतात

**तेथील प्रमाण नेणवे वेदांसी । तें जीव जंतूसी केवी कळे ॥ ३ ॥**

परमात्म्याचे स्वरूप वेदाला कळले नाहीं म्हणून त्याची शकले झाली म्हणजेच विभागणी झाली.

**तूंते सिद्धचि जो नेणे । तो नांदे सर्वज्ञपणें ।**
**वेदांही एवढें बोलणें । नेघसी कानीं ॥** ज्ञा. १७-१४

**अर्थ :-** जो तुला सिद्धच (कृतीने प्राप्त होण्याचा नव्हे) असा जाणत नाहीं म्हणून शब्दादि साधनांनी तुझे आकलन करण्याचा प्रयत्न करतो तोच सर्व जाणणारा म्हणून मिरवतो. त्या शब्दज्ञान्याच्या शब्दरूप साधनानें (हे श्रीगुरो) तुमची सिद्धी कशी होणार ? कारण सर्वज्ञ म्हणून गाजलेल्या शब्दराशीरूप वेदाने केलेले आपले वर्णन जेथे आपल्या कानापर्यंत येण्याची पंचाईत पडते तेथे त्या शब्दज्ञानाचा काय पाड ?



**म्हणोनि तेथिची मातु । न चढेचि बोलाचा हातु ।**
**जेणें संवादाचिया गांवाआंतु । पैठी कीजे ॥** ज्ञा. ६-३११

**अर्थ :-** म्हणून त्या स्थितीचे वर्णन शब्दांनी सांगताच येत नाहीं आणि शब्दांना सांगता येईल तेव्हाच ती गोष्ट संवादाच्या गांवांत स्थापित करता येईल. (अर्थात् शब्दांनीच सांगता येत नाहीं तर तीजविषयी संवादहि होणे शक्य नाहीं.)

**वेद जाणो गेला पुढे मौनावला । तें गुह्य तुजला प्राप्त कैचे ॥**

**अर्थ :-** वेद हा हरीचे स्वरूप जाणण्याकरिता पुढे सरसावला, परंतु शेवटी त्याला सुद्धा स्तब्ध बसावे लागले, असे जे गूढ (ते तुला स्वतःच्या प्रयत्नाने) कसे प्राप्त होणार ?

उदा. एकदा सर्व उंदरांची सभा भरलो. त्या सभेत असा ठराव मंजूर झाला कीं आपली लोकसंख्या कमी कां होते तर बोकोबा येतो व आपल्या लोकांना खातो. म्हणून बोकोबा आपल्याकडे केव्हां येतो हे समजण्याकरिता त्याच्या गळ्यात घंटा बांधावी ठरल्याप्रमाणे एक उंदीर घंटा बांधण्याकरिता गेला पण त्याला बोकोबांनी खाऊन टाकले. म्हणजे तो बोकारूपच झाला. तद्रूप झाला. तात्पर्य, तसा तो देवाला जाणण्याकरिता जाईल तो तद्रूपच होऊन जाईल म्हणजे देवरूपच होईल.

**देव पहावया गेलो । देवचि होऊनि ठेलो ॥** तु. म.
**कां लवणाची कुंजरी ।सूदलिया लवणसागरीं ।**
**होयचि ना माघारी । परती जैसी ॥** ज्ञा. अ. १५-३१८

**अर्थ :-** मिठाची हत्तीन ज्याप्रमाणे खाऱ्या समुद्रांत घातली असता ती जशी परत माघारी येत नाहीं, त्याप्रमाणे देवाला जाणायला गेलेला जीव परत येत नाहीं.

त्याप्रमाणे ऋषी-मुनी या भगवंताला जाणतात आणि ते जाणणे

रूपच होतात म्हणजे तद्रूपच होऊन जातात.

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।**
**आश्चर्यवच्चैनमन्यः श्रृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥** २-२९

अर्थ :- कोणी (एखादा) या आत्म्याला आश्चर्याप्रमाणें पाहतो; तसाच (दुसरा) कोणी याविषयी आश्चर्याप्रमाणे बोलतो; आणखी कोणी याविषयी आश्चर्यासारखे ऐकतो (व देहाला विसरतो) पण याप्रमाणे पाहून, वर्णन करून व ऐकूनहि तें आत्मसाक्षात्कार झाला कीं तद्रूप होतात व मग देहतादात्म्यावर येत नाहीत.

**तैसिया योगीश्वरांचिया मती । मिळणीसवें एकवटती ।**
**परी जे विचारूनि पुनरावृत्ति । भजतीचिना ॥** ज्ञा. २-१७६

अर्थ :- त्याप्रमाणे थोर थोर योग्यांच्या बुद्धी आत्मसाक्षात्कार होतात व एकदा तें तद्रूप झाले कीं, विचार करून पुन्हा देहतादात्म्यावर येत नाहीत.

**वेद वानूनि तंव चांग । जंव न दिसे तुझें आंग ।**
**मग आम्हां तया मूग । एक पांती ॥** ज्ञा. १४-११

अर्थ :- जोपर्यंत तुझ्या स्वरूपापर्यंत पोहोचला नाहीं, तो पर्यंतच वेद वर्णन करून प्रतिष्ठेत राहतो, मग तुझ्या स्वरूपाचे वर्णन करण्याचा प्रसंग आला म्हणजे त्याला (वेदाला) व आम्हाला एका पंक्तीला बसून मुग गिळावे लागतात. (मुकाट्याने बसावे लागते.) म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

**तेथील प्रमाण नेणवे वेदांसीं । तें जीवजंतूसी केवी कळे ॥ ३ ॥**

त्याचे वर्णन फक्त 'तन्न, तन्न' हेच आहे (तसे नाहीं, तसे नाहीं) किंवा नेति, नेति (तो असा नाहीं) असेच करता येते. शेवटच्या चरणांत ज्ञानेश्वर महाराज हरिनामाचे फल सांगतात -



**ज्ञानदेवा फळ नारायण पाठ । सर्वत्र वैकुंठ केले असे ॥**

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरीच्या नामस्मरणाने सर्व ठिकाणी वैकुंठच आहे, असा अनुभव आणून दिला आहे हेच हरिपाठाचे फल आहे. भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात -

**कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें ।**
**ऐसें नामघोषगौरवे । धवळलें विश्व ॥** ज्ञा. ९-२०३

अर्थ :- (पूर्वी असे होते कीं) कधी तरी एखाद्याने वैकुंठाला जावे, तें त्यांनी सर्व वैकुंठच केले; याप्रमाणे माझ्या नामघोषाने त्या महात्म्यांनी सर्व विश्व प्रकाशित केले.

**ते न घेती वैकुंठीची वाट । त्याचें घरचि मी करीं वैकुंठ ।**
**तेथें चिन्मात्रे फुटे पाहां । पिके पेंठ संतांची ।** ए. भा. २४-३४४

अर्थ :- असे भक्त कांहीं वैकुंठाच्या वाटेला जात नाहीत. त्यांचे घरच मी वैकुंठ करून सोडतो तेव्हां तेथे ज्ञानाची पहाट फुटते आणि संतांचे समुदाय जमू लागतात. तुकाराम महाराज म्हणतात -

**तुका म्हणे त्यांनी । केली वैकुंठ मेदिनी ॥** तु. म. २२३७

अर्थ :- त्या विष्णुभक्तांनी या भूमीलाच वैकुंठ केले आहे.

**तुका म्हणे त्यांचा जीव तोचि देव । वैकुंठ ठाव वसती ते ॥** तु. म. २२५७

अर्थ :- तुकाराम महाराज म्हणतात, त्यांचा जीव केवळ देवच बनला आहे, म्हणून त्यांचे (ठाव =) वास्तव्य ज्या ठिकाणी आहे तें वैकुंठ समजावे. याच आशयाने ज्ञा. म. म्हणतात - **ज्ञानदेवा फळ नारायण पाठ । सर्वत्र वैकुंठ केले असे ॥ ४ ॥** म्हणून सर्वांनी हरिनामाचा उच्चार वारंवार केला पाहिजे. **हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।**

**- भावार्थ समाप्त -**

**जाणीव नेणीव भगवंती नाहीं । उच्चारणी पाहीं मोक्ष सदा ॥**

**व्याख्यान :** जाणीव नेणीव न पाहणारा मूर्खच असला पाहिजे. मग त्याला सर्वज्ञ परमात्मा कसे म्हणता येईल ? दुराचारी आहे कीं सदाचारी आहे, हें भगवंत एका अंशाने पहात नाहीं व एका अंशाने पाहतोहि.

> **अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
> **साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥** गी. ९-३०

**अर्थ :-** (पूर्वी) अत्यंत दुराचारी असला तरी तो अनन्य भक्त होऊन माझी भक्ति करील, तर तो साधूच मानला पाहिजे कारण त्याची वागणूक आतां चांगली झाली आहे.

> **हरिहरादि समस्तां । देवा तूं परम देवता ।**
> **वेदांतेंही पढवितां । आदिगुरु तूं ॥** ज्ञा. ११-५६२

**अर्थ :-** देवा, विष्णु, शंकर इत्यादि देवातांचा तूं श्रेष्ठ देव आहेस व वेदांनाहि शहाणपणा शिकविणारा मूळ गुरु आहेस.

**गंभीर तूं श्रीरामा । नानाभूतैकसमा । सकळगुणीं अप्रतिमा । अद्वितीया ॥ तुजसी नाहीं सरिसें । हें प्रतिपादनचि कायसें । तुवां जालेनि आकाशें । सामाविलें जग ॥ तया तुझेनि पाडें दुजें । ऐसे बोलतांचि लाजिजे । तेथ अधिकाचि कीजे । गोठी केवीं । म्हणोनि त्रिभुवनीं तूं एकु । तुजसरिसा ना अधिकु । तुझा महिमा अलौकिकु । नेणिजे वानुं ॥** ज्ञा. अ. ११-५६३ ते ५६६

**अर्थ :-** श्रीकृष्णा, तूं फार गंभीर अंतःकरणाचा आहेस व तूं सर्व प्राण्यांत सारखा आहेस. तूं सर्व गुणांमध्ये बिनजोड आहेस व तुझ्या सारखे दुसरे कोणी नाहीं. तुझ्या बरोबरीचे कोणी नाहीं हें सांगावयास कशाला पाहिजे ? तुझ्यापासून झालेल्या आकाशांत सर्व जग सामावले आहे. त्या तुझ्या बरोबरीला दुसरा कांहीं पदार्थ आहे, असे बोलावयास लाज वाटायला पाहिजे. अशा प्रसंगात तुझ्याहून कोणी मोठे आहे, असे म्हणण्याची गोष्ट कशाला पाहिजे ? म्हणून या त्रिभुवनांत (नांव घेण्यासारखा) तूं एकच आहेस. तुझ्या तोडीचा दुसरा कोणी नाहीं व तुझ्यापेक्षा अधिक कोणी नाहीं. तुझे महात्म्य खरोखर लोकोत्तर आहे त्याचे वर्णन कसे करावे तें समजत नाहीं.



भक्त प्रल्हाद हा राक्षस कुळातला खरा, पण भगवंताच्या नामाने तो तरला.

**नाम प्रल्हाद उच्चारी । तया सोडवी नरहरी । उचलूनी घेतला कडियेवरी । भक्तसुखे निवाला ॥ १ ॥ नाम बरविया बरवंट । नाम पवित्र आणि चोखट । नाम स्मरे नीळकंठ । निजसुखे निवाला ॥ २ ॥** ज्ञा. म.

मोठ्यांचे मोठेपण याच्यातच आहे की, सर्वांच्या गुणदोषांचा समावेश आपल्यात करून घेणे या बोधावर गेलेले महात्म्ये असेच असतात -

**तुवा व्यास देखोनि सज्ञान । उपदेशिलें गुह्यज्ञान । ध्रुव बालक अज्ञान । म्हणोनि जाण नुपेक्षिसी ॥ प्रल्हाद उपदेशिला जेव्हां । दैत्यपुत्र न म्हणसी तेव्हां । तुझिया कृपेचा हेलावा । तो निजविसांवा दीनांसी ॥ केवळ वाटपाडा देख । भजनेंवीण एकाएक । महाकवी केला वाल्मिक । अमर आवश्यक वंदिती त्यासी ॥** ए. भा. २-७२, ७४

**अर्थ :-** तूं व्यासांना सज्ञान पाहून ब्रह्मज्ञानाचा उपदेश केलास पण ध्रुव हे अज्ञान बालक म्हणून त्याचीहि उपेक्षा केली नाहीस. प्रल्हादाला जेव्हां उपदेश केलास, तेव्हा तो दैत्याचा मुलगा आहे हा विचार तूं मनांत आणला नाहीस. तुझ्या कृपेची लहरी हे दीनजनांचे विश्रांतीस्थान आहे. वाल्हा कोळी केवळ वाटमाऱ्या, भजन ठाऊक नाही, पूजन ठाऊक नाहीं, त्याला तूं रामनामाचा

उपदेश करून महाकवी वाल्मिकी करून सोडलास, त्याला देव देखील वंदन करतात.

**तुम्ही अच्युतात्मे निजनिर्धारी। म्हणौनि देवो तुमचा आज्ञाधारी। तुम्ही म्हणाल त्यातें उद्धरी। येऱ्हवीं हातीं न धरी आनातें ॥**

**अर्थ** :- ( ए. भा. २ - ७७ ) तुम्ही खरोखरच अच्युतात्मे आहांत म्हणून देवहि तुमचा आज्ञाधारक आहे. तुम्ही ज्याचा उद्धार करा असे म्हणाल, त्याचाच तो उद्धार करतो नाहीतर इतरांना हातातसुद्धां धरीत नाहीं. तसेच तुकाराम महाराज म्हणतात -

**गुणदोष याती न विचारी कांहीं। ठाव दिला पायीं आपुलिया ॥ २२७३**

**अर्थ** :- तुकाराम महाराज म्हणतात, माझ्याजवळ असलेले गुणदोष व माझी हीनजात याचा काहीहि विचार न करतां त्यांनी मला आपल्या पायाजवळ (ठाव=) जागा दिली.

**जाणते नेणते करा हरिकथा। तराल सर्वथा भाक माझी ॥ ३४७**

**अर्थ** :- तुकाराम महाराज सांगतात, सर्व जाणत्या आणि नेणत्या लोकांना माझे सांगणे आहे की, तुम्ही श्रीहरीची कथा करा. त्याने तुम्ही निश्चयाने संसारसमुद्रांतून तरून जाल हे तुम्हास मी प्रतिज्ञेने सांगतो. यालाच अनुसरुन ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

**जाणीव नेणीव भगवंती नाहीं। उच्चारणी पाही मोक्ष सदा ॥**

म्हणून तुम्ही सर्व जनहो, हरीचे नामस्मरण करा.

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा। पुण्याची गणना कोण करी ॥ धृ ॥**

**- समाप्त -**

*** 

## * अभंग सव्विसावा *

**एकतत्त्व नाम दृढ धरी मना।**
**हरीसी करुणा येईल तुझी ॥ १ ॥**
**तें नाम सोपेरे रामकृष्ण गोविंद।**
**वाचेसी सद्‌गद् जपें आधी ॥ २ ॥**
**नामापरतें तत्त्व नाहीं रे अन्यथा।**
**वायां आणिका पंथा जासी झणी ॥ ३ ॥**
**ज्ञानदेवा मौन जपमाळ अंतरीं।**
**धरोनि श्रीहरी जपे सदा ॥ ४ ॥**

**अर्थ** :- हरीचे नाम हेच तत्त्व आपल्या मनामध्ये बळकट धर म्हणजे एक हरीनामाचेंच मनानें सारखे चिंतन करीत रहा, त्या योगाने हरीला तुझी दया येईल. ॥ १ ॥ रामकृष्ण, गोविंद हें तें नाम सोपे आहे. अगोदर वाणीने प्रेमाने घे. ॥ २ ॥ हरीच्या नामाखेरीज जीवाला संसारातून सोडविण्यास दुसरे साधन नाहीं. तू दुसऱ्या साधनांकडे चुकून जाशील तर जाऊं नकोस. ॥ ३ ॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मी मौन घेऊन अंतःकरणामध्ये जपमाळ धरून निरंतर श्रीहरीचा जप करीत आहे. ॥ ४ ॥

**एकतत्त्व नाम दृढ धरी मना। हरीसी करुणा येईल तुझी ॥ १ ॥**

**विवरण** :- मनुष्याने हजारो ठिकाणी आपल्या वृत्तीची पांगापांग न करता एका नामाच्या ठिकाणीच आपली वृत्ती लावली पाहिजे म्हणजे जर हरीच्या ठिकाणी दृढतेने, अनन्यतेने आपली वृत्ती निश्चित केली तर हरीला आपली करुणा येईल.

परंतु अनन्यता म्हणजे काय असा प्रश्न पडतो.

**अन्याश्रयाणां त्यागो इति अनन्यता ।** - नारदभक्तिसूत्र

सर्व आश्रयांचा म्हणजे मी, माझे याचा त्याग करून एका परमात्म्याचाच आश्रय करणे याला अनन्यता असे म्हणतात. उदा. - स्त्री ज्याप्रमाणे काया-वाचा-मनाने आपल्या पतीशी अनन्य असते म्हणून तोहि तिची काळजी वाहतो. स्वतः भगवान गीतेत सांगतात -

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥** गी. ९-२२

**अर्थ :-** एकनिष्ठेने माझे चिंतन करून जे लोक माझी उपासना करतात, त्या सतत (माझ्या ठिकाणी) युक्त असलेल्या लोकांचा (मागुत्या अथवा सेवा यापैकी पाहिजे असेल त्या गोष्टीचा) योग (अप्राप्त वस्तूची प्राप्ती) व क्षेम (प्राप्त वस्तूचे रक्षण) मी करतो.

**किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया ये उदरा ।**
**तो मातेचा सोयरा । केतुला पां ॥** ज्ञा. १२-८३

**अर्थ :-** फार काय सांगावे ! अर्जुना, जो आईच्या पोटी जन्म घेतो, तो आईचा किती आवडता असतो बरे ? मूल आईवर अवलंबून असल्यामुळे आईला त्याची सर्व काळजी वहावी लागते त्याप्रमाणे अनन्यभावाने परमात्म्याचे नामस्मरण करणारे, त्यांची तो परमात्मा सर्व चिंता वाहतो.

**आवडीने भावे हरिनाम घेसी ।**
**तुझी चिंता त्यासी सर्व आहे ॥**

**अर्थ :-** मोठ्या प्रेमानें व श्रद्धेने तूं हरीचे नामस्मरण कर म्हणजे तुझी सर्वच काळजी तो वाहील.

मात्र आवडीने नाम घेतले पाहिजे. तें नाम कोणते घ्यावयाचे



तर तें अतिशय सोपें आणि सरळ आहे, हेच ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या द्वितीय चरणांत सांगतात -

**तें नाम सोपेरे रामकृष्ण गोविंद । वाचेसी सद्गद् जपे आधी ॥**

**१) परा २) पश्यंति ३) मध्यमा ४) वैखरी** अशा चार प्रकारच्या वाण्या आहेत.

वास्तविक नामस्मरण हे परा वाणीनेच व्हावयास पाहिजे. तुकाराम महाराज म्हणतात -

**पंढरीचा राणा । मनामाजी स्मरावा ॥** तु. म. २७१४

परंतु अशी ही उच्च अवस्था सर्वांना प्राप्त होणे शक्य नाहीं म्हणून प्रथम वैखरी वाणीने नामस्मरण करावे. भगवंत अर्जुनाला सांगतात -

**मी सर्व वस्तीचें वसौटें । माझीं नामें जिये चोखटें ।**
**तियें जीवा यावया वाटे । वाचेचिये लावीं ॥** ज्ञा. १८-१३५७

**अर्थ :-** मी सर्व जगाचे राहण्याचे ठिकाण आहे त्या माझी जी चांगली नांवें आहेत, ती अंतःकरणी उतरण्याकरिता वाचेच्या वाटेला लाव.

पण ते अत्यंत प्रेमपूर्वक उच्चारावे - **वाचेसी सद्गद् जपे आधी ।**

कांहीं लोकांचे अंतःकरण हे दगडासारखे असते.

**नये नेत्रां जळ । नाही अंतरीं कळवळ ॥** तु. म. २९३२

**अर्थ :-** ज्यांच्या डोळ्यांना एक थेंबभर पाणीदेखील येत नाही आणि जोपर्यंत अंतरात कळवळा निर्माण होत नाहीं. भजन कसे करावे ? तर - **सद्गदित कंठ दाटो । येणें फुटो हृदय ॥** तु. म. ११८७

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, हे देवा, तुमच्याविषयीच्या निरतिशय प्रेमाने माझा कंठ सद्‌गदित होवो व त्याच प्रेमभराने माझे हृदय फुटून जावो.

रामकृष्ण परमहंस म्हणत असत, ज्याला खरोखरच परमार्थ करावयाचा आहे, त्याने पहाटे चार वाजता देवाकरिता हंबरडा फोडावा. पण ते एकांतात. कोणालाहि न कळता, प्रत्येक साधकाच्या अंतःकरणातून म्हणजेच नेत्रातून निदान चार थेंब तरी अश्रू देवाकरिता आले पाहिजेत. पण कांहीं ढोंगी लोक डोळ्यांत खोटे अश्रू आणतात व लोकांना प्रेम दाखवतात. त्यांच्याबद्दल तुकाराम महाराज म्हणतात -

**कीर्तनाचे वेळीं रडे पडे लोळे । प्रेमेवीण डोळे गळताती ॥** २८१८

**अर्थ :-** जो एखादा कीर्तनाच्या वेळी रडतो, पडतो, जमिनीवर लोळतो पण श्रीहरीच्या प्रेमाखेरीज त्याच्या डोळ्यामधून पाणी मात्र गळत असते. परंतु हे खरे प्रेम नाहीं. खरे प्रेम त्यालाच म्हणतात, कीं एकांतामध्ये कंठ दाटून आला पाहिजे व अश्रूंच्या धारा लागल्या पाहिजेत. पण कोणाला दिसता कामा नये. तुकाराम महाराज म्हणतात,

**माझें दिठावेल प्रेम । बुद्धी होईल निष्काम ॥** तु. म. १९०८

**अर्थ :-** हरीच्या सगुण भक्तिविषयी माझ्यात असणाऱ्या प्रेमास सोऽहं भावात अडकलेले, मोक्षासाठी दीन झालेले, अद्वैतात भक्ति घडत नाहीं असे म्हणणारे, ज्ञानी यांची दृष्ट लागेल म्हणून त्यांचा त्याग करून वनांत सगुण भक्तीद्वारा अहंकारादिक, काम-क्रोधादिक विकार गेल्यामुळे माझी बुद्धि सहज निष्काम होईल.

याकरिता तो खरा भक्त एकांतात रडतो. प्रेमाला दृष्ट लागली



म्हणजे पुन्हा तें येत नाहीं. असो. परंतु एकाएकी शुद्ध नामस्मरण करता येणार नाही, म्हणून तूं टाकून देऊ नको. अभ्यासाने भजन साध्य होईल. कारण हरीच्या नामाखेरीज जीवाला संसारातून सोडवण्यास दुसरे साधन नाही. म्हणून तूं दुसऱ्या साधनाकडे जाऊं नको. हेच अभंगाच्या तिसऱ्या चरणांत सांगतात -

**नामापरते तत्त्व नाहीं रे अन्यथा । वायां आणिक पंथा जाशी झणी ॥**

प्रथमतः मनानें नामस्मरण होत नाहीं. पण तरीहि वाचेने घेणे सोडूं नये.

**नस तरी मनीं नसो । परी वाचे तरी वसो ॥** तु. म. ११७६

उदा. मुलीला प्रथम सासरी जाणे फार अवघड वाटते. (ही लहानपणीं लग्न झालेल्या मुलीविषयी गोष्ट आहे.)

**कन्या सासुऱ्यासी जाये । मागें परतोनि पाहे ॥** तु. म. ८३६

कारण सासरी सर्व नवीन आणि अनोळखी मंडळी असतात. त्याप्रमाणे वृत्तीरूपी मुलगी परमात्म्याकडे राजीखुशीने जात नाहीं. कारण ती विषयरूप मोहाने लाडावलेली असते. पण नंतर ती एकदा कां परमात्म्याच्या ठिकाणी रंगली कीं रंगली. कशी तर - **भ्रमर गुंतले सुमन कळिके ।** भ्रमर त्या मकरंद सेवन करण्याच्या भरात त्या कमळकळीकेत सांपडला जातो. भगवान अर्जुनाला सांगतात, या मनाचा एक स्वभाव फार चांगला आहे.

**कां जें यया मनाचें एक निके । जे हें देखिले गोडीचिया ठाया सोके । म्हणोनि अनुभवसुखचि कवतिकें । दावीत जाईजे ॥** ज्ञा. ६-४२०

**अर्थ :-** कारण कीं या मनाची एक गोष्ट चांगली आहे; ती ही कीं

त्याला एकदा गोडी लागली कीं अनुभवलेल्या गोडीच्या ठिकाणी ते चोकवते. म्हणून त्याला कौतुकाने आत्मानुभव सुखच वारंवार दाखवित जावे. म्हणून ज्ञानेश्वर महाराजांनी तृतीय चरणांत सांगितले कीं, नामासारखे दुसरे साधन नाहीं.

ज्ञानाचा, कर्माचा किंवा योगाचा परिपाक भजनांत होत नसेल तर तें फुकट आहे. **हेचि देवाचे दर्शन । सदा राहे समाधान ॥**

**अर्थ :-** जेणेकरून अंतःकरण सर्वकाळ समाधानाने राहते, तेच खरे देवाचे दर्शन आहे.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात मी मौन धरून व अंतःकरणामध्ये जपमाळ धरून निरंतर श्रीहरीचा जप करीत आहे.

**ज्ञानदेवा मौन जपमाळ अंतरीं । धरोनि श्रीहरी जपे सदा ॥ ४ ॥**

बाहेरून प्रपंचाविषयी मौन पण आंत भगवन्नाम अखंड चालू आहे, असा आपला अनुभव सांगतात. परंतु सामान्य जीवांचे याच्याविरुद्ध असते. त्यांचे नामाविषयी मौन पण प्रपंचाविषयी अखंड खटपट चालू असते. तुकाराम महाराज म्हणतात -

**बोलणेचि नाहीं । आतां देवावीण कांहीं ॥** तु. म. ३११५

**अर्थ :-** आतां आम्हाला देवावांचून दुसरे कांहीं बोलावयाचे नाहीं.

**संकल्प तो नाहीं दुजा । महाराजाविण तो ॥** तु. म. ८३३

**अर्थ :-** (मी विनंतीपूर्वक सांगतो कीं) श्रीहरी महाराजावांचून माझ्या हृदयांत दुसरा कोणताच संकल्प = (विचार) नाहीं.

**पतिव्रता नेणे आणिकांची स्तुति । सर्वभावें पति ध्यानीमनी ॥** ७५१



**अर्थ :-** पतिव्रता स्त्री ही पतिवांचून दुसऱ्याची स्तुति करण्याचे कधीच जाणत नाहीं. ती सर्वभावाने पतीच्या ठिकाणी अनन्य असते तिच्या ध्यानांत मनांत एक पतीच असतो.

**आतां मज ऐसे करीं गा देवा । कांहीं घडे तुझी चरणसेवा ।**
**तुका विनवीतसे केशवा । चालवी दावा संसारीं ॥** तु. म. ६८७

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, अगा देवा, आतां मला तुमच्या चरणांची कांहीं सेवा घडेल असे करा आणि हे केशवा, तुम्हाला विनंती करतो कीं, संसाराशी माझा कायमचा वैरभाव चालेल असे तुम्ही करा.

कांहीं ढोंगी लोक खालील कडवे घेतात हे क्षेपक कडवे आहेत. तुकाराम महाराजांचे नाहीं. **अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ । त्याच्या गळा माळ असो नसो ।** असे म्हणणाऱ्यांनी वरील कडव्याचा विचार करावा.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**ज्ञानदेवा मौन जपमाळ अंतरीं । धरोनि श्रीहरी जपे सदा ॥ ४ ॥**

जपमाळ अंतरी म्हणजे काय तर ''अंतःकरणांत नाममाळा असणारा''

**सतत कृष्णमूर्ति सावळी । खेळे हृदयकमळीं ।**
**शांति क्षमा तयाजवळी । जीवे भावे अनुसरल्या ॥** ए. म.

अशी ही श्रेष्ठ अवस्था प्राप्त होण्याकरिता ज्ञानेश्वर महाराज सांगतात

**हरि मुखें म्हणा हरि मुखें । पुण्याची गणना कोण करी ॥**

**- समाप्त -**

## * अभंग सत्ताविसावा *

सर्वसुखगोडी साहीशास्त्रें निवडी ।
रिकामा अर्धघडी राहूं नको ॥ १ ॥
लटिका व्यवहार सर्व हा संसार ।
वार्या येरझार हरिवीण ॥ २ ॥
नाम मंत्र जप कोटी जाईल पाप ।
कृष्णनामीं संकल्प धरूनि राही ॥ ३ ॥
निजवृत्ति काढीं सर्वमाया तोडीं ।
इंद्रियां सवडी लपो नको ॥ ४ ॥
तीर्थव्रतीं भाव धरी रे करुणा ।
शांतिदया पाहुणा हरी करी ॥ ५ ॥
ज्ञानदेवा प्रमाण निवृत्तिदेवीं ज्ञान ।
समाधि संजीवन हरिपाठ ॥ ६ ॥

**अर्थ :-** साही शास्त्रांनी हरीच्या नामात सर्व सुखमाधुर्य आहे, असे निवडून ठरविले आहे. (त्याचे नेहमी तूं सेवन कर) अर्ध घटका देखील रिकामा राहू नकोस. ॥ १ ॥ कारण देहादिक संसार व त्यातील व्यवहार सर्व खोटा आहे, म्हणून हरीला सोडून या संसाराच्या मोहात राहशील तर तुझी येरझार, म्हणजे जन्माला येणे व मरणे हे व्यर्थ होईल. ॥ २ ॥ हरिनाम मंत्राचा तूं निरंतर जप करीत जा. या योगाने तुझ्या अनंत पापाचा नाश होईल. याकरिता रामकृष्ण नाम घेण्याविषयींचा निश्चय तूं आपल्या मनाशी पक्का करून रहा. ॥ ३ ॥ गुरुजवळ श्रवण, मनन व निदिध्यासनाचा अभ्यास करून तिन्हीं देहांहून व तिन्ही गुणांहून वेगळा जो आत्मा तो मी आहे अशी वृत्ती उत्पन्न कर व त्यायोगाने सर्व मायाजाळाचा नाश कर. इंद्रियांच्या



तादात्म्यात लपून बसू नको. ॥ ४ ॥ तीर्थ व्रतांच्या ठिकाणी तूं विश्वास ठेव व नेहमी दया बाळग. कारण जेथे शांति, दया असते, तेथे देवाची वस्ती असते. म्हणून तूं आपल्या हृदयांत शांति, दया ठेऊन तेथे श्रीहरी वस्तीला येईल असे कर. ॥ ५ ॥ हरिपाठ हा समाधि संजीवन आहे. आत्मस्वरूपाच्या ठिकाणी जागृत असणे हेच खरे जिवंत असणे होय. असले जिवंतपण हरिनामाच्या ठिकाणी स्थिर असले म्हणजे मिळते. कारण हरिनाम व नामी परमात्मा या दोन्हीचा अभेद आहे. ॥ ६ ॥

**परी आश्रयो आकाशा । आकाशचि का जैसा ।**
**या नामा नामी आश्रयो तैसा । अभेद असे ॥ ज्ञा.१७-४०३**

हरिपाठ समाधिसंजीवन आहे, हे ज्ञान मला श्रीनिवृत्तिनाथांपासून मिळाले व मला अनुभवाने ते खरे आहे असे पूर्ण कळले असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

**विवरण :**

**सर्व सुख गोडी साहीशास्त्रें निवडी । रिकामा अर्धघडी राहूं नको ॥**

हरिपाठाचा हा शेवटचा म्हणजे सत्ताविसावा अभंग आहे. एक अठ्ठाविसावा अभंगहि काही ठिकाणी मानला जातो. पण तो क्षेपक आहे. तसेच ज्ञानेश्वर महाराजांच्या आरतीमध्येहि एक क्षेपक चरण आहे. (क्षेपक म्हणजे दुसऱ्याने केलेले अभंग)

**कणकाचे ताट करी । उभ्या गोपिका नारी ।**
**नारद तुंबर हो । सामगायन करी ॥ आरती ज्ञानराजा ॥**

त्याचप्रमाणे पांडुरंगाच्या आरतीतहि एक क्षेपक चरण आहे.
**ओवाळूं आरत्या कुरवंड्या येती । चंद्रभागेमध्ये सोडोनिया देती ।**

परंतु ही क्षेपक चरणे वारकरी सांप्रदायात मानली जात नाहीत. तसेच हरिपाठाच्या या शेवटच्या अभंगाचे आहे. तो क्षेपक असल्यामुळे सांप्रदायिक तो अभंग म्हणत नाहीत.

कोणतेहि ग्रंथकार ग्रंथाच्या आरंभी अथवा शेवटी ग्रंथाचे प्रयोजन सांगतात -

**प्रयोजनं मनुदिश्य न मंदोऽपि प्रवर्तते ॥**

ज्ञानेश्वर महाराज या प्रस्तुत अभंगात सर्व हरिपाठाचे फल सांगतात. उदा. गीतेमध्येहि भगवंतांनी प्रयोजन सांगितले आहे. त्याचप्रमाणे सर्व जगाची खटपट कशाकरिता आहे तर सुखाकरिता आहे. नाथ महाराज सांगतात -

**मजलागी दुःख होआवें । ऐसें कोणी भावीना जीवें ।**
**न वांछितां दुःख पावे । येणे न संभवे स्वतंत्रता ॥** ए. भा. १०-४४६

**अर्थ :-** मला दुःख व्हावे अशी मनापासून कोणीहि इच्छा करीत नाही. पण दुःख हे इच्छा नसताहि प्राप्त होते. ह्यावरून त्याला स्वतंत्रता संभवत नाही.

या आशयावरून ज्ञानेश्वर महाराजांना 'अखंड सुखासाठी भजन करा' असेच सांगावयाचे आहे. पण सर्व जग अखंड सुखाकरिता स्त्रीपुत्रादिक धनाच्या ठिकाणी अखंड चिकटून राहिले आहे.

**संसारी सुख जोडे । तरी का सेविती गिरी कडे ॥**
**राज्य टाकूनि गेले किती । ते काय वेडे आहाती ॥** भागवत

**स्त्रिया गाइले आइकावे । स्त्रीरूप डोळां देखावे ।**
**सर्वेंद्रियी आलिंगावे । स्त्रियेतेचि ॥** ज्ञा. १६-३३४

**अर्थ :-** स्त्रियांनी गाईलेले ऐकावे, स्त्रीचे रूप डोळ्यांनी पहावे व



सर्वेंद्रियांनी स्त्रीलाच आलिंगन द्यावे.

**कुरवंडी कीजे अमृतें । ऐसे सुख स्त्रियेपरौतें ।**
**नाहीचि म्हणौनि चित्ते । निश्चयो केला ॥** ज्ञा.१६-३३५

**अर्थ :-** ज्या सुखावरून अमृत ओवाळून टाकावे, असे सुख स्त्रीशिवाय इतर ठिकाणी नाहीच, असा त्याच्या चित्ताने निश्चय केलेला असतो. ही सामान्य जीवांची धारणा असते.

राजस प्रकृतीवान् विषयातच सुख मानतो, पण अरे बाबा, तूं वरवर न पाहता पूर्ण विचार कर व तो विचार तुझ्या मनाने न करता तो शास्त्रदृष्टीने कर. असे ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या प्रथम चरणांत सांगतात -

**सर्व सुख गोडी सर्व शास्त्रें निवडी । रिकामा अर्धघडी राहूं नको ॥ १ ॥**

सर्व शास्त्रें निवडी म्हणजे त्यांचे मंथन करून अभ्यास कर आणि विषयाकडे मात्र विरक्त पुरुषाप्रमाणे पहा.

**हे विरक्तांचिये दिठी । जै न्याहाळिजे किरीटी ।**
**तै पांडुरोगाचिये पुष्टी । सारिखे दिसे ॥** ज्ञा.५-११९

अर्थ :- विरक्तांच्या दृष्टीने पाहिले तर हे विषयसुख, अर्जुना, पंडुरोगामध्ये आलेल्या सुजेप्रमाणे घातक आहे असे समज. विषयांकडे विरक्त पुरुषांची पाहण्याची दृष्टी फार वेगळी आहे. याऊलट स्त्रैन मनुष्य म्हणतो 'कुरवंडी कीजे अमृते ॥'

जेवणारास विचारले, बाबा सुख कशात आहे ? तर तो म्हणतो, बासुंदीतच आहे. असे तो आवडीने सांगेल. तसेच जीवाला खरे शाश्वत सुख पाहिजे असेल तर ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

**रिकामा अर्धघडी राहूं नको ॥ १ ॥**

**कांडिल्या कुटिल्या होतो मांडा । अळसे धोंडा पडतसे ॥** तु. म.२९९६

**अर्थ :-** गहू चांगले कांडून कुटून घेऊन कणिक चांगली मळावी लागते. मग मांडा (विशिष्ट पुरणपोळी) हा पदार्थ चांगला तयार होतो. परंतु त्याबद्दल आळस केला तर पदरामध्ये धोंडा पडतो. म्हणजे याखेरीज तो तयार होत नाही.

**आळसाची धाडी । तुका म्हणे बहु नाडी ॥** तु. म.३५६४

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, जर आळसाची धाड = (अकस्मात् झालेला हल्ला) पडेल तर ती फार फसवतील. (म्हणजे दुसरी वाया जाल.)

**तोंडी पडे माती । फिरता मग कैचा तो ॥** तु. म. १५१

**अर्थ :-** संसाराच्या मोहात पडल्यावर त्यांना हरीचा लाभ कसला होतो ? तर होत नाही. म्हणून अखेरीस त्यांच्या तोंडात माती पडते.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, अरे बाबा, तूं संसाराच्या ठिकाणी सत्यत्त्व मानून बसला आहेस. तो संसार सर्व बाजूंनी खोटा आहे. तूं फुकट येरझारा करूं नकोस.

**लटिका व्यवहार सर्व हा संसार । वायां येरझार हरिवीण ॥ २ ॥**

म्हणून शहाण्या मनुष्याने काय करावे ते तुकाराम महाराज सांगतात.

**आपुला तो एक देव करूनि घ्यावा । तेणेविण जीवा सुख नव्हे ॥ १ ॥ येर ती माइके दुःखाची जनिती । नाही आदि अंती अवसानी ॥ २ ॥** तु.म.३३३५

**अर्थ :-** नरदेहास आलेल्या जीवाने एक देव आपलासा करून घ्यावा. कारण त्यावांचून जीवास कधीच सुख होणार नाही. एका देवावांचून



सर्व काही मायिक असून ते दुःखाला उत्पन्न करणारे आहे आणि भासण्यापूर्वी अधिष्ठान ज्ञानानंतर व भासण्याच्या काळातहि त्यांना पारमार्थिक सत्ता नाही.

आपण पोथीत बसलो म्हणजे प्रपंच मिथ्या म्हणून सांगता येईल पण मनाला पटणे कठीण आहे. मिथ्यात दोन वर्ग आहेत. १) अजातवाद २) विवर्तवाद.

अजातवादावरील चार दृष्टांत :- १) बागुलबोवा २) खपुष्प ३) वंध्यापुत्र व ४) शशशृंग.

विवर्तवादावरील चार दृष्टांत :- १) रज्जुसर्प २) शुक्तिरजत ३) मृगजळ ४) स्थानुपुरुष हे सर्व भासमात्र आहेत.

**न झाला प्रपंच आहे परब्रह्म ।**
**अहं सोऽहं ब्रह्म आकळले ॥** तु. म. ४०२५

**अर्थ :-** प्रपंच हा झालाच नाही. एक परब्रह्मच आहे. ''अहं ब्रह्म, सोऽहं ब्रह्म' अशा भावनेच्या अभ्यासाने त्याचे मला दृढ अपरोक्ष ज्ञान झाले.

**प्रपंच एक झाला होता । हे समूळ मिथ्या वार्ता ।**
**पुढे होईल मागुता । कदा कल्पांती घडेना ॥** ए. म.२४-५११

**अर्थ :-** प्रपंच म्हणून कोणी एक झाला होता, ही गोष्टच मुळी सर्वस्वी खोटी किंवा तो पुन्हा होईल असेहि कल्पांती घडणे नाही. प्रपंच हा विवर्तवादाप्रमाणे भासमान आहे.

**रज्जुसर्पाकार । भासयले जगडंबर ॥** तु. म. ६६१

**अर्थ :-** आता मला हा जगदाभास (दिसणारे जगत्) दोरीवर सर्प भासल्याप्रमाणे स्वरूपावर मिथ्या भासत आहे.

**शुक्तीवरी रजत पाहता डोळा दिसे ।**
**रज्जुवरी भासे मिथ्या सर्प ॥**

**अर्थ :-** शिंपल्याकडे बघतांना डोळ्यांना रुप्याचा भास होतो व दोरीकडे बघतांना सर्पाचा भास होतो. (हरिस्वरूपाच्या ठिकाणी जीवशिवाचा भास होतो.)

प्रपंच खोटा आहे व त्याला आरंभ व शेवट नसून तो मध्येच भासतो. म्हणून भगवान गीतेमध्ये सांगतात -

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्नचसंप्रतिष्ठा ॥** गी.१५-३

**ब्रह्मगिरीहूनि न निगे । आणि समुद्रीं कीर न रिगे ।**
**तरी मार्जी दिसे वाउगे । मृगांबु जैसे ॥** ज्ञा. १५-२३८

**अर्थ :-** ज्याप्रमाणे ब्रह्मगिरी पर्वतापासून निघत नाही आणि शेवटी खरोखर समुद्रासहि मिळत नाही, तर मध्येच जसे मिथ्या मृगजळ भासते.

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥** गी. २-२८

**अर्थ :-** अर्जुना, हे प्राणिमात्र जन्मापूर्वी अव्यक्त असतात. मध्ये तेवढे व्यक्त होतात व (पुन्हा) मृत्युनंतर अव्यक्त बनतात, मग शोक कसला ?

**तैसे आदीचि जे नाही । तयालागी तूं रुदसि कायी ।**
**तूं अवीट ते पाही । चैतन्य एक ॥** ज्ञा.२-१६९

**अर्थ :-** त्याप्रमाणे जे मुळातच नाही त्याकरिता तूं काय रडत बसला आहेस. निर्विकार असे जे चैतन्य त्याकडे तूं लक्ष दे.

**एक अद्वैत ब्रह्म पाही । दुसरे आणिक कांहीं नाहीं । प्रपंच मिथ्या वस्तूचे ठायी । हे प्रमाण पाही वेदवाक्य ॥** ए.भा.१९-१९७



**अर्थ :-** जिकडे तिकडे सारे एक अद्वैत ब्रह्मच आहे. दुसरे आणखी काही एक नाही. त्या परब्रह्मामध्ये हा प्रपंच मिथ्या भासच आहे. याला वेदवाक्य प्रमाण आहे.

**प्रत्यक्ष देखिजे आपण । देहादिकांचे नश्वरपण ।**
**हे दुसरे परमप्रमाण । जे क्षणिकत्व जाण प्रपंचा ॥** ए. म. भा. १५-११८

**अर्थ :-** देहादिकांची क्षणभंगूरता आपण प्रत्यक्ष पाहतोच. हे प्रपंच क्षणिकत्वाचे दुसरे 'प्रत्यक्ष प्रमाण' होय.

**मार्कंडेयो आणि भृशुंडी । इहीं प्रपंचाची राखोंडी । देखिली गा रोकडी । वेळां कोडी कल्पांतीं ॥ महाजनप्रसिद्ध हे श्रवण । प्रपंचासी क्षणिकपण । हे तिसरें गा प्रमाण । उद्धवा जाण ऐतिह्य ॥ शास्त्रप्रसिद्धी अनुमान । मिथ्या प्रपंचाचे भान । दिसे मृगजळासमान । वस्तुतां जाण असेना ॥** ए.भा.१९-१९९-२०१

**अर्थ :-** मार्कंडेय आणि भृशुंडी यांनी कोट्यावधी कल्पांताच्या वेळी प्रपंचाची राखरांगोळी झालेली डोळ्यांनी पाहिली आहे. असे मोटमोठ्यांच्या मुखातून आपण अनेकवेळा ऐकलेले आहे. हे प्रपंचाच्या नश्वरपणाचे तिसरे ऐतिहासिक प्रमाण होय शास्त्रप्रसिद्धीवरून आणि अनुमानानेहि प्रपंचाचा भास मिथ्याच आहे. तो मृगजळासारखा दिसतो. त्यात खरेपणा नाही.

वरील प्रपंचाचे मिथ्यात्व चार प्रकारांनी सांगितले आहे. **१) प्रत्यक्ष २) अनुमान ३) शब्द ४) उपमान**

स्वतः ज्ञानेश्वर महाराज जगाचा अनुभव सांगतात.

**आजा मेला पणजा मेला बाप मसना गेला ।**
**देखत देखत नातू पणतू तोही तैसा झाला ॥** ज्ञा. म.

**देह आधि काय खरा । देहसंबंध पसारा ।**
**बुजगावणे चोरा । रक्षणसे भासतसे ।। तु. म. ३८५५**

**अर्थ :-** विषयाचा भोग घेणारा आपला देह हा आधी मुळी खरा नाही, तर देहासंबंधी स्त्रीपुत्रादिक हे कोठून खरे असणार ? त्यांचे दिसणे जसे शेतातील बुजगावणे पिकाचे रक्षक आहे असे सत्य भासते, त्याप्रमाणे देह आणि देहासंबंधी सत्य हा केवळ भ्रम होय.

तुला आता प्रपंच घटोत्कचची मायेप्रमाणे सुंदर दिसेल पण अंती हा प्रपंच तुला रडवेल. परंतु वैराग्यशील महात्म्यांना प्रपंच दिसत नाही.

**तैसा बुद्धयादिकांपुढां । असतु विश्वाभासु हा येवढा ।**
**तो न देखे कवणीकडां । आकाशु जैसे ।। ज्ञा. १८-२११**

**अर्थ :-** जसे आकाश एवढे मोठे चोहीकडे असूनहि ते कोणीकडेच दिसत नाही, त्याप्रमाणे बुद्ध्यादिकांपुढे जो एवढा मोठा विश्वाभास आहे. तो त्याला कोणीकडेच दिसत नाही. तसेच तुकाराम महाराज म्हणतात -

**येर ती माइके दुःखाची जनिती ।**
**नाही आदि अंती अवसानी ।। तु. म. ३३३५**

**अंडज जारज स्वदेज उद्भिज आटे ।**
**हरिनाम नाटे ते बरवें ।। ज्ञा. म. ५८२**

या मुख्य चार योनी मानल्या आहेत.

१) **अंडज** :- अंड्यापासून जन्म होतो असे पक्षी.
२) **जारज** :- जाराचे वेष्टन - मनुष्य आणि पशू.
३) **स्वदेज** :- घामापासून उत्पत्ती - उवा
४) **उद्भिज** :- जमिनीतून उत्पत्ती - सर्व वृक्ष.



हे सर्व नाशिवंत आहे. परंतु भगवंताचे नाम मात्र अविनाशी आहे. म्हणून या संसाराला येऊन हरीची प्राप्ती करून घेतली नाही, तर हा जन्म फुकट आहे, व्यर्थ येरझार आहे.

**लटिका व्यवहार सर्व हा संसार । वायां येरझार हरीवीण ।। २ ।।**

**ये सार्ते आलिया वोळगा सारंगधरु । नाही तरी संसारु वायां जाईल रया ।। १ ।। कवणाचे मायबाप कवणाचे गणगोत । मृगजळवत् जाईल रया ।। २ ।।**

**मनुष्यपण तरी साधी नारायण ।**
**नाही तरी हीन पशूहूनि ।। तु. म. ३७८**

**अर्थ :-** जर मनुष्य देहामध्ये देवाची प्राप्ती करून घेतली तर उत्तम, नाहीतर मनुष्य जनावरापेक्षाहि नीच आहे असे समजावे. निळोबाराय देखील सांगतात -

**येथे येऊनि केले काय । विठ्ठल नाही आठविला ।**
**अहा रे मूढा भाग्यहीना । गेलासी पतना मोहभ्रमे ।।** निळोबाराय

नकली नाण्याच्या नुसत्या चकाकीवर भुलू नको.

अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।
अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ।। गी. ९-३

**अर्थ :-** हे शत्रूतापना, या आत्मज्ञानरूपी धर्मावर श्रद्धा न ठेवणारे पुरुष मला प्राप्त न होता. मृत्युरूपी संसाराच्या मार्गावर परत येतात.

**तैसा हृदयामध्ये मी रामु । असता सर्वसुखाचा आरामु । की भ्रांतासी कामु । विषयावरी । बहु मृगजळ देखोनि डोळा । थुंकिजे अमृताचा गिळिता गळाळा । तोडिला परिसु बांधिला गळा । शुक्तिकालाभे ।।** ज्ञा.९-६०-६१.

**अर्थ :-** त्याप्रमाणे सर्व सुखांचा बगीचा असा जो मी राम, तो मी (सर्वांच्या) हृदयांत असतांना (त्या मला न जाणून) मूर्ख लोक सुखाकरिता विषयाचीच इच्छा करतात. मोठे मृगजळ डोळ्याला दिसल्यावर अर्धवट गिळलेला अमृताचा घोट थुंकून टाकावा अथवा गळ्यात बांधलेला परीस शिंप मिळावी म्हणून तोडून टाकावा.

भगवत्प्राप्ती करून घेतली नाही तर ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, जन्म फुकट आहे. तर कोणी म्हणेल आम्ही जन्माला येऊन शेतीबाडी, घरदार स्वकष्टाने तयार केले, मग आमचे श्रम, आमची खेप = येरझार फुकट कशी ? यावर महाराज म्हणतात, ''अरे बाबा त्याकरिता तुझा जन्म नाही.''

**लटिका व्यवहार सर्व हा संसार । वायां येरझार हरीवीण ॥ २ ॥**

उदा. मुंबईला एक माणूस कोर्टात तारखेला गेला. पण तो वेळेवर हजर न होता राणीचा बाग, चौपाटी, शिवाजी पार्क, मुंबादेवी, समुद्र वगैरे पहात बसला. यामुळे कोर्टातील वेळ निघून गेली व त्याची येरझार फुकट झाली. तात्पर्य, याप्रमाणे नरदेहाला येऊन भगवत्भक्ति न करता इतर कामात वेळ घातल्याने येरझार फुकट जाते. परमात्मप्राप्ती करून घेण्यातच जीवाची सार्थकता आहे.

**तुका म्हणे जन्मा आल्याचे सार्थक ।**
**विठ्ठलचि एक देखिलीया ॥** तु. म. २५८९

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, एका विठोबारायाचे दर्शन घेतल्याने आपण मनुष्यजन्माला आल्याची सफलता होते.

**हरिकथा अवघेचि ऐकती । परी माझी श्रद्धा नुपजे चित्तीं ।**
**कोणा एका अभिनवगती । श्रद्धाउत्पत्ती श्रवणेंचि होय ॥**
ए. भा. २०-७८



**अर्थ :-** हरीची कथा सारेच ऐकतात. पण मजविषयी श्रद्धेची उत्पत्ती त्यांचे चित्तात होत नाही. पण एखाद्याला कथा श्रवणानेंच श्रद्धा उत्पन्न होते.

कानाने ऐकले तर बुद्धीचा निश्चय होणे फार कठीण आहे.

**बुद्धीचा पालट धरा रे कांहीं । मागुता हा नाही मनुष्य देह ॥ १ ॥**
**आपुल्या हिताचे न होती सायास । गृह दारा आस धनवित्त ॥ २ ॥**
तु. म. २६७४

**अर्थ :-** अहो जनहो, तुम्ही आपल्या बुद्धीमध्ये काही फरक करा म्हणजे ती विषयातून काढून देवाकडे लावा. तुम्हाला पुन्हा असा उत्तम नरदेह मिळणार नाही. खरोखर ज्यामध्ये आपले हित आहे अशा संबंधाची खटपट तुमच्या हातून बिलकूल होत नाही. तुम्ही रात्रंदिवस घर, बायको आणि पैसा याची आशा करीत आहात. पण हे आपले खरे हित नाही. असे न होण्याला कारण पूर्वजन्मीचे पाप. तुकाराम महाराज म्हणतात -

**तुका म्हणे नाड । पाप ठाके हिताआड ॥** तु. म. ३४०५

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, पूर्वी केलेले पाप हे मनुष्यास मोठे फसविणारे आहे. ते पापच त्याच्या हिताच्या आड येते. माळ घेऊन स्वस्थ जप करायला बसा म्हणजे अंतःकरणातील संकल्पविकल्प किती आहेत, हे कळेल. त्याचा अनुभव येईल व आपले मन तपासता येईल.

**तरी झाड जाणिजे फुले । कां मानस जाणिजे बोले ।**
**भोगे जाणिजे केले । पूर्वजन्मीचे ॥** ज्ञा. १७-७४

**अर्थ :-** तर झाड जसे फुलावरून ओळखता येते, अथवा बोलण्यावरून जसे (बोलणाराचे) मानस जाणता येते, अथवा या जन्मातील सुखदुःखाच्या भोगावरून जसे मागील जन्मात केलेले कर्म ओळखता येते.

बुद्धीमांद्य, पापसंकल्प वासनेद्वारे प्रतितीस येतात ते नाहीसे होण्याकरिता ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, तुम्ही नामस्मरण करा.

**नाममंत्र जप कोटी जाईल पाप । कृष्णनामीं संकल्प धरूनि राहे ॥**

पाप कितीहि मोठे असो. ते नामापुढे टिकत नाही.

**तृण अग्निमेळे समरस झाले । तैसे नामे केले जपता हरि ॥**

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ।**
**नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥** गी. ९-१४

अर्थ :- सदा माझा नामघोष करणारे (अष्टांग योगाने माझ्या प्राप्तीसाठी) निश्चयपूर्वक प्रयत्न करणारे व मला भक्तिपूर्वक (सर्व मीच आहे असे समजून सर्वत्र मला) नमस्कार करणारे (माझ्या ठिकाणी) नित्य चित्त लावणारे माझी उपासना करतात.

**तरी कीर्तनाचेनि नटनाचे । नासिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे ।**
**जे नामचि नाही पापाचे । ऐसे केले ॥** ज्ञा.९-१९७

**अर्थ :-** तर त्यांनी कीर्तनाच्या उत्कर्षाने प्रायश्चित्तांचा धंदा नष्ट केला, कारण कीं त्यांनी पापाचे नांवच नाहीसे केले.

कृष्णनामे संकल्प म्हणजे काय ? तर कितीहि वस्तु दूर असली तरी आपल्याजवळ असल्यासारखी वाटणे.

**दुरी ते जवळी । स्नेहे आकाशा कवळी ॥** तु. म. १९१५

**अर्थ :-** ज्याविषयी अतिस्नेह अशी वस्तु दूर असली तरी ती वस्तु जवळ असल्यासारखीच आहे. कारण स्नेह हा आकाशाला कवळण्याएवढा मोठा आहे.



मनुष्याच्या हातात चांगला संकल्प करणे व सत्कर्माला हात लावणे हे आहे. पण त्याला योग्य फळ देणे ईश्वराच्या आधीन आहे.

**धरूनि हे आलो जीवीं । भेटी व्हावी विठोसी ॥ १ ॥**
**संकल्प तो नाही दुजा । महाराजाविण तो ॥ २ ॥** तु. म. ८३३

अर्थ :- मला विठोबाची भेट व्हावी, हीच वासना जीवामध्ये = (मनांत) धरून आलो आहे. (मी विनंतीपूर्वक सांगतो कीं) श्रीहरी महाराजावांचून माझ्या हृदयात दुसरा कोणताच संकल्प नाही.

एखाद्याला विचारले, बाबारे तूं परमार्थ कां करीत नाहीस, तर तो उत्तर देतो कीं, आमच्यांकडून ते नियम पाळणे शक्य नाही या प्रश्नाचे उत्तर भगवान अर्जुनाला अगदी उत्कृष्ट रितीने देतात.

**तरी पार्था हे झणे । सायास घेसी हो मने ।**
**वायां बागुल इये दुर्जने । इंद्रियें करिती ॥** ज्ञा. ६-३६१

अर्थ :- तरी अर्जुना, यात कष्ट आहेत असा तुझा मनाचा आग्रह कदाचित् होऊन बसेल, तर तो तसा होऊ देऊ नकोस. ही दुष्ट इंद्रियें याचा उगाच बाऊ करतात.

**उचित न कळे इंद्रियांचे ओढी । मुखे बडबडी शिकले ते ॥** २८४६

**अर्थ :-** जे कोणी इंद्रियांच्या आधीन झालेले आहेत, त्यांना योग्य काय ते कळत नाही. ते आपल्या गुरुजवळ जे काही शिकले असतील त्याची ते कोरडी बडबड मात्र करतात.

मनुष्य जन्माला येतांना तंबाखू, विडी वगैरे कोणतेहि व्यसन बरोबर घेऊन येत नाही. त्याच्याकडून तो फाजीलपणा संगतीने होत असतो. म्हणून तुकाराम महाराज सांगतात -

**नये बोलो फार बैसो जनामधी ।**
**सावधान बुद्धी इंद्रियदर्मी ।। तु. म. २७१७**

**अर्थ :-** साधकाने फार बोलू नये व भोगासक्त लोकांमध्ये फार वेळ गप्पा मारू नये. तसेच आपली बुद्धी सावध ठेऊन इंद्रियदमन करावे. खरा धर्म म्हणजे इंद्रियनिग्रह होय. पण लोकांना इंद्रिय निग्रह म्हणजे मूर्खपणा व आळशीपणा असा समज होऊन बसला आहे. लोकांना कळते पण वळत नाही. इंद्रिये दुर्जन आहेत. ते स्वभावतः आपापल्या विषयाकडे धावतात.

**जिव्हा रसाकडे वोढी । तृषा प्राशनालागी तोडी । शिश्नासी रतिसुखाची गोडी । ते चरफडी रमावया ।। त्वचा पाहे मृदुपण । उदर वांछी पूर्ण अन्न । श्रवण मागती गायन । मधुरध्वनी आलापु ।। घ्राण उद्यत परिमळा । रूप पहावया वोढी डोळा । हस्त वांछिती खेळा । नाना लीळा स्वभावें ।। पाय वांछिती गती । ऐशीं इंद्रियें वोढा वोढिती । जेवी एका गेहपती । बहुतां सवतीं तोडिती ।। ए.भा.९-३१५-१८**

**अर्थ :-** जिव्हा रसाकडे ओढ घेत असते तृष्णा प्राशन करण्याकरिता जीव तोडते. शिश्नाला रतीसुखाची गोडी असल्यामुळे त्यात रममाण होण्याकरिता ते धडपडत असते. मऊ असेल ते त्वचा पहात असते, पोट भरपूर अन्न मिळण्याची इच्छा करीत असते. गायन, मंजूळ ध्वनी, आलाप हे कान मागत असतात. नाक सुगंधाकरिता उद्युक्त झालेले असते. सुस्वरूप पाहण्याकरिता डोळा ओढीत असतो. अनेक प्रकारचे खेळ खेळावेत, मनास वाटतील त्या नानाप्रकारच्या लीला कराव्यात, यासाठी हात धडपडत असतात. पायांना इकडे तिकडे हिंडावेसे वाटते. ज्याप्रमाणे घरामध्ये एका नवऱ्याला पुष्कळ बायका असल्या म्हणजे त्याला सवती-सवती तोडतोडून घेतात, त्याप्रमाणे इंद्रिये आपापल्या



आवडीप्रमाणे त्या जीवाला ओढीत असतात.

म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, अरे, तूं इंद्रियांच्या आधीन होऊ नकोस.

**निजवृत्ती काढी सर्व मााया तोडी । इंद्रिया सवडी लपों नको ।। ४ ।।**

ब्रह्मदेवाने सर्व सृष्टी निर्माण केली तेव्हा सर्वांना वर्णाश्रम धर्माचे नियमहि घालून दिले आहेत.

**तुम्हा वर्णविशेषवशें । आम्ही हा स्वधर्मुचि विहिला असे ।**
**याते उपासा मग आपैसे । काम पुरती ।। ज्ञा. ३-८८**

**अर्थ :-** तुम्हाला वर्णानुसार असा हा स्वधर्मच आम्ही सांगितला आहे, याचे आचरण करा म्हणजे तुमच्या मनातील इच्छा आपोआप पूर्ण होतील.

आणखीहि सांगतात, तुम्ही इकडे-तिकडे लक्ष न देता, इंद्रिये मोकळे सोडू नका.

**म्हणऊनि निजवृत्ती हे न संडावी । इंद्रियें बरळो नेदावी ।**
**ऐसें प्रजांतें शिकवी । चतुराननु ।। ज्ञा.३-११६**

**अर्थ :-** म्हणून स्वधर्माचरण सोडू नये. इंद्रियांना भलत्याच मार्गाने जाऊ देऊ नये, असा ब्रह्मदेवाने प्रजेला उपदेश केला आहे. (जीवनमुक्त झाला तरी त्याने इंद्रियांकडे लक्ष देऊ नये.)

**म्हणोनि इंद्रियें एके । जाणतेनि पुरुखे ।**
**लाळावी ना कौतुके । आदिकरूनि ।। ज्ञा. ३-२०२**

**अर्थ :-** म्हणून कोणीहि शहाण्या मनुष्याने ह्या इंद्रियांचे मौजेने देखील लाड करू नयेत.

या इंद्रियांचा स्वभाव वाईट आहे.

**या विषयांवांचूनि काही । आणिक सर्वथा रम्य नाही ।**
**ऐसा स्वभावोचि पाही । इंद्रियांचा ॥** ज्ञा. २-१२०

**अर्थ :-** पहा, इंद्रियांचा स्वभाव असा आहे कीं, त्यांना या विषयावांचून अन्य कांही गोड वाटत नाही.

एवढ्याकरिता ज्ञानेश्वर महाराज सांगतात, तीर्थव्रतांच्या ठिकाणी तूं विश्वास ठेव, नेहमी दया बाळग, कारण जेथे दया, क्षमा, शांति असते, तेथे देवाची वस्ती असते. म्हणून तूं आपल्या हृदयांत शांति, दया ठेऊन तेथे श्रीहरी वस्तीला येईल असे कर.

**तीर्थव्रतीं भाव धरी रे करुणा । शांतिदया पाहुणा हरी करी ॥ ५ ॥**

**जंव हे सकल सिद्ध आहे । हात चालावया पाय । तंव तूं आपुले स्वहित पाहे । तीर्थयात्रें जाय चुकों नको ॥** तु. म. ७२२

**अर्थ :-** अरे, जोपर्यंत इंद्रियांसह हा देह सुदृढ आहे, हात हे देण्याघेण्यास व पाय हे चालण्यास समर्थ आहेत तोपर्यंत तूं आपल्या स्वहिताचा विचार कर आणि तीर्थयात्रेला जाण्यास चुकू नको. तीर्थयात्रेने देहतादात्म्य सुटते व आत्मशांति प्राप्त होते.

ज्ञानेश्वर महाराज अभंगाच्या शेवटी फार गोड विचार सांगतात कीं, (माझे श्रीगुरु निवृत्तिनाथांनी सांगितलेला हरिपाठ हा संजीवन समाधि आहे.)

(जिवंत समाधि म्हणजे काय ? तर जिवंत असतांना अखंड नामस्मरणाचे सुख भोगणे म्हणजेच जिवंत समाधि होय.) मरता मरता मुखाने नामस्मरण करणे ही जिवंत समाधि नाही.



**ज्ञानदेवा प्रमाण निवृत्तिदेवीं ज्ञान । समाधि संजीवन हरिपाठ ॥**

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मला निवृत्तिनाथांचे प्रमाण मान्य आहे. म्हणून हरिपाठ ही जिवंत समाधि आहे हे मी मानतो.

**सर्वकाळ नामचिंतन मानसीं ।**
**समाधान मनासीं समाधि हे ॥** तु. म. ७५९

**अर्थ :-** मी मनाने हरिनामाचे चिंतन सर्वकाळ करीन, त्यायोगाने माझ्या मनाचे समाधान होणे हीच माझी खरी समाधि होय.

ज्ञानेश्वर महाराज आपल्या श्रीगुरु निवृत्तिनाथ महाराजांचा अनुभव सांगतात आणि असे म्हणतात कीं, मला श्रीगुरूंनी हेच सांगितले.

**बापरखुमादेवीवरु न विसंबे सर्वथा । निवृत्तीने तत्त्वता सांगितले ॥**
**तो मज व्हावा तो मज व्हावा । वेळोवेळा व्हावा पांडुरंग ॥** ज्ञा.म.

सृष्टीतील सजातीयादि भेदरूपी वैषम्य काढून (स्वगत, सजातीय, विजातीय भेद यांचे वैषम्य काढून शिवापासून तृणापर्यंत एकरूपाने वास्तव्य करणाऱ्या हरीचे समबुद्धीने ग्रहण केले तर (आत्मस्थिति) समाधि प्राप्त होते. जर बुद्धितील सजातीय, विजातीय हे भेद गेले नसतील तर अशा भेदात्मक बुद्धीस हरीची समाधि कधीहि प्राप्त होणार नाही. केशवास, आत्म्यास यथार्थ तत्त्वे करून जाणणे यावांचून दुसरे नाही. त्याने जगातील सर्व सिद्धींचा लाभ होतो.

**समाधि हरीची समसुखेवीण । न साधेल जाण द्वैतबुद्धी ॥ १३ ॥**

तुकाराम महाराज समाधीचे लक्षण सांगतात -

**सदा नामघोष करूं हरिकथा । तेणे सदा चित्ता समाधान ॥ १ ॥**
**असो ऐसा कोठे आठवचि नाही । देहीच विदेही भोगू दशा ॥ २ ॥**
तु. म. ४०२८

अर्थ :- आम्ही सर्वकाळ नामघोष करून हरीची कथा करतो. त्यामुळे आमच्या चित्तात सर्वकाळ समाधान असते. आम्ही कोठे आहोत, याविषयाची आठवणच नाही, अशी विदेहपणाची अवस्था आम्ही देहात असून भोगतो - ही खरी समाधि आहे.

भगवान श्रीकृष्ण उद्धवाला हेच सांगतात -

**देहंच नश्वरमवस्थितमुत्थितं वा सिद्धो न पश्यति यतोऽध्यगमत्स्वरूपम् । दैवादपेतमुत दैववशादुपेतं वासो यथा परिकृतं मदिरामदान्धः ॥ ए. भा. १३-३६**

अर्थ :- या ज्ञानी सिद्धाला स्वरूपाचा साक्षात्कार झालेला असतो. म्हणून तो, हा नश्वर देह पडला आहे किंवा उठून चालतो आहे हे कांही पहात नाही. (आपल्या स्वतःच्या देहाची ही गोष्ट, तर इतर देहांविषयी तो काय पाहणार ?) पूर्वकर्माप्रमाणे त्या देहाची हालचाल कोणत्याहि प्रकारची झाली तरी त्याला त्याची खंती वाटत नाही. दारू पिऊन धुंद झालेल्या माणसाला, आपले वस्त्र नेसलेले आहे कीं सुटलेले आहे, याचे भान किंवा पर्वा नसते. (त्याप्रमाणे सिद्धपुरुषाची स्वदेहासंबंधी स्थिती असते. तो देहाभिमानरहित असा नित्य ध्यानारूढ असतो.)

**जया देहाचेनि मद्भजनें । माझे शुद्ध स्वरूप पावणें । त्या देहासीं विसरिजे तेणें । मी माझेपणें देखेना ॥ जेवीं कां भाडियाचें घोडें । जेणे आणिले निजधामा रोकडें । तें आहे कीं गेले कोणीकडे । हे स्मरेणा पुढें तो जैसा ॥ हो कां भेटावया भ्रतारासी । सवे मजुर आणी विश्वासी । ते पतीसी पहुडल्या राणिवसी । त्या मजुरासी विसरली ॥ कां जो दैवयोगें पालखी चढे । तो पूर्वील तुटके मोचडे । आहेत कीं गेले कोणीकडे । हें स्मरेणा पुढे तेणे हरिखें ॥ ए. भा. १३-५८९-५८२**



अर्थ :- जो ज्या देहाने माझे भजन करून माझ्या शुद्ध स्वरूपाला पोहोचतो त्या देहालाच तो विसरतो आणि मी किंवा माझेपणाने तो ह्या देहाकडे पहातच नाही. ज्याप्रमाणे एखाद्याने भाड्याचे घोडे आपल्या घरापर्यंत आणलेले असते, पण त्याचे कार्य झाल्यावर पुढे ते घोडे आहे कीं कोणीकडे गेले ह्याची त्याला आठवणहि होत नाही. किंवा एखादी स्त्री माहेराहून नवऱ्याला भेटण्यासाठी निघाली असता बरोबर एखादा विश्वासू मजूरदार आणते, पण ती स्त्री अंतःपूरात जाऊन नवऱ्यापाशी निजली म्हणजे मग त्या मजुराला विसरून जाते. किंवा दैवयोगाने जो पालखीत बसतो, तो मग पूर्वीची आपली फाटकी पादत्राणे आहेत कीं कोणीकडे गेली ह्याची त्याला या आनंदापुढे आठवण रहात नाही.

भगवंतांनी अर्जुनाला गीता सांगितली व सहज समाधि देऊन युद्धांत प्रवृत्त केले. परंतु त्याची समाधिहि मोडली नाही व युद्ध मात्र पार पडले.

**अर्जुना देऊनि समाधि । सवेचि घातला महायुद्धीं । परी कृष्ण कृपानिधी । तटस्थ त्रिशुद्धीं न करीच ॥ ए.भा.१३-७०६**

अर्थ :- अर्जुनाला समाधि लावली आणि लागलीच त्याला घोर युद्धांत घातले. दयानिधी श्रीकृष्णांनी त्याला खरोखर तटस्थ (क्रियाशून्य) असा केला नाहीच.

शरीराच्या क्रिया होत असतांनाहि, सर्व व्यवहार होत असतांनाहि त्या महात्म्यांच्या समाधीत भंग होत नाही.

तद्वत् तुकाराम महाराजांनीहि समाधीचे खरे स्वरूप सांगितले -

**तुका म्हणे सुख समाधि हरिकथा ।**
**नेणे भवव्यथा गाईल तो ॥ तु. म. २१४२**

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, हरिकथा हीच केवळ खरी सुखाची समाधि आहे. जो हरिकथा गाईल तो संसाराचे दुःख जाणणार नाही. (म्हणजे त्याचा संसार दुःखसंबंधरहित सुखरूप होईल.)

(भगवन्नामाने जिवंत समाधि मिळते तीच खरी समाधि होय.) म्हणजेच (जिवंत असतांना अखंड नामस्मरणाचे सुख भोगणे यालाच खरी संजीवन समाधि म्हणतात.

**लुब्धली नादी लागली समाधि । मूढ जन नरनारी लोका रे ।**
**पंडित ज्ञानी योगी महानुभाव । एकचि सिद्धसाधका रे ॥ २४०**

**अर्थ :-** त्या टाळमृदंगघोषाच्या नादाला लुब्ध होऊन मूढ, जन, स्त्रिया, पुरुष, पंडित, ज्ञानी, योगी, महानुभवी, सिद्ध, साधक या सर्वांना एकच समाधी लागली.

म्हणून ज्ञानेश्वर महाराज हेच शेवटच्या चरणात सांगतात -

**ज्ञानदेवा प्रमाण निवृत्तिदेवीं ज्ञान । समाधि संजीवन हरिपाठ ॥**

तात्पर्य, सारभूत अशी समाधि अखंड लागण्याकरिता नामस्मरण करा असा सर्वांना उपदेश करतात कीं, तुम्ही मुखाने हरि हरि म्हणा.

**हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा ।**
**पुण्याची गणना कोण करी ॥ धृ ॥**

**- समाप्त -**

*******

## * अभंग अठ्ठाविसावा *

**नामसंकीर्तन साधन पैं सोपें ।**
**जळतील पापें जन्मांतरें ॥ १ ॥**
**न लगती सायास जावें वनांतरा ।**
**सुखें येतो घरा नारायण ॥ २ ॥**
**ठायींच बैसोन करा एकचित्त ।**
**आवडी अनंत आळवावा ॥ ३ ॥**
**रामकृष्णहरि विठ्ठल केशवा ।**
**मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ४ ॥**
**याविण आणीक असतां साधन ।**
**वाहातसें आण विठोबाची ॥ ५ ॥**
**तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनि ।**
**शहाणा तो धणी घेतो येथें ॥ ६ ॥**

**अर्थ :-** हरिनामसंकीर्तन करणे हे सर्व साधनांपेक्षा फार सोपे आहे, त्यायोगाने मागील अनेक जन्मांची पापें जळून जातील. ॥ १ ॥ ह्या नामस्मरणावांचून दुसरे कोणतेहि सायास करणे नको व वनांतरास जाणे नको, ह्या योगाने नारायण सुखाने घरी येतो. ॥ २ ॥ एका ठिकाणी बसून व एकचित्त करून मोठ्या प्रितीनें अनंतास आळवावे. ॥ ३ ॥ 'रामकृष्ण हरि विठ्ठल केशवा' ह्या मंत्राचा जप सर्वकाळ करावा. ॥ ४ ॥ ह्यावांचून जर आणिक दुसरे काही साधन असेल, तर मी विठोबारायाची शपथ वाहून सांगतो. (दुसऱ्या साधनाने देवाची त्वरीत प्राप्ती होणार नाही.) ॥ ५ ॥ तुकाराम महाराज म्हणतात, नामसंकीर्तन हे साधन सर्व साधनांपेक्षा सुलभ आहे. म्हणून जो कोणी शहाणा असेल. तो याठिकाणी आपली इच्छा पूर्ण करून घेईल. ॥ ६ ॥

भूमिका :- देहूचे सुप्रसिध्द साधु जगद्गुरु श्री संत तुकाराम महाराज यांचा हा प्रसिद्ध अभंग आहे. तुकाराम महाराजांच्या गाथेमधील हा नामपर प्रकरणातील अती महत्त्वाचा अभंग आहे. वारकरी सांप्रदायामध्यें ज्ञानेश्वर महाराजांचा हरिपाठ हा नेहमीच म्हटला जातो. त्या हरिपाठातील सत्तावीस अभंग म्हटल्यानंतर तुकाराम महाराजांचा हा अठ्ठाविसावा अभंग म्हटला जातो. ज्याप्रमाणे ब्राह्मणांची संध्या नित्य केली जाते.

अहरहः **स्नात्वा संध्यामुपासीत** ॥ त्याप्रमाणे वारकरी म्हटला कीं तो नित्य नियमाने हरिपाठ म्हणतो. हरिपाठ हा वारकऱ्यांची संध्याच आहे. त्या हरिपाठाचे शेवटी हरिपाठाला पूरक अशी या अभंगाची निवड केली गेली. निवड करण्याऱ्याने काय बुद्धि खर्च केली आहे; याबद्दल आनंद वाटतो. प्रस्तुत जो अभंग आहे तो अभंग तुकाराम महाराजांनी कोणत्या वृत्तीनें लिहिला तर करुणावृत्तीने लिहिला. कारण साधुच्या ठिकाणी अनाथ प्राण्यांविषयी फार कळकळ असते. हेच नाथ महाराज सांगतात.

दयार्णवे द्रवली दृष्टी । तनु मन धन वेंचूनि गांठी ।
**अनाथावरी करुणा मोठी । उद्धरी संकटी दीनातें ॥ १०४६ ॥**
**जैसा कळवळा निजस्वार्था । त्याहून अधिक अनाथभूतां ।**
**ती नांव परम कारुण्यता । जाण तत्त्वतां उद्धवा ॥** ए.भा.११-१०४७

**अर्थ :-** दयेच्या समुद्रानेच त्याची दृष्टी भरून गेल्यामुळे तो आपले तन-मन-धन खर्च करूनहि अनाथांवर अत्यंत दया करतो आणि दीनदुबळ्यांना संकटातून मुक्त करतो. ॥ १०४७ ॥ त्याला आपल्या स्वार्थाचा जितका कळवळा असतो, त्याहूनहि अधिक कळवळा त्याला अनाथ प्राण्यांच्या ठायी असतो. उद्धवा ! [illegible] त्याचेच



नांव पूर्ण दया ॥ १०४८ ॥

''संत म्हटला की मूर्तिमंत दयाच'', जगद्गुरु तुकोबाराय याला अपवाद कसे ठरतील !

**भूतांची दया हे भांडवल संतां ।**
आपुली ममता नाहीं देहीं ॥ तु. म. २१९५-४

अर्थ :- भूतमात्रांवर दया करणे हेंच संतांचे भांडवल आहे, त्यांना आपल्या देहाची ममताच नाहीं.

वैराग्याचे बळ नसलेल्या पुरुषांना आत्मलाभ प्राप्त होत नाही.

**नायमात्मा बलहीनेन लभ्यो** ॥ मुण्ड. उप. ३-२-४

अर्थ :- हा आत्मा बलहीनास आत्मनिष्ठाजनित वीर्याने हीन असलेल्या पुरुषास लभ्य नसतो. ( प्राप्त नसतो. )

अशा विषयासक्त जीवांची तुकाराम महाराजांना दया उत्पन्न झाली. तुकाराम महाराज हे मोठे साधु वैद्यहि होते. त्यांनी या लोकांकरिता औषध शोधून काढले. लोकांना औषध कसे पाहिजे - १) आयते २) गोड ३) सतत ४) मोफत ५) न मागता ६) घरी आणून दिलेले असे षड्गुण संपन्न पाहिजे.

लोकांचा रोग बरा व्हावा ही तळमळ दयाळू वैद्यांना असते. आपला पदरचा पैसा खर्च करून औषध देणारे यांना दयाळू वैद्य म्हणतात. उदा. अण्णासाहेब पटवर्धन महर्षि पुणे व घोडनदीचे दादा असे दयावंत वैद्य होऊन गेले. हे रोग्यांच्या घरी जाऊन मोफत औषधे देत असत. रोगी पूर्ण बरा होईपर्यंत सर्व खर्च स्वतःचा करीत असत. काही वैद्य पैसे घेऊन रोग्यांना औषधे देतात. तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही तसे नाहीत.

**नव्हो वैद्य आम्ही अर्थाचे भुकेले ।**
**भलते द्यावे पाले भलत्यासी ॥** तुः म. ३५१६

**अर्थ :-** जे वैद्य लोभाने औषध देण्याच्या निमित्ताने भलत्या रोग्यास भलती वनस्पती देऊन पैसे मिळवितात, तसे आम्ही अर्थाचे आशेखोर नव्होत.

तुकाराम महाराज हे लोकांचा रोग जाण्याकरिता (पाप जाण्याकरिता) गोड औषध देतात (ते भगवंताचे नाम) तसेच ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**देखें रोगाते जिणावे । औषध तरी देयावे ।**
परी ते अतिरुच्य व्हावे । मधुर जैसें ॥ ज्ञा. ॥ ज्ञा.३-६९

**अर्थ :-** हे पहा, रोग हटविण्याकरिता औषध तर द्यावे, पण ते औषध ज्याप्रमाणे, अतिशय रुचकर आणि गोड असावे. साधुंची दया फार मोठी असते.

**येतो हिताचा कळवळा ।**
**पडती हार्ती म्हणोनि काळा ॥ २ ॥** तु. म.३५०४

**अर्थ :-** जे वाईट लोक आहेत ते काळाच्या मुखीं पडतात, म्हणून त्यांच्या हिताविषयी आमच्या मनांत कळवळा उत्पन्न होतो. मनुष्य जन्म मिळूनहि ते काळाच्या हातात पडतील तेव्हा त्यांचे हित कशांत आहे तर मनुष्य जन्माचे साध्य काय व जन्माची सफलता कशांत आहे तर ती भगवत् दर्शनांत आहे.

**तुका म्हणे जन्मा आल्याचे सार्थक ।**
**विठ्ठलची एक देखिलिया ॥** तु. म.२५८९

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, एका विठोबारायाचे दर्शन घेतल्याने आपण मनुष्यजन्माला आल्याची सफलता होते.



तुकाराम महाराजांना असे वाटले कीं लोक परमार्थ सोडून प्रपंचात कां गुंतले व परमार्थ कां करीत नाहीत याचे कारण त्यांना समजले. या लोकांना परमार्थ कठीण वाटतो कां तर त्यांची साधनें कठीण आहेत म्हणून.

**अवघड कोणी न करी सांगता । सुलभ बहुतां गोड वाटे ॥** ३०३३

**अर्थ :-** कोणाला कठीण गोष्ट (धर्माप्रमाणे वाग, हरिभक्ति कर ही गोष्ट) सांगितली असता, अति कठीण म्हणून ती कोणी करीत नाहीत, बहुतेक सर्व लोकांना सोपे असेल ते (स्वैर वर्तन) बरे वाटते. परमार्थाची कटीण साधनें कोणती ? तर -

१) योग २) ज्ञान ३) कर्म या साधनांना वैराग्य, शम, दम यांची जरुरी आहे. परंतु ही साधनें कठीण आहेत. म्हणून तुकाराम महाराजांनी प्रस्तुत अभंगाच्या प्रथम चरणांत सगळ्यांना झेपेल, साधेल असे सोपे साधन सांगितले.

**नामसंकीर्तन साधन पै सोपे । जळतील पापें जन्मांतरें ॥ १ ॥**

तुकाराम महाराज नामसंकीर्तन हें जे सोपे साधन सांगतात, तें गीतेतील भगवत्भक्तीला धरूनच सांगतात.

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ।**
**नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥** गी.९-१४

**अर्थ :-** सदा माझा नामघोष करणारे (अष्टांग योगमार्गानें माझ्या प्राप्तीसाठी) निश्चयपूर्वक प्रयत्न करणारे व मला भक्तिपूर्वक (सर्व मीच आहे असे समजून सर्वत्र मला) नमस्कार करणारे, असे (माझ्या ठिकाणी) नित्य चित्त लावणारे माझी उपासना करतात.

असे सोपे साधन ध्येयापर्यंत पोचविणारे नामसंकीर्तन आहे.

परंतु इतर साधनें करीत असतांना निदान तोंड तरी धुवावे लागते. परंतु नामस्मरणात तसे नाही.

**म्हणोनि गोड सर्वभावे । आंघोळी न लगे तोंड धुवावे ॥** २५१०

याचा अर्थ कोणी तोंड धुऊ नये, स्नान करू नये असा नाही, इतर साधनात त्याची जरुरी आहे. उदा. संध्या:- स्नानावांचून संध्या केली तर फळ मिळत नाही किंवा बहिर्दिशेला न जाता स्नान केले तर स्नान करण्याचे श्रेय पुण्य मिळत नाही. तसे भगवंताच्या नामस्मरणाचे नाही.

**काळ वेळ नाम उच्चारिता नाहीं । दोन्ही पक्ष पाहीं उद्धरती ॥**

**अर्थ :-** हरीचे नाम घेण्याला शुद्ध काळवेळेची जरुरी नाही. ते हवे तेव्हा घ्यावे. त्या योगाने आपल्या आईचे कुळ व बापाचे कुळ अथवा नाम घेणारा व ऐकणारा या दोहोंचाहि उद्धार होतो.

नामस्मरण हे अंथरूणावर पडल्या पडल्या किंवा शौचास गेले नाही तरी नाम घेता येते.

**बैसलिये ठायीं म्हणता रामराम ।**
**काय होय श्रम ऐसे सांगा ॥** तु. म. २६५३

अर्थ :- बसल्या ठिकाणी राम राम म्हटल्यानें तुम्हास कोणते श्रम होतील ? तें सांगा.

**शुभाशुभी कर्मी न करी नामाचा आळसु ।**
**सुखे निरंतरी ध्याईध्याई हृषीकेशु ॥** ज्ञा. म.

**अर्थ :-** त्या परमात्म्याचें नामस्मरण आळस न करिता शुभाशुभ कर्मकालीहि करावे व निरंतर त्या हृषीकेशाचे ध्यान करावें.

न्यायशास्त्र आदिकरून जी शास्त्रें आहेत त्या शास्त्राकरिता बुद्धीची जरुरी आहे. परंतु भगवंताच्या नामस्मरणांत त्याची जरुरीच



नाही. **'येईल तैसा बोल रामकृष्ण'**

उदा. एक भगवत्‌भक्त माळी होता. तो मोट हाकीत असतांना अभंग म्हणत होता. तो अभंग असा **द्वारकेचे केणें आले याचि ठायां । पुढें भक्तराया चोजवीत ।** तु. म. २६२५ (चोजवीत म्हणजे शोधित) पण तो माळी बोबडा असल्यामुळें मोठ्या प्रेमाने - पुढे भक्तराया चोदवीत । असे म्हणत होता. हे एका शास्त्रीबोवाने ऐकले. तेव्हा शास्त्रीबोवा त्या माळ्याला म्हणाले, 'तूं देवाला शिव्या देतोस.' मग माळ्याने भजन बंद केले. तेव्हा भगवान शास्त्रीबोवाच्या स्वप्नात आले व छातीवर बसले. ''तूं देवाला शिव्या देतोस असे त्या माळ्याला कां बोललास ? आता मी तुझा प्राण घेतो. पण तूं जर त्या माळ्याला पूर्वीप्रमाणेच भजन करण्यास सांगितले तर मी तुझा प्राण घेणार नाही.'' मग शास्त्रीबोवा त्या माळ्याकडे गेले व त्याला म्हणाले, ''तुझे भजन बरोबर आहे. त्या देवाला शिव्या नाहीत. तूं पुन्हा तसेच भजन कर.'' मग तो माळी पुन्हा पूर्वीसारखाच उच्चार करून भजन करू लागला.

**अबद्ध वाकुडे जैशातैशापरी । वाचे हरि हरि उच्चारावे ॥** तु. म. ८०२

असे नामस्मरण सोपे आहे.

**ज्ञानदेव म्हणे नाम हे सुलभ । सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे ॥**

**अर्थ :-** ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हरीचे नाम सर्व पारमार्थिक साधनांत सोपे आहे. पण तें सर्व मनुष्यांना दुर्मिळ झाले आहे. कारण, हरीचे नाम कोणी घेत नाही. त्याची सुलभता व योग्यता जाणून तें नाम सदोदित घेणारा पुरुष क्वचितच आढळून येतो.

मग कोणी म्हणेल नाम हे जर सुलभ आहे व सोपे आहे तर त्याचे फलहि तितकेच (सामान्य) असेल. त्याचे उत्तर तु. म.

अभंगाच्या प्रथम चरणाच्या उत्तरार्धात त्या नामाचे प्रयोजन (फल) सांगतात. **जळतील पापें जन्मांतरें ॥ १ ॥**

मागे अनेक जन्मांत आपल्याकडून झालेल्या निषिद्ध कर्मांच्या आचरणाने जी पापें घडली ती सर्व भस्म होऊन जातात.

१) काही औषधें रोगापासून मुक्त करतात, पण शक्ति नाहीशी करतात ; कारण शक्ति आणणारी औषधें वेगळी असतात.

२) पण काही औषधें अशी असतात, रोगहि नाहीसा करतात व शक्तिहि आणून देतात.

त्याचप्रमाणे काही साधनें फक्त पाप निवृत्ति करतात, पण भगवंताचा साक्षात्कार करून देत नाहीत.

परंतु भगवंताचे नाम जन्मांतरीची पापें नष्ट करते हे सांगितले. आतां अभंगाच्या द्वितीय चरणात भगवंताचे नाम भगवंताची प्राप्तीहि करून देते हे सांगतात.

**न लगती सायास जावें वनांतरा । सुखे येतो घरा नारायण ॥ २ ॥**

भगवंताचे नाम घेणाऱ्याला वनांत जाण्याचे सायास (कष्ट) करण्याचें कारण नाही. जे ध्यानयोगी आहेत त्यांना डोंगराच्या गुहेत अथवा दाट वेली व झाडे असलेल्या गुहेत राहावे लागते. असे भगवान सांगतात.

**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ।** गी.१८-५२

अर्थ :- एकांत सेवन करणारा, मिताहारी, वाणी, शरीर व मन यांचे नियमन केलेला ध्यानयोगपर वैराग्याचा नित्य आश्रय केलेल्या अशा साधकाला वनांतराला जावे लागते. परंतु भगवंताचे नामसंकीर्तन हे असे



साधन आहे कीं, नामधारकाला दुसरीकडे जावयास नको. कारण ज्या ध्यानयोग्याला देवाच्या शोधाकरिता वनात जावे लागते तो देव नामधारकाच्या घरी येतो. **सुखे येतो घरा नारायण ॥ २ ॥**

असा या भगवत् नामाचा प्रभाव (सामर्थ्य) आहे. वास्तविक भगवंताचे दर्शन होणे ही अत्यंत दुर्लभ गोष्ट आहे. ती किती दुर्लभ आहे हे ज्ञानेश्वर महाराज सांगतात -

**जो जन्मसहस्रांचियासाठी । इंद्रादिकाहीं महागु भेटी ।** ज्ञा. ६-१४६

अर्थ :- इंद्रादिकांना देखील हजारो जन्म घेतले तरी ज्याची भेट होणे दुर्लभ, काही साधकांना ऋद्धिसिद्धीच्या जोरावर सोन्याचे पर्वत करता येतात. एवढेच नव्हे तर रानोरान कल्पतरु निर्माण करता येतात. पण त्यांना सुद्धा भगवंताचे पाय दुर्लभ आहेत असे तुकोबाराय सांगतात.

**सोन्याचे पर्वत करवती पाषाण । अवघे रानोरान कल्पतरु ॥ १ ॥**
**परि या दुर्लभ विठोबाचे पाय । तेथे हे उपाय न सरती ॥ २ ॥**
तु. म. ६३६

अर्थ :- काही एक सिद्धीच्या जोराने मोठमोठें दगडाचे पर्वत देखील सोन्याचे करता येतील. रानोरान असलेल्या सर्व वृक्षांचेहि कल्पतरु करिता येतील. ॥ १ ॥ परंतु ह्या पांडुरंगाचे चरण प्राप्त होणे फार कठीण आहे, त्यांचे ठिकाणी हे उपाय सरते होत नाहीत. ॥ २ ॥ असा दुर्लभ जो परमात्मा तो या नामसंकीर्तनाने किती सुलभ होतो हे तुकोबाराय सांगतात -

**सुखें येतो घरा नारायण ॥ २ ॥**

**येतो बैसलिया ठाया । आसनें व्यापी देवराया ।**
**निर्मळ तें काया । अधिष्ठान तयाचें ॥** तु. म. २७२४

अर्थ :- तो हरि आपण ज्याठिकाणी बसलो आहोत, त्याठिकाणी

Scanned by CamScanner

आपणहून येतो व ज्या जागेत भक्त राहतात, तें स्थळ व्यापून टाकतो. जो देह श्रीहरीच्या चिंतनानें शुद्ध झाला आहे. तेथे हरीची वस्ती होते.

वनांत न जाता घरदार प्रपंच न सोडता देव सुखाने घरी येतो. वनांत कष्ट घेण्याचे काहीच कारण नाही. साधकाने घरीच राहावे पण घरी राहून काय करावयाचे हे अभंगाच्या तिसऱ्या चरणांत सांगतात -

**ठायींच बैसोन करा एक चित्त । आवडी अनंत आळवावा ॥**

ठायीच बैसोन म्हणजे घरात बसून काय करावे याचे उत्तर तुकाराम महाराज सांगतात तें असे -

चित्त एकाग्र करावे व भगवंताचे नाम आवडीनें गावें व आवडीनेंच आळवावे. परंतु हीच गोष्ट फार कठीण आहे. त्याचे कारण तुमचे आमचे चित्त नामस्मरण करतांनाहि फाकलेलें असतें.

**नाम घेतां हे वैखरी । चित्त धांवें विषयांवरी ॥ १ ॥**
**कैसे होता हे स्मरण । स्मरणामाजी विस्मरण ॥ २ ॥**
**नामरूपा नव्हता मेळ । नुसता वाचेचा गोंधळ ॥ ३ ॥** ए. म.

घरी बायका-मुलात व्यापलेले चित्त एकाग्र होणे फार कठीण आहे. वाचेने नामस्मरण चाललेले आहे व चित्त बाहेर फाकलेले आहे; मग ते शरीर प्रेतच समजावे असे तुकाराम महाराज म्हणतात.

**जवळीं नाहीं चित्त । काय मांडियेले प्रेत ॥** तु. म.२८९२

**अर्थ :** हरीच्या कथेमध्ये बसून जर चित्त कथेत नसेल तर त्याचा काय उपयोग ? तो मनुष्य जणू काही शृंगारलेले प्रेतच मांडून ठेवले आहे.

१) परमार्थात चित्त २) संसारात वित्त = पैसा ३) शरीरात पित्त (जठराग्निप्रदिप्त) परमार्थ हा चित्तानें होणारा आहे.

**थोडें आहे थोडें आहे । चित्त साह्य झालिया ॥** तु. म.३३३३



**अर्थ :-** जर खरोखर परमार्थामध्ये आपणास चित्त मदत करील, तर परमार्थ अगदी सुलभ आहे.

**देवाकारणे भाव तस्मात । द्यावें न लगे फारसे वित्त । झाले एक चित्त तरी बहुत । तेवढ्यासाठी नका करूं वाताहात गा ॥** तु. म.४०५३

**अर्थ :-** देवाला द्रव्याची काही फारसी गरज नाही. एकचित्त करून एकभाव अर्पण केल्यास तें त्याला फार आहे, एवढ्याकरिता तुम्ही आपला नाश करून घेऊ नका.

उदा. - तंबूला आठ बाजूंनी तणावे (खुंट्या) असतात. तंबू मोडण्याकरिता तणावे कापावे लागतात. त्या वेळेला तो तंबू मोडतो. तसे आपण किती जरी दूर गेलो तरी बायकोमुलांचे तणावे वासनेच्या खुंट्यांनी बांधलेले आहेत. त्या वासना कमी झाल्या शिवाय चित्ताचें परमार्थात साह्य मिळत नाही.

उदा. :- एखाद्याचे लग्न झाले. त्याची बायको माहेरी गेली पण मनात ती वासनारूपाने राहतेच.

**पर्णिली कांता माहेरा जाये । चित्तीं रिघाली दुरी न राहे ।**
**यापरी विषयो पाहें । जडला ठायें चित्तासी ॥** ए. भा.१३-२७७

**अर्थ :-** लग्नाची स्त्री माहेरी गेली, तरी ती मनांतून लांब जात नाही. त्याप्रमाणे विषयहि चित्ताला जखडून बसलेला असतो.

बायका मुलांच्या प्रेमात अडकलेले चित्त आवरून देवाकडे लावावें आणि मोठ्या प्रेमाने देवाला आळवावे असे तुकाराम महाराज सांगतात. तसेच भगवान गीतेंत जागजागी तसेच सांगतात -

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥** गी. १८-५७

अर्थ : विवेकाने सर्व कर्मे माझ्या ठिकाणी समर्पून, मत्पर होऊन बुद्धियोगाचा आश्रय करून सर्व काल माझ्या ठिकाणी चित्त जडलेला असा तूं हो.

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्य युक्तस्य योगिनः ।** गी. ८-१४

अर्थ :- पार्था, जो सतत अनन्यचित्त होऊन नित्य माझे स्मरण करतो, त्या (माझ्याशी) निरंतर (ही) श्रेष्ठ स्थिती प्राप्त झालेल्या महात्म्यांना मजप्रत आल्यानंतर, दुःखाचे आगर असलेला व नश्वर असा पुनर्जन्म प्राप्त होत नाही.

**"मयि एव चित्तं यस्य सः मच्चित्तः"**

अर्थ :- माझ्याच ठिकाणी ज्याचे चित्त जडलेले आहे तो "मच्चित्तः"

**मन्मना भव ।** म्हणजे माझ्या ठिकाणी मन अर्पण केलेला हो तुकाराम महाराजांनी चित्त एकाग्र होण्याकरिता देवाजवळ प्रार्थना केली आहे.

**प्रपंच वोसरो । चित्त तुझें पायी मुरो ॥ १ ॥** तु. म.१७७७

अर्थ :- हे देवा, सर्व प्रपंच नाहीसा होऊन माझे मन तुझ्या पायांच्या ठिकाणी लीन होवो.

**ऐसे करीं गा पांडुरंगा । शुद्ध रंगवावे रंगा ॥** तु. म.१७७७

अर्थ :- अगा पांडुरंगा, तुझ्या शुद्ध रंगाने माझे चित्त रंगावें, असे तूं कर (माझे चित्त तन्मय करून टाक).

चित्त परमात्म्याच्या रंगात रंगविणे म्हणजे एकाग्र करणे. चित्त एकाग्र करून भगवंताला आवडीने आळवावे हे तुकाराम महाराज



प्रस्तुत अभंगाच्या तिसऱ्या चरणाच्या उत्तरार्धात सांगतात.
**आवडी अनंत आळवावा ॥ ३ ॥**

अनंत म्हणजे परमात्मा अनंत हे एक परमात्म्याचे नांव आहे.

**अनंत म्हणती माझिया स्वामी ते ।**
**अनंत गुण त्याते म्हणोनिया ॥** ना. म. ३६४

परमात्म्याला आळवितांना आवडी असावी. आवडी वांचून आळवणे निरर्थक (फुकट) आहे. काही लोक देवाचे नाम घेतात. पण तें जसे काही रडण्याकरिता मोलाने आणलेल्या बाया रडतात तसे हें लोक नाम घेतात.

**मोले घातले रडाया । नाहीं असू आणि माया ॥ १ ॥**
**तैसा भक्तिवाद काय । रंग बेगडीचा न्याय ॥ २ ॥** तु. म. २८७४

अर्थ :- पैसे देऊन रडावयास लावलेल्या मजूर माणसांस अश्रू येत नाहीत व त्यांच्या हृदयांत मायाहि नसते. ॥ १ ॥

तसेच हरिविषयीच्या खऱ्या प्रेमावांचून बाह्यात्कारी भक्तीचे व्याख्यान हे बेगडाच्या वरवरच्या चकाकीप्रमाणे आहे असे समजावे.

**जळो तैसा प्रेमरंग । जाय भुलोनि पतंग ॥ १ ॥**
**सासुसाठी रडे सून । भाव अंतरीचा भिन्न ॥ २ ॥** तु. म. २८९९

महात्म्यांच्या ठिकाणी भगवंताच्या नामाविषयी प्रेमभाव व आवड असते म्हणून तें देवाला आवडीने आळवितात. इतकेच नव्हे तर त्यांचा आवडीचा विषय दुसरा नसतोच.

**एक विषय तो सकळांचा हरि ।**
**त्याच्या आवडीने आवडी इतरी ॥** तु. म. ११०

**अर्थ :-** सर्व गोपींचा विषय एक हरीच आहे, त्याच्या प्रीतीनें त्या इतर वस्तूंवर प्रीति करतात.

**विषय तो त्यांचा जाला नारायण ।**
**नावडे जन धन माता पिता ।।** तु. म. २२४५

**अर्थ :-** त्यांच्या आवडीचा विषय एक नारायण झालेला आहे, त्यावांचून त्यांना जन धन आईबाप आवडत नाहीत.

भक्तांचा खरा आवडीचा विषय फक्त एक परमात्माच आहे.

**आणि निरुपचारा प्रेमा । विषय होय जे प्रियोत्तमा ।**
**ते दुजें नव्हे कीं आत्मा । ऐसेंचि जाणावे ।।** ज्ञा.१८-१३४६

**अर्थ :-** आणि प्रियोत्तमा अर्जुना, जे निर्निमित्त प्रेमाचा विषय असते तें दुसरे कोणी नाही, तर आत्माच होय असे समजावे.

**तेथ प्रियाची परमसीमा । तो भेटे माउली आत्मा ।।** ज्ञा. १६-४४३

**अर्थ :-** मग तेथे (गुरुकृपेच्या गांवांत) आवडणाऱ्या वस्तूंतील शेवटची हद्द (सर्वांत अत्यंत आवडता जो माउली - आत्मा) तो भेटतो.

सर्वांच्या आवडीचा विषय एक आत्माच आहे. त्याची प्राप्ति व्हावी अशी उत्कंठा महात्म्यांच्या अंतःकरणात असते. साधु या भूमिकेवरून देवाला आळवतात. त्यांच्या ठिकाणी किती आवड व किती त्याग असतो हे ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**जयांचिये आवडी । केली मजशी कुळवाडी ।**
**भोग मोक्ष बापुडी । त्यजिली कुळें ।।** ज्ञा.१२-८१

**अर्थ -** ज्यांच्या प्रेमाने माझ्याशी देवघेव केलेली असते व ऐहिक व पारत्रिक भोग व मोक्ष, ही कुळें दीन आहेत, असे समजून ज्यांनी त्यांचा त्याग केलेला असतो.



नाथ महाराज म्हणतात, अशा आवडीने भगवंताचे नाम घेतले असता आपल्या उद्धाराची चिंता देवाला असते.

**आवडीने भावें हरिनाम घेसी । तुझी चिंता त्यासी सर्व आहे ।।**

**अर्थ :-** मोठ्या प्रेमाने व श्रद्धेने तूं हरीचे नामस्मरण कर. म्हणजे तुझी सर्वच काळजी तो वाहील.

भगवंताला आवडीनें आळवावें. ही गोष्ट खरी आहे. पण त्या परमात्म्याला कोणत्या नांवाने आळवावें ? याचे उत्तर तुकाराम महाराज प्रस्तुत अभंगाच्या चवथ्या चरणात सांगतात.

**रामकृष्ण हरि विठ्ठल केशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ।। ४ ।।**

तुकाराम महाराजांनी सांगितलेला मंत्र उपनिषदाला अनुसरूनच आहे.

**हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।**
**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।।** कलिसंतरणोपनिषद

तुकाराम महाराज सुद्धा तसेच म्हणतात -

**उघडा मंत्र जाणा रामकृष्ण म्हणा ।**
**तुटती यातना गर्भवास ।।** तु. म. २४९५

**अर्थ :-** रामकृष्ण हा मंत्र उघडा आहे, हे जाणून तूं त्याचा उच्चार कर, त्या योगाने तुझ्या गर्भवासाच्या यातना नाहींशा होतील. तुकाराम महाराज म्हणतात, हा मंत्र सर्वकाळ जपावा. तसेच नाथ महाराजहि म्हणतात, सर्व क्रिया करीत असतांना भगवंताचे नामस्मरण करीत जावें.

**हरि बोला देतां हरि बोला घेतां । हंसता खेळतां हरि बोला ।। १ ।।**
**हरि बोला गातां हरि बोला खातां । सर्व कार्य करितां हरि बोला ।। २ ।।**

**अर्थ :-** देतांना, घेतांना, हंसतांना, खेळतांना हरीचा जप करा, तसेच गातांना, भोजन करतांना व सर्व काम करीत असतांना हरीचे नामस्मरण करा.

**चिंतनासी नलगे वेळ । सर्वकाळ करावे ॥ १ ॥**
**सदा वाचे नारायण । ते वदन मंगळ. ॥ २ ॥** तु. म. ३५९६

**अर्थ :-** भगवंताचे चिंतन करण्याकरिता शुद्ध देश व शुद्ध काळवेळ ह्यांची आवश्यकता नको तें सर्वकाळ करावे. ॥ १ ॥ ज्याच्या मुखामध्ये सतत नामस्मरण आहे तें मुख मंगल आहे. ॥ २ ॥

तुकाराम महाराजांची नामावर मोठी निष्ठा होती. ते म्हणतात.

**आम्ही नामाचे धारक । नेणों प्रकार आणीक । सर्व भावे एक । विठ्ठलचि प्रमाण ॥ १ ॥ नलगे जाणावे नेणावे । गांवें आनंदें नाचावे । प्रेमसुख घ्यावें । वैष्णवांचें संगती ॥ २ ॥** तु. म. ८००

**अर्थ :-** आम्ही वैष्णव श्रीहरीचे नाम घेणारे आहोत, ह्यावांचून दुसरे काही साधनांचे प्रकार जाणत नाही. काया, वाचा, मनाने आम्हाला हा विठ्ठलच मान्य आहे. ॥ १ ॥ म्हणून त्याशिवाय आम्ही ज्ञानअज्ञान हे काही जाणत नाही. त्याचेच नांव घ्यावे आणि त्याच छंदामध्ये सर्व वैष्णवांचे समुदायांत नाचून प्रेमसुखाचा उपभोग घ्यावा. ॥ २ ॥

तुकाराम महाराज म्हणतात, लोक काही करोत मला फक्त नामसंकीर्तन आवडते.

**कोणी तरी कांहीं केलें आचरणें ।**
**मज या कीर्तनेविण नाहीं ॥** तु. म. ३४७

**अर्थ :-** मी कीर्तनावांचून दुसरे साधन केले नाही. बाकी इतर लोकांचा आचार कोणत्या प्रकारचा असेल तो असो. तुकाराम महाराज



म्हणतात, मी नामाचा अनुभव घेऊन जगाला उपदेश करतो.

**अनुभवे आले अंगा । ते या जगा देतसे ॥ १ ॥** तु. म. ३४१४

**अर्थ :-** ज्याचा माझ्या अंगीं अनुभव आला आहे, तेंच मी सर्व लोकांना सांगत आहे.

**तुका म्हणे चाखोनि सांगें । मज अनुभव आहे अंगें ॥** तु. म.३८१

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, मी स्वतः त्या रामरसाची गोडी चाखली. अनुभव घेऊन तुम्हास सागत आहे.

तुकाराम महाराजांनी नामसंकीर्तन या साधनाचा स्वतः अनुभव घेतला व लोकांचा या साधनावर विश्वास बसावा म्हणून आपल्या उपास्यदेवतेची शपथ घेऊन प्रस्तुत अभंगाच्या पांचव्या चरणात सांगतात -

**याविण आणीक असतां साधन । वाहातसे आण विठोबाची ॥ ५ ॥**

भगवत् प्राप्ति विषयक अनेक साधनें सांगितली आहेत. परंतु त्या सर्व साधनांमध्ये सुलभ साधन भगवंताचें नामसंकीर्तनच आहे. ही तुकाराम महाराजांनी केलेली प्रतिज्ञा भगवत् भक्तीला डोळ्यापुढें ठेवूनच केली आहे.

**उद्धव उवाच**

**वदंति कृष्ण श्रेयंसि बहूनि ब्रह्मवादिनः ।**
**तेषां विकल्पप्राधान्यमुताहो एकमुख्यता ॥** ए. भा. १४-१

**अर्थ :-** उद्धव म्हणाला, हे कृष्णा, मोक्ष प्राप्त करून घेण्याची साधनें अनेक आहेत. असे ब्रह्मस्वरूप जाणणारे ज्ञानी लोक बोलत असतात, तरी ती साधनें सर्वच सारखी आहेत कीं विशिष्ट काळाला त्यांचे प्राधान्य

असून त्यांतील एकच सर्वांत श्रेष्ठ म्हणजे प्रमुख साधन समजावयाचे ?

**उद्धव म्हणे गा श्रीपती । मोक्षमार्गी साधनें किती ।**
**वेदवादियांची व्युत्पत्ति । बहुत सांगती साधनें ।।** ए. भा.१४-३०

**अर्थ :-** उद्धव म्हणाला, हे श्रीकृष्णा ! मोक्षमार्गाला साधनें किती आहेत ? वेदवाद्यांच्या मताप्रमाणे पाहिले तर तें अनेक साधनें सांगतात.

**आणिका साधना नापेक्षिती । सर्व सांगाते निरसिती ।**
**मोक्षमार्गी मुख्य भक्ति । जेणे स्वरूपप्राप्ती तत्काळ ।** ए. भा. १४-३२

**अर्थ :-** भगवान म्हणतात, भक्त इतर साधनांची आशाच करीत नाहीत, सव संगांचा त्याग करतात. कारण, जिच्या योगाने तत्काळ आत्मस्वरूपाची प्राप्ति होते, अशी भक्तीच मोक्षमार्गामध्ये मुख्य आहे.

नामसंकीर्तन हे साधन सोपे असून सर्वांना होण्यासारखे आहे. म्हणून शेवटच्या चरणांत तुकाराम महाराज सांगतात -

**तुका म्हणे सोपे आहे सर्वांहूनि । शहाणा तो धणी घेतो येथें ।।**

या अभंगात तुकाराम महाराजांनी जसा उपक्रम केला तसाच ते उपसंहार करीत आहेत.

**नामसंकीर्तन साधन पै सोपे ।** असा उपक्रम केला त्याचप्रमाणे **तुका म्हणे सोपे आहे सर्वांहूनि ।** असा उपसंहार करतात.

उपक्रम उपसंहार बरोबर साधला आहे. प्रस्तुत अभंगाच्या प्रथम चरणांत सुलभत्व सांगून शेवटच्या चरणांत पुन्हा सुलभत्व कां सांगतात त्याचे कारण इतर साधनें व नामसंकीर्तन हे एक साधन याच्यात फरक जर कोणता असेल तर तुलनात्मक दृष्टीने इतर सर्व साधनांपेक्षा नामसंकीर्तन या साधनांत सुलभत्व आहे.



उदा. १) ज्ञानमार्ग २) अष्टांगादि योगमार्ग ३) यज्ञ यागादि कर्मे ४) कृच्छ्र चांद्रायण व्रतें ५) गोरांजन (स्त्रिया किंवा पुरुष ईश्वर प्रित्यर्थ आपणांस जाळून घेतात)

ही सर्व साधनें कठीण आहेत. या सर्व साधनांपेक्षा भगवंताचे नाम हे साधन सोपें व सर्ववरिष्ठ आहे.

**सकळिकां साधना वरिष्ठ हें नाम । मा मनी भाव न धरी दुजा रे रे ।। ५ ।। नारायण नाम नारायण नाम । नारायण नाम म्हण का रे रे ।। धृ ।।** ज्ञा. म. १३९

**अर्थ :-** मुक्ति प्राप्त करून देणाऱ्या इतर सर्व साधनांपेक्षा त्याच्या नामाचा म्हणजे भगवन्नामाचा जप हे साधन सर्वश्रेष्ठ आहे. म्हणून भगवन्नामाशिवाय दुसरा भाव मनामध्ये धरू नको रे नको.

या अभंगातील नामसंकीर्तनाचे मर्म व सामर्थ्य ज्याला कळले तो खरा शहाणा. तो या नामसंकीर्तन नामामृताचा स्वाद घेतो व तृप्त होतो असे तु. म. सांगतात. **शहाणा तो धणी घेतो येथे ।। ६ ।।**

**- भावार्थ समाप्त -**

**नामसंकीर्तन साधन पै सोपें । जळतील पापें जन्मांतरें ।।**

**व्याख्यान :-** ज्ञानेश्वर महाराजांच्या हरिपाठाचा निष्कर्ष सांगणारा तुकाराम महाराजांचा हा अभंग आहे. हरिपाठांत जो अनुबंध चतुष्टय सांगितला आहे तो अनुबंध चतुष्टय असा .-

१) अधिकारी २) विषय ३) प्रयोजन ४) संबंध यास अनुबंध चतुष्टय असे म्हणतात.

१) संसारी जीव हे हरिपाठाचे अधिकारी होत. ( अधिकारी )
२) नामस्मरण हे त्यासाठी सांगितलेले साधन ( विषय )

३) नामस्मरणाने जन्मांतरीची सर्व पापें जळून भगवंताची प्राप्ति होते हे प्रयोजन ( फल )

अनुबंधात महत्त्वाचे जर काही असेल तर प्रयोजन. प्रयोजन म्हणजे भोजन नव्हे, तर प्रयोजन म्हणजे फल. प्रयोजनाशिवाय मंद पुरुषाचीसुद्धा कोणत्याहि साधनांत प्रवृत्ति होत नाही. कारण जीवाची धांव स्वभावतःच फलाकडे असते.

**प्रयोजनमनुदिश्य न मंदोऽपि प्रवर्तते ।**

हरिपाठाचे प्रयोजन जे आहे तेच प्रयोजन तुकोबारायांनी या प्रस्तुत अभंगात सांगितले आहे. म्हणून हरिपाठाच्या शेवटी हा अभंग म्हणण्याचा प्रघात आहे.

नामसंकीर्तनाचे फल तुकाराम महाराज दोन प्रकाराने सांगतात.

**१) जळतील पापें जन्मांतरें :-** भगवंताच्या नामानें अनेक जन्मांतील सर्व पापें जळून खाक होतील याचा अर्थ असा कीं शास्त्रीय भाषेत याला - अनिष्ट निवृत्ति असे म्हणतात. (सर्व दुःखांची अत्यंतिक निवृत्ति म्हणतात.) हे प्रस्तुत अभंगाच्या प्रथम चरणात सांगितले आहे.

घरादारांचा त्याग न करता परमात्म्याची प्राप्ति घरबसल्या होते असे तुकाराम महाराज म्हणतात.

**२) सुखें येतो घरा नारायण :-** या दुसऱ्या चरणांत इष्ट प्राप्ति (परमानंदाची प्राप्ति) सांगितली आहे. यालाच शास्त्रीय भाषेत परम प्रयोजन असे म्हणतात. प्रयोजन जर पटले नाही तर मनुष्य साधनाकडे प्रवृत्त होणार नाही.

अगोदर आपण - **जळतील पापें जन्मांतरें** । याचा विचार करू.

शंका :- देहात्मवादी चार्वाकासारखे पापपुण्य मानीत नाहीत.



ते म्हणतात, पाप म्हणजे धमकी व पुण्य म्हणजे भूलथाप. ते जडवादी मुळात पापच नाही असे म्हणतात. त्यामुळे पाप नाहीसे होण्याचा त्यांच्यामते प्रश्नच उरत नाही.

उदा. एकाने सांगितले मजजवळ मूळव्याधी रोगावरचे उत्तम औषध आहे. पण ज्याला मूळांत मूळव्याधीच नाही मग उत्कृष्ट औषध असून उपयोग काय.

तसेच तें जडवादी म्हणतात, पाप दिसते आहे कुठे ? ''कुठले पाप आणि कुठले पुण्य'' पापपुण्य या नुसत्या कल्पना आहेत. पाप दिसत नाही म्हणून आम्ही ते मानीत नाही. या ज्ञानाला गीताकार तामसज्ञान म्हणतात.

**येरें पापपुण्यादिकें । तें आघवेंचि करोनि लटिकें ।**
**हित मानी अग्निमुखें । चरणें जे कां ॥** ज्ञा. १८-५७२

अर्थ :- इतर जे पापपुण्य वगैरे, तें सर्वच झूट करून जे पापपुण्य बरे वाईट न म्हणतां जो विषय पुढे येईल तो अग्निप्रमाणे सरसकट भोगणें. हेच तो हित मानतो.

**म्हणोनि पडिलेनि शरीरें । केलेनिर्सी आत्मा विसरे ।**
**मा भोगावया उरे । कोण वेषें ॥** ज्ञा.१८-५६८

अर्थ :- म्हणून त्या तामस ज्ञानाची अशी समजूत असते कीं, शरीर पडले असता केलेल्या कर्मासह आत्म्याचा ठावठिकाणा नाहीसा होतो. मग तो (आत्मा) कोणत्या रूपाने भोगावयास शिल्लक राहील ?

शरीराबरोबर आत्मा मरतो मग पाप पुण्याचें फळ भोगणार कोण ? असे जे देहात्मवादी आहेत तें देहालाच आत्मा समजतात.

**जे देहखंडा नाम आत्मा । ईश्वर पाषाण प्रतिमा ।**
**ययापरौती प्रमा । ढळो नेणे ।** ज्ञा.१८-५६७

अर्थ :- हा साडेतीन हात देह म्हणजेच आत्मा ... ची मूर्ति हाच ईश्वर होय, या पलीकडे तामस ज्ञानाची सम... नाही.

**जळतील पापें जन्मांतरें ॥ १ ॥**

हे विधान देहात्मवादी लोकांना मान्य नाही. ... मुळात पापच मानायला तयार नाहीत.

उत्तर - आपल्या स्थूल इंद्रियांना जेवढे गोच... तेवढ्याच गोष्टी जगतात आहेत असे नाही.

जगातील सर्व गोष्टी शाश्वत नियमाने बांधल्... आहेत.

**यथा कर्म तथा श्रुतम् ।**

जसे कर्म असेल तसे फळ मिळणारच. असा ... कायदा आहे. "पाप प्रत्यक्ष डोळ्याने दिसत नसले तरी ते ... आहे." ज्याअर्थी कार्य दिसते - त्यावरून कारणाचें अनुमान करता येते.

उदा. : एका मुलाला विचारले - तूं कोणत्या गांवांत असतो, तो मुलगा म्हणाला, गरिबाला कुठले गांव. तुला घर, दार, शेती वगैरे आहे काय ? तो मुलगा म्हणाला, गरिबाला कुठले घर दार व शेती. अरे, तुला आई-बाप आहेत कां ? मुलगा म्हणाला, गरिबाला कुठले आईबाप. प्रश्न विचारणारा म्हणाला, मग तूं काय आकाशातून पडलास ? ज्या अर्थी तूं आहेस त्या अर्थी तुला आई-बाप होतेच असे म्हटल्याशिवाय गत्यंतर नाही.

त्याचप्रमाणे पाप दिसत नसले तरी त्या... दिसते. शास्त्रकार ज्याला पाप म्हणतात, त्याची कल्पना ... नाही. पाप म्हणजे काय हे जर या जडवादी लोकांना ... असते, तर आम्ही पाप मानीत नाही असे म्हटलेच न...



पापाची व्याख्या तुकाराम महाराज सांगतात -

**पाप त्याचे नांव न विचारिता नीत ।**
**भलतेचि उन्मत्त करी सदा ॥ तु. म. ३४२९**

अर्थ :- उन्मत्त पुरुष हा धर्म-नीतिन्यायाकडे न पाहतां मनाला वाटेल तसे नेहमी स्वैर वागतो. त्यासच पाप म्हणतात.

तसेच पापाची व्याख्या निळोबाराय सांगतात -

**पाप तया नांव परदारागमन । पाप तें परधन अपहार ॥ १ ॥**
**पाप तेंचि निंदा परपीडा द्वेष । पाप तेंचि उपहास पुढिलाचें ॥ २ ॥**
**पाप तेंचि जीवीं विषयाची आसक्ति । पाप अभक्ति कुळाचारी ॥ ३ ॥**
**निळा म्हणे पाप मुख्य तेंचि साचें । नावडे देवाचे नाम मुखीं ॥ ४ ॥**

शास्त्रांत सांगितलेल्या निषिद्ध कर्माच्या आचरणानें पाप होते. बऱ्यावाईट कर्मापासून उत्पन्न झालेल्या पुण्यपापांचे संस्कार अंतःकरणांत शिल्लक राहतात. ज्यावेळी जीवात्मा देह टाकून जातो त्यावेळी तो आपली सर्व इंद्रियें, प्राण अंतःकरण चतुष्टय व त्या अंतःकरणांतील पापपुण्याचे संस्कार घेऊन तो जीवात्मा दुसऱ्या नव्या देहांत जातो. तेथें त्याला मागील पापपुण्याची फळें भोगावी लागतात. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हा देहराज जीव आपल्या बरोबर इंद्रियें कसा घेऊन जातो तें सांगतात -

**तेवीं मनःषष्ठां ययां । इंद्रियातें धनंजया ।**
**देहराजु ने देहा । पासूनि गेला ॥ ज्ञा. १५-३६७**

अर्थ :- त्याप्रमाणे अर्जुना, देहराज, जो जीव, तो एका देहांतून बाहेर पडला असतां (आपल्या बरोबर) मनासह पांच ज्ञानेंद्रियें नेतो.

दुसऱ्या जन्मांत पूर्वजन्मी केलेली पापें व त्यांचे संस्कार हिताचे

प्रसंगी नक्की आडवे येतात. कीर्तन ऐकणे हे जीवाचे हित आहे. मनुष्य कीर्तन ऐकण्याकरिता मोठ्या उत्सुकतेने जातो. पण तेथे त्याला झोप येते. तो तेथे झोप घेण्याकरिता गेला नव्हता. पण ती तेथे पूर्वजन्मीच्या पापांपुळे येते.

**आणि ऐहिकीं जियावें । जेणे परत्रा साच यावें**
**तें उचित कृत्य पावें । अवसरीं जिये ॥**
**तेव्हा जया आपैसी । निद्रा ये ठेविली ऐसी ॥** ज्ञा. १८-६८०-८१

**अर्थ :-** आणि ज्या योगाने इहलोकीं सुखानें जगणें होईल व खरोखर परलोकी गती मिळेल, असे योग्य कर्म करण्याचा प्रसंग ज्यावेळी येतो. त्या वेळेला तर त्याला झोप कशी ठेविल्यासारखी आपोआप येते.

पापपुण्य कळण्याचा सोपा मार्ग (उपाय) -

१) ज्यामुळे आपले हित होईल अशा गोष्टी माणसाच्या हातून न घडणे. उदा. परमार्थ

२) ज्यामुळे अनहित होईल व अधोगती प्राप्त होते त्या गोष्टी केल्याशिवाय राहवत नाही. उदा. पाप

पाप हे प्रयत्नपूर्वक करतो म्हणून अधोगती प्राप्त होते. द्राक्षांचा व आंब्याचा उपभोग घेण्याच्या वेळेला कावळ्याचे तोंड सडतें. दिवसा घुबडाचे डोळे फुटतात. त्याचप्रमाणें कल्याणाची वेळ आली असता त्यास आळस ग्रासून टाकतो. चूक घडण्याचें वेळी तो म्हणेल तसे होते. म्हणजे चूक करतांना त्याच्या अंगातील आळस जाऊन त्यास अधिक स्फुरण येते हेच ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**पैं द्राक्षरसा आम्ररसा । वेळे तोंड सडे वायसा । कां डोळे फुटती दिवसा । डुडुळाचे ॥ ६८२ ॥ तैसा कल्याणकाळु पाहे । तै तयाते**



**आळसु खाये । ना प्रमादी तरी होये । तो म्हणे तैसें ॥ ६८३ ॥**
ज्ञा. १८-६८२-८३.

एरव्ही पाप पुण्य हें काही कोठे स्वर्गांत टांगून ठेवलेले नाही कीं मनुष्य मेल्यावर त्याच्या गळ्यांत पाप पुण्य अडकतें काय ? तर नाही. ज्या ठिकाणी हित त्या ठिकाणी आदराने बसवले तरी डुकल्या येतात आणि तमाशा खराब त्या ठिकाणी टळटळीत जागा (जणू कांहीं डोळ्यांतून प्राण गेला असा) असतो. कोणी म्हणेल अहो बोवा तुम्ही सांगता तें आम्हाला पटते. पण काय करावे आमची बद्धि तशी (परमार्थांत प्रवृत्त) होत नाही.त्याचे कारण काय ? तेंच तुकाराम महाराज सांगतात.

**तुका म्हणे नाड । पाप ठाके हिताआड ॥** तु. म.३४०५

बुद्धीत अनंत जन्मांचे पापांचे संस्कार आहेत ते संस्कार सत्कर्म करू देत नाहीत. अशी एक म्हण आहे कीं सुंभ जळाला तरी पीळ जळत नाही. (नष्ट होत नाही.) उदा. एक पेन्शनर शिपाई तो एकटा घरांत असल्यामुळे त्याला खानावळींतून भोजनाचे ताट दररोज घरीं आणावे लागत असें. तो जेथे राहात असे तेथल्या शेजारच्या मुलांना खेळतांना व खोड्या करतांना रागावत असे. त्या मुलांपैकी एका मुलाने त्या शिपायाची फजिती करावयाचे ठरविले. एके दिवशी शिपाई एका हातात जेवण्याचे अन्न भरलेले ताट व एका हातात आमटी भरलेला तांब्या घेऊन ज्या मार्गाने जात होते, त्या मार्गावर एका भिंतीच्या आड तो मुलगा थांबला. शिपाई दादा समोर आल्याबरोबर भिंतीच्या आड उभा असलेला मुलगा ज्या स्वरांत त्याचा इन्स्पेक्टर हुकूम देतांना ओरडत होता; त्याच स्वरांत हा मुलगा 'अटेन्शन्' म्हणून ओरडला. शिपाई दादाची तीस वर्षांची सर्व्हीस झाली असल्यामुळे अटेन्शन् शब्द

ऐकल्याबरोबर ताट तांब्या हातातून सोडून तो शिपाईदादा अटेन्शनमध्ये उभा राहिला. वास्तविक तो आतां नोकरीवर नव्हता. पण तीस वर्षाची सवय व त्याचे संस्कार त्याचाच हा परिणाम होय.

त्याचप्रमाणें अनेक जन्मांची अनेक पापें व त्यांचे संस्कार तें कसे गप्प बसतील ! ते संस्कार मनुष्याला पापांत प्रवृत्त करतात. म्हणून मनुष्याकडून ज्ञात व अज्ञात (कळत न कळत) पापें घडली जातात. त्याकरिता शास्त्रकारांनी प्रायश्चित कर्म सांगितले आहे. त्याचे दोन प्रकार आहेत.

**१) असाधारण प्रायश्चित्त म्हणजे काय :-** आपल्या हातून अमूक एक पातक झाल्याचे समजले, तर त्या पातकाची निवृत्ति करण्याकरिता जे विधान शास्त्रानें केले असेल त्याला असाधारण प्रायश्चित्त म्हणावे. उदा. :- यतीस (संन्यासी) द्रव्य त्यागपूर्वक तीन दिवस उपवास सांगितला आहे. याचे कारण संन्याशाने द्रव्याला स्पर्श करूं नये; पण न कळत स्पर्श झाला तर द्रव्य त्यागपूर्वक तीन दिवस उपवास करावा. यास असाधारण प्रायश्चित्त कर्म म्हणतात. याने ज्ञात पाप नष्ट होते.

**२) साधारण प्रायश्चित्त म्हणजे काय :-** ज्ञात अज्ञात कोणत्याहि पातकाचे निवारण करण्याचे सामर्थ्य ज्याच्यात आहे त्याला साधारण प्रायश्चित्त म्हणतात. उदा. गंगास्नान व भगवंताचे नामस्मरण या दोघांना साधारण प्रायश्चित्त म्हणतात. पण त्यात भगवंताचे नाम श्रेष्ठ आहे. साधारण म्हणजे सामान्य नव्हे. सर्वांना करण्यासारखे म्हणून साधारण असे म्हणतात. गंगा ही भगवंताच्या चरणापासून जन्माला आली म्हणून तिच्यात स्नान केले असतांना पापें जातात. याला शास्त्रानें साधारण प्रायश्चित्त म्हटले असले तरी



त्याने फक्त बाहेरील मळ (पाप) जातो.

**तीर्थें बाह्यमळु क्षाळे । कर्में अभ्यंतर उजळे ।**
**एवं तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्मेंचि ॥ ज्ञा.१८-१६०**

**अर्थ :-** तीर्थाच्या योगाने बाहेरील (शरीरावरील) मळ धुतला जातो व कर्मांने चित्तशुद्धी होते. याप्रमाणे सत्कर्मं हीच पवित्र तीर्थें आहेत, असे समज. परंतु -

मन संकल्पाचीं पापें । न जाती तीर्थाचेनि बापें ॥ ना.म.

परंतु मन संकल्पाची पापें भगवंताच्या नामाने नष्ट होतात. एवढे सामर्थ्य भगवंताच्या नामात आहे.

**महामळें मन होते जे गादले ।**
**शुद्ध चोखाळले स्फटिक जैसे ॥ ४ ॥ तु. म. २०६५**

**अर्थ :-** माझे मन मोठ्या (महामळें) वासनेनें भरले होते, तें स्फटिकाप्रमाणे स्वच्छ झाले.

**जिव्हे गोड तीन अक्षरांचा रस ।**
अमृत जयास फिके पुढें ॥ तु. म. २०६५

**अर्थ :-** माझ्या जिव्हेला विठ्ठल हा तीन अक्षरांचा रस गोड लागला आहे, त्याच्यापुढे प्रत्यक्ष स्वर्गीय अमृतहि फिके आहे.

जसे आकाश या नांवाला आकाश हाच एक जसा आधार आहे - कारण आकाश हें नाम आणि आकाश हें दोन्ही एकच आहेत. त्याप्रमाणें भगवंत आणि भगवंताचे नाम हें दोन्हीहि एकच आहेत.

**परी आश्रयो आकाशा । आकाशचि कां जैसा ।**
**या नामा नामी आश्रयो तैसा । अभेदु असे ॥ ज्ञा.१७-४०३**

**अर्थ :-** आकाश या नांवाला आकाश हाच एक असा आधार आहे. (कारण तें दोघे एक आहेत) त्याप्रमाणे 'ॐ तत् सत्' या नामाला व नामीला (ब्रह्माला) आश्रय अभेद आहे. (म्हणजे ॐ तत् सत् या नांवाचा व परब्रह्म वस्तूचा अभेद आहे.)

नामी जो परमात्मा तो नामाहून भिन्न नाहीं. म्हणून नाम हें बलवान आहे. अनंत जन्मांची पातकें नाहीशी करण्याला भगवंताचे नाम हें समर्थ आहे. उदा. वाल्हा कोळी

**वाटपाडा कोकिळु । नाम स्मरे तो वाल्मिकु । नामे उद्धरिलें तिन्ही लोकु । आपणासहित निवाला ॥ अमित दोषांचे मूळ । झाले वाल्मिकासी सबळ । झाला हरिनामें निर्मळ । गंगाजळ पैं जैसा । तुम्ही हरि म्हणा हरि म्हणा । महादोषांचे छेदना ॥ धृ ॥ तु. म.२४९२**

**अर्थ :-** ह्याकरिता तुम्ही 'हरि हरि' या नामाचा उच्चार करा. (असे दोन वेळा सांगतात) त्या भोगाने महापातकांचा नाश होईल ॥धृ.॥ अजामिळ हा ब्राह्मण अति प्रीतीने बांधला गेल्यामुळे मांगिणीच्या ठिकाणी रममाण झाला, अशा त्या नष्टास नामोच्चाराच्या योगाने एक क्षणहि न लागतां हरीने वैकुंठास नेले. नाम हें पातकाची होळी करते.

**हरि उच्चारणी अनंत पापराशी । जातील लयासी क्षणमात्रें ॥ १ ॥**
**तृण अग्निमेळे समरस झाले । तैसे नामें केले जपता हरि ॥ २ ॥**

**अर्थ :-** हरिनामाचा जप केल्याने पापाच्या अनंत राशी एका क्षणांत नाहींशा होतात. ॥ १ ॥ गवताचा व अग्नीचा संबंध झाला कीं तें गवत अग्निरूप होतें, त्या प्रमाणें हरीचा जप करीत असले म्हणजे जपणारा हरिरूपच होतो. नाथ महाराजहि तेच सांगतात -

**अवचटें तोंडा आल्या हरी । सकळ पातकें संहारी ।**
**ते हरिनाम निरंतरी । जे निजगजरी गर्जती ॥ ७७३ ॥**



**ऐसें ज्यांचे जिव्हेवरी । नाम नाचे निरंतरी ।**
**ते धन्य धन्य संसारी । स्वानंदे हरि गर्जतु ॥ ७७४ ॥**
**सप्रेम सद्भावें संपूर्ण । नित्य करितां नामस्मरण ।**
**वृत्ती पालटती आपण । तेंही लक्षण ऐक राया ॥ ७७५ ॥**
**नामासरिसाच हरी । रिघे हृदयामाझारी ।**
**तेणें धाकें अभ्यंतरी । हो लागे पुरी हृदयशुद्धी ॥ ७७६ ॥**
**तेव्हां प्रपंच सांडोनि वासना । जडोनि ठाके जनार्दना ।**
**अहंकारु सांडोनि अहंपणा । सोऽहं सदनामाजी रिघे ॥ ७७७ ॥**
**चित्त विसरोनि चित्ता । जडोनि ठाके भगवंता ।**
**मनाची मोडली मनोगतता । संकल्पविकल्पता करू विसरे ॥ ७७८ ॥**
**कृतनिश्चयेसीं बुद्धि । होऊनि ठाके समाधि ।**
**ऐशी देखोनि हृदयशुद्धी । तेथोनि त्रिशुद्धी न रिघे हरी ॥ ए. भा. २**

**अर्थ :-** तोंडात चुकून जरी हरीचे नाम आले, तरी सुद्धा तें सर्व पातकांचा नाश करते, असे तें हरीचे नाम भक्तजन निरंतर गर्जत असतात. ॥ ७७३ ॥ ह्याप्रमाणें ज्यांच्या जिव्हेवर नाम निरंतर नाचत असते, जे स्वानंदाने हरिनामाचा गजर करीत असतात, तें संसारामध्ये अत्यंत धन्य होत. ॥ ७७४ ॥ पूर्णप्रेमानें व सद्भावानें नित्य नामस्मरण केलें असतां वृत्ति आपोआप पालटून जातात. तेहि लक्षण सांगतो ऐक. ॥ ७७५ ॥ नामाबरोबरच हृदयामध्ये हरि शिरतो. त्या धाकाने अंतरांत पूर्णपणें हृदयशुद्धी होऊं लागते. ॥ ७७६ ॥ तेव्हां 'वासना' प्रपंचाला सोडून जनार्दनालाच चिकटते व अहंकार 'अहं' पणाला सोडून 'सोऽहं' (परब्रह्म तेच मी) ह्या भावनेमध्ये शिरतो. ॥ ७७७ ॥ 'चित्त' हे चित्ताला विसरून भगवंताला जडून राहतें. 'मनाचे' मनपणहि मोडून ते संकल्पविकल्प करावयालाच विसरते. ॥ ७७८ ॥ ''बुद्धि'' ही कृतनिश्चयाने समाधिरूपच होऊन राहते.

अशी हृदयाची शुद्धि झालेली पाहिली म्हणजे तेथून खरोखरच हरि बाहेर निघत नाही. बुद्धीचा निश्चय झाला म्हणजे त्या निश्चयावरच मन खिळून बसते, इतर कोणत्याहि विषयाकडे वळत नाहीं व वृत्तीची साम्यावस्था ढळत नाही. ॥ ७७९ ॥

घरांत मालक जागा नसला मग कुत्री घरांत शिरतात. पण मालक घरांत जागा झाला मग कुत्री घरांत शिरत नाहीत. त्याप्रमाणें हृदयांत हरि जागा झाला म्हणून काम क्रोधरूपी कुत्री अंतःकरणरूपी घरांत शिरत नाहीत.

**तुका म्हणे देह भरिला विठ्ठले ।**
**कामक्रोधे केले घर रिते ॥ ४ ॥** तु. म. ३३६०

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, या कामक्रोधांनी माझे अंतःकरणरूपी घर रिकामे केले, त्यामुळे हा देह विठ्ठलाने भरून गेला आहे. (आतां सर्व इंद्रियांना एक विठ्ठलच आवडत आहे.)

**येती अंगा वसती लक्षणें । अंतरी देवे धरिले ठाणे । आपणचि येती तयाचे गुणें । जाणे येणे खुंटे ये वस्तीचे ॥ ४ ॥** तु.म.७१३

**अर्थ :-** ज्याचे हृदयांत देवाने ठाण मांडून वास्तव्य केले आहे, त्याठिकाणी ज्ञानाची सर्व लक्षणें येऊन राहतात, ती लक्षणें त्याच्या गुणाने आपले आपण येतात. या देहाच्या वस्तीला येणे = (जन्म) व या देहांतून जाणे = (मृत्यु) हे जन्ममरण त्याचे संपते.

**हरिनाम प्रेम प्रितीवरी । हृदयीं रिघाला जो हरी ।**
**तो निघों विसरे बाहेरी । भक्तप्रितीकरीं कृपाळू ॥** ए. भा.२-७८०

**अर्थ :-** हरिनामप्रेमप्रितीने हरि जो भक्तांच्या हृदयामध्ये शिरला, तो भक्तप्रितीमुळे बाहेर निघावयाचेच विसरून जातो.



असे भगवत् नाम संकीर्तनाचे सामर्थ्य तुकाराम महाराजांना माहीत असल्यामुळे म्हणूनच तें म्हणाले, **सुखे येतो घरा नारायण ॥**

**युक्ताहार न लगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखविले ॥ १ ॥ कलियुगामाजी करावे कीर्तन ॥ तेणें नारायण देईल भेटी ॥** तु. म. २४८१

**अर्थ :-** युक्ताहारादिक काही साधनें करावयास नकोत. नारायणाने तरून जाण्याकरिता थोडेसेच वर्म दाखविले आहे. ॥ १ ॥ तें हें कीं, या कलियुगामध्ये निरंतर हरीचे नामसंकीर्तन करावें. तेणेकरून नारायण हा प्रत्यक्ष भेट देईल. ॥ २ ॥

भगवान परमात्म्याचे नाम हे ब्रह्म आहे, ते कसे हे ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**पाहें पां ॐ तत्सत् ऐसें । हे बोलणें तेथ नेतसे । जेथूनि कां हें प्रकाशे । दृश्यजात ॥ ४०१ ॥ तें तंव निर्विशिष्ट । परब्रह्म चोखट । तयाचें हें आंतुवट । व्यंजक नाम ॥ ४०२ ॥** ज्ञा.१७-४०१-२

**अर्थ :-** हे पहा, ज्याच्याकडून हें सर्व दृश्यमात्र प्रकाशिले जाते, त्या ठिकाणी 'ॐ तत्सत्' हे बोलणे (हा नामोच्चार) नेते. तें ठिकाण तर निर्धर्म व शुद्ध असे परब्रह्म आहे. पण (ॐ तत् सत्) हे त्याचे अंतरंग व त्यास व्यक्त करून दाखविणारे आहे. तें ब्रह्म निराकार आहे.

**अव्यक्त निराकार नाही त्या आकार । जेथुनि चराचर हरीसी भजे ॥**

**अर्थ :-** जे व्यक्त नाही, जे निराकार असल्यामुळे नामरूपजाति संबंध यांच्या पलीकडे आहे, ज्यास आकार नाहीं, ज्याच्यापासून चर (चेतनायुक्त) व अचर (जड) अशा उभयभावात्मक जगताची उत्पत्ति झाली त्या हरीचें तूं भजन कर.

अशा प्रकाशमान परमात्म्यापर्यंत पोचविणारे भगवंताचें नाम आहे. ॐ हे ब्रह्माचें नाम आहे व तें ब्रह्म पांडुरंगच आहे.

हरिः ॐ **तत्सदिति सूत्राचे जे सार । कृपेचा सागर पांडुरंग ॥** तु.म.३७३८

**अर्थ** :- हरि हे नाम वेदाचे बीज आहे व ॐ तत्सत् ही तीन पांडुरंगाची स्वतंत्र वेदप्रणित नावें आहेत, या नामांनी कार्य सांग होते, या नामामध्यें संपूर्ण वेदाचा तात्पर्यभूत अर्थ आहे; म्हणून या नामाला सूत्र म्हटले आहे व याहि सूत्राचे सार विटेवर उभा असलेला सगुण साकार कृपेचा सागर पांडुरंग आहे.

**तें हें ब्रह्म विटेवरी । उभे चंद्रभागें तिरी ॥**

भगवत् प्राप्तिची वेदशास्त्रांत अनेक साधनें सांगितली आहेत. पण सर्व साधनांत भगवंताचें नाम श्रेष्ठ आहे. त्या सर्वश्रेष्ठ नामाने काय साधत नाही ?

**काय नव्हे केले । एका चिंतिता विठ्ठलें ॥** तु. म.२४७९

एका विठ्ठलाचे चिंतन करण्यात कोणती गोष्ट घडत नाही, तर सर्व घडते.

**अवघ्या दशा येणेचि साधती । मुख्य उपासना सगुणभक्ति ॥ प्रगटे हृदयींची मूर्ति । भावशुद्धि जाणोनियां ॥ १ ॥ बीज आणि फळ हरीचे नाम ॥ धृ ॥** तु. म. ७१३

**अर्थ** :- श्रीहरीच्या सगुण स्वरूपाची भक्ति करणे हीच मुख्य उपासना आहे, ह्याच योगानें सर्व अवस्था साध्य होतात व त्यांचे ठिकाणी शुद्ध भाव आहे, असे जाणून त्या भक्तांच्या हृदयांत श्रीहरीची मूर्ति प्रगट होते. ॥ १ ॥ श्रीहरीचे नाम हेच मुख्य बीज असून फळहि तेच आहे.



भगवंताचे नाम बलवत्तर साधन आहे. मग ते फार कठीण असेल, तर तसे नव्हे तें फार सोपेहि आहे.

**नव्हे गुरुदास्य संसारिया । वैराग्य तरी भेणे कांपे विषयां ॥ तैसे नाम नव्हे पंढरीराया । जया सायास न लगती ॥ १ ॥ म्हणोनि गोड सर्वभावे ॥ धृ ॥** तु. म.२५१०

**अर्थ** :- संसारी जीवांना (अंगी वैराग्य नसल्यामुळें) गुरूचे दास्यत्व होणार नाही आणि एखाद्याला प्रखर वैराग्य असले तर तो संसाराला फारच आणि नाना प्रकारच्या विषयांना पाहून तर थरथरा कांपतो. तसे या पंढरीनाथाचें नांव (नाम) नाही. तें घेण्याकरिता कोणतेहि कष्ट लागत नाहीत. ॥ १ ॥ ते सर्वदृष्टीने चांगले आहे.

**तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार ।**
**नाम हेंचि सार विठोबाचें ॥** तु. म. २४८८

**अर्थ** :- तुकाराम महाराज म्हणतात, विठोबाचे नाम हेच एकमेव सार आहे, असेच श्रेष्ठाचार = (श्रुति - स्मृतीचे अर्थ जाणून त्याप्रमाणे वागणारे) श्रेष्ठ लोक परंपरेने मानीत आले आहेत. निळोबाराय सांगतात -

**संत एकांती बैसलें । सर्वही सिद्धांत शोधिलें । ज्ञानदृष्टी अवलोकिलें । सारांश काढिलें निवडुनी ॥ १ ॥ तें एक श्रीहरीचे नाम । सकळ पातकां करी भस्म । अधिकारी उत्तम आणि अधम । चारी वर्ण नरनारी ॥ धृ ॥ निळोबाराय ४८५**

भगवंताच्या नामाचा शुद्ध उच्चार करावा. परंतु नाही करता आला तरी चालेल पण नाम घ्यावें.

**अबद्ध तें फार तरले नामें ॥ १ ॥** तु. म.२५०६

**अर्थ :-** श्रीहरीचे नाम तसे नाही, ते वेडेवांकडे घेऊनहि पुष्कळ तरले आहेत. उदा. पोर बोलावयास लागले कीं, तें आईला रांडे म्हणते. आई त्याचे कोडकौतुक करते. आई दुसऱ्या बायांना म्हणते, माझं बाळ बोलू लागले तें मला 'राडे' म्हणते. मुलाच्या प्रेमामुळे त्या अबद्ध शब्दालाहि किंमत आली. त्याप्रमाणे भक्त भगवंताला वाटेल त्या शब्दानें आळवतात. ज्ञानोबाराय म्हणतात -

**रंगा येई वो ये रंगा येई वो ये ।**
**विठाई किठाई माझे कृष्णाई कान्हाई ॥** ज्ञा. म. ३२८

**अर्थ :-** माझ्या प्रेमरूप भजनरूपी रंगात हें विठाई देवी तूं लवकर ये. तुला किती नांवें आहेत म्हणून सांगावें ? तुला किठाई म्हणतात, कृष्णाई व कान्हाई म्हणतात. ज्ञानेश्वर महाराज विठाई हा शब्द बरोबर वापरतात पण किठाई या शब्दाला अर्थ नाही. तरी तें प्रेमाचे द्योतक आहे. तात्पर्य, असे शुद्ध प्रेमानें नामस्मरण केले असता पाप नाहीसे होऊन अंतःकरण शुद्ध होते. त्या शुद्ध अंतःकरणांत भगवान आपण होऊन राहावयास येतात.

**तरी जयांचिये चोखटेमानसीं ।**
**मी होऊनि असे क्षेत्र संन्यासी ।** ज्ञा.९-१८८.

**अर्थ :-** ज्यांच्या शुद्ध मनरूपी क्षेत्रांत मी क्षेत्र संन्यासी होऊन राहतो.

**चित्त तें निर्मळ जैसे नवनीत ।**
**जाणिजे अनंत तयामाजी ॥ ५ ॥** तु. म. ३६

**अर्थ :-** ज्याचे चित्त लोण्याप्रमाणे निर्मळ आहे, त्याठिकाणी देवाचे वास्तव्य आहे असें समजावें.



**तुका म्हणे चित्त करावे निर्मळ ।**
**येऊनि गोपाळ राहे तेथें ॥ ३ ॥** तु. म. २७२६

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून (ह्या दृष्टांताप्रमाणे) आपले चित्त विकाररहित असे निर्मळ करावे म्हणजे त्या चित्तांत स्वतः गोपाळ येऊन राहतो.

**ऐसें निर्मळ झालिया चित्त ।**
**ब्रह्म प्रकाशे सदोदीत ॥** ए. भा. १४-२३६

**अर्थ :-** असे चित्त निर्मळ झाले असतां तेथें सदोदित ब्रह्म प्रगट होऊन राहते.

ज्या अंतःकरणांत भगवान् आपण होऊन अखंड वास्तव्य करतात तें अंतःकरण भगवंताच्या नामसंकीर्तनानें शुद्ध होते, तरी आपण शुद्ध आचरणानें राहून भगवंताचे अखंड नामस्मरण करावे. तें कसे करावे तर

**जय विठ्ठल जय जय विठ्ठल**

**- समाप्त -**

* * *

# गुरुपरंपरेचे अभंग

सत्यगुरुरायें कृपा मज केली ।
परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥ १ ॥
सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना ।
मस्तकी तो जाणा ठेविला कर ॥ २ ॥
भोजना मागती तूप पावशेर ।
पडिला विसर स्वप्नामाजी ॥ ३ ॥
काय कळे उपजला अंतराय ।
म्हणोनियां काय त्वरा झाली ॥ ४ ॥
राघवचैतन्य केशवचैतन्य ।
सांगितली खूण माळीकेची ॥ ५ ॥
बाबाजी आपुलें सांगितले नाम ।
मंत्र दिला राम कृष्ण हरि ॥ ६ ॥
माहो शुद्ध दशमी पाहुनी गुरुवार ।
केला अंगीकार तुका म्हणे ॥ ७ ॥

श्री तुकोबारायांना सद्गुरु भेटीचा ध्यास लागला होता. त्या ध्यासांत तें भंडारा डोंगरावर गेले. त्या ठिकाणी तें झोपले असतां त्यांना स्वप्न [illegible] (इद्रायणीवर) स्नानास जात आहात, त्यावेळी देवच बाबाजी चैतन्यांच्या रूपांत लिंगदेहाने स्वप्नांत आले. त्यांना पाहिल्यावर भूदेव म्हणून आस्थेनें वंदन केले, तेव्हां त्यांनी मस्तकावर हात ठेवला व चैतन्य संप्रदायाची दिक्षा देऊन 'रामकृष्ण हरि' हा मंत्र दिला. तो दिवस माघ शुद्ध दशमी गुरुवार होता. ही आत्मप्रतिती तुकाराम महाराजांनी कथन



केली आहे. ती स्वप्नातील म्हणून कोणी असत्य समजेल; यासाठी महाराज प्रारंभीच जोर देऊन याची सत्यता प्रकट करतात.

**अर्थ :-** गुरुमहाराजांनी माझ्यावर कृपा केली हे खरे आहे आणि गुरुरायांनी माझ्यावर सत्य कृपा केली. तसेच ज्या गुरूने माझ्यावर कृपा केली तें गुरुराज सत्य आहेत; माझ्यांकडून कांहीं त्यांची सेवा घडली नाही. मी स्वप्नामध्ये गंगेचें ( इंद्रायणीचें ) स्नान करण्याकरिता जात असतांना श्रीगुरूंनी मला वाटेत सांपडविलें ( गांठलें ) आणि दर्शन दिले. मी नमस्कार केल्याबरोबर माझ्या मस्तकावर त्यांनी अभयकृपा हस्त ठेवला, असे तुम्ही जाणून घ्या. श्रीगुरूनें भोजनाकरितां इहलोकीचे अमृत जें तूप ( चित्त ) तें पावशेर म्हणजे ४ था भाग १ मन २ बुद्धि ३ चित्त ४ अहंकार यापैकी पाव भाग जें चित्त तें मागितलें. हेतू असा कीं, परमार्थ हा सर्वस्वी चित्तावर अवलंबून आहे म्हणून तें चित्तच मागितलें. परंतु मला स्वप्नामध्ये त्याचा विसर पडला. (चित्तरूपी तूप दिले गेले नाहीं याचा त्यांना जागृतीत खेद वाटला) माझ्याकडून सेवेत कांहीं अंतर पडले कीं काय ? कोण जाणे; म्हणून त्यांनी जाण्याची त्वरा केली. पण जातांना मात्र आपल्या गुरुपरंपरेची मालिकेची खूण सांगितली. 'राघव चैतन्य' परम गुरु व 'केशव चैतन्य' हें स्वतःचें गुरु असल्याचा निर्देश केला व स्वतःचें नांव 'बाबाजी' असे सांगितलें आणि त्यांनी मला 'रामकृष्णहरि' हा मंत्र दिला. तुकाराम महाराज म्हणतात, सद्गुरूंनी त्यावेळेस माघ शुद्ध दशमी व गुरुवार पाहून माझा अंगीकार केला.

**विवरण :**

**सत्यगुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥**

'सत्यगुरुरायें कृपा मज केली' तुकाराम महाराजांना माघ शुद्ध दशमीला गुरुपदेश झाला म्हणून त्यांचा आज खरा नवीन जन्मदिवस आहे. कोणी म्हणेल बोल्होबा व कनकाई यांच्याउदरी तुकाराम महाराजांचा जन्म झाला हा जन्म ज्या दिवशी झाला, त्या दिवसाबद्दल आपण बोलत आहांत काय ? तर नाहीं. कारण (१) मांसवंश व (२) विद्यावंश असा दोन प्रकारचा वंश आहे. या ठिकाणी विद्यावंशाबद्दल बोलायचे आहे. एकनाथ महाराज भागवतात म्हणतात, ज्या दिवशी गुरुपासून दिक्षा ग्रहण होईल त्या दिवशी पुरुषाचा नवा जन्म झाला असे जाणावे म्हणून गुरूच आई आणि बाप आहे. जो जन्माला येतो अशा त्या बालकांस पांच बाप सांगितले आहेत. १)जन्मदेणारा २) उपनयन संस्कार करणारा ३) अन्न देऊन प्रतिपालन करणारा ४) भयापासून देहाचे मरण चुकविणारा (उदा. पाण्यांत बुडत आहे अशा त्यास बाहेर काढणारा) व ५) पंचभूतांची झाडणी करून गर्भवासाचे दुःख निवारण करून मृत्युपासून सोडविणारा. या पांचामध्ये सद्‌गुरुपिता हा श्रेष्ठ आहे. तो भाग्याशिवाय प्राप्त होत नाहीं. व्यवहारांत आई आणि बाप वेगवेगळें आहेत. आई ही आपल्या उदरांतून पोराला बाहेर काढते मग त्याच्यावर प्रेम करते. पण परमार्थांत गुरूच माता व पिता आहेत आणि बाहेरच्याला आपल्या पोटांत सामावून घेते म्हणजे आपलाच अधिकार त्या साधकाला प्राप्त करून देते. यामुळे ऐक्यबोधावर आणून देणारें सद्‌गुरु हें आईबाप आहेत. इतर जें चौघेजण तें सावत्र बाप आहेत आणि कृपायुक्त सद्‌गुरु सच्छिष्याला सखा बाप आहे. सगुण, निर्गुण ब्रह्माचा उपदेश करून संपूर्ण अविद्येची निवृत्ति करून चारी पुरुषार्थ व चारी मुक्ति प्राप्त करून देणारें सद्‌गुरु हें श्रेष्ठ आहेत. त्यांनी जी दीक्षा (उपदेश) दिली त्याद्वारे होणारा शिष्याचा हा दीक्षाजन्म आहे, असे भगवंतांनी उद्धवास सांगितले आहे.



**गुरुपासोनि दीक्षाग्रहण । तें पुरुषासी नवें जन्म जाण । गुरुमायबाप संपूर्ण । तें ऐक लक्षण उद्धवा ॥ ८० ॥ उपजलिया बाळकासी तत्त्वतां । पंचविध जाण पिता । जनिता आणि उपनेता । तिजा प्रतिपाळिता अन्नदानें ॥ ८१ ॥ जो भयापासूनि सोडविता । जो बंधविमोचन करविता । जो देहाचें मरण चुकविता । तोही पिता शास्त्रार्थें ॥ ८२ ॥ पां वेगळा पांचवा पिता । जो झाडणी करी पंचभूतां । मृत्यूपासूनि सोडविता । जो गर्भव्यथा निवारी ॥ ८३ ॥ ज्याचे देखिलीया चरण । बाधूं न शके भवबंधन । तो सद्‌गुरु पिता जाण । भाग्येंवीण न पाविजे ॥ ८४ ॥ उपजल्या बाळकासी सर्वथा । वेगळालीं माता पिता । एक वीर्यातें निक्षेपिता । धारणपोषणता जननीची ॥ ८५ ॥ तैसा सद्‌गुरु नव्हे पिता । निजवीर्य न वेंचितां । योनिद्वारें नुपजवितां । जननी जनिता स्वयें झाला ॥ ८६ ॥ उदराबाहेरी घातल्यापाठीं । माता पुत्रस्नेहें कळवळा उठी । बाहेरिलें सूनि आपुले पोटीं । निजस्नेहें गोमटी गुरुमाता ॥ ८७ ॥ यालागीं शिष्यासीं तत्त्वतां । सद्‌गुरुची माता पिता । निजस्नेहें वाढविता । तदात्मता अभेदें ॥ ८८ ॥ मागील पिते जे चौघेजण । तें याचे भावत्र बाप जाण । माता पिता भिन्न-भिन्न । सखेपण त्या कैंचें ॥ ८९ ॥ यालागीं सद्‌गुरु जो सकृपू । तो सच्छिष्यासी सखा बापू । पित्यापुत्रांमाजी अल्पू । कांहीं विकल्पू उपजेना ॥ ९० ॥ त्या सद्‌गुरुपासून जाण । शैवीवैष्णवी दीक्षाग्रहण । अथवा उपदेशी निर्गुण । चैतन्यघन निजबोधे ॥ ९१ ॥ ऐक दीक्षानामाची युक्ती । दे चारी पुरुषार्थ चारी मुक्ती । निःशेष अविद्येची नाशी स्थिती । दीक्षाव्युत्पत्ती त्या नांव ॥ ९२ ॥ एवं दीक्षाजन्माची जे कथा । उद्धवा सांगितली म्यां तत्त्वतां । ध्यान निष्ठ जे सात्त्विकता । ऐक आतां सांगेन ॥ ९३ ॥** ए. भा. १३-८०-९३

तसेच तुकाराम महाराजांचा मरणदिवस आजच आहे. कोणी म्हणेल माघ शुद्ध दशमी हा मरण दिवस कसा ? कारण फाल्गुन वद्य बीजेला (द्वितीया) तुकाराम महाराज सदेह वैकुंठाला गेले. मग मरण दिवस ही काय भाषा आहे ? याचे समाधान करावयाचे तें असे, सद्गुरु उपदेशाने जेव्हां देह अहंकार जाऊन जीव हा परमात्मरूप होतो. या ठिकाणी देह अहंकार जाणे म्हणजेच मरण होय.

**तुका म्हणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपपर बोळविलें ।।**

दुसऱ्या दृष्टीने बोलावयाचे तें असे कीं, गुरुकृपा हाच कोणी एक दिवा तो प्रज्वलित झाला असतां शरीराची रक्षा होते; म्हणजेच पंचकोशांचा अथवा पंचमहाभूतांनी युक्त असा जो देह त्याचा निरास होतो. पंचकोश जळून जातात याचाच अर्थ मरण होय.

तुका म्हणे रक्षा झाली आपोआप ।
उजळला दीप गुरुकृपा ।। १ ।। तु. म. ४०४०

असा अनुपम सोहळा प्राप्त हे सद्गुरु कृपेचे शेवटचे टोक आहे.

आपुले मरण पाहिले म्या डोळां ।
तो झाला सोहळा अनुपम्य ।। १ ।। तु. म. ४०३५

मरणा हाती सुटली काया । विचारे या निश्चये ।। तु. म. ४०३९

पंचदशीकारांनी ज्या दिवशी खऱ्या खोट्याचा निवाडा केला तो खरा अंतकाल यातच साधुची खरी किंमत आहे. सद् हें अद्वैत व असत् जे द्वैत याची खिचडी ज्यांनी दूर केली, आत्मस्वरूपाशिवाय बुद्धी इतरांस जाणत नाहीं, ही अवस्था ज्या दिवशी घडेल त्या दिवशीच अंतकाल झाला असे समजावें.

तुकाराम महाराजांना सद्गुरुकृपेने अशी अवस्था प्राप्त झाली



होती, म्हणून आम्ही त्यांचा मरण दिवस आज आहे असे म्हटले.

तुकाराम महाराजांचा जन्म दिवस माघ शुद्ध दशमी व मरण दिवस माघ शुद्ध दशमी. ज्यादिवशी जन्म त्याच दिवशी मरण. भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला बोध केला त्यामुळे अर्जुनास जो अनुभव आला त्याबद्दल त्याचे जे उद्गार आहेत तें विचार करण्यासारखे आहेत. अर्जुन म्हणतो, 'अहो महाराज ऐका, (माझा) जन्ममरण रूप कचरा तुम्ही चांगला नाहीसा केला. यामुळे देवा, मी आईच्या पोटांतील अग्निकुंडापासून मुक्त झालो. महाराज, मी आपला जन्म हा आज डोळ्यांनी पाहिला. (आत्मज्ञान होणे हा नवा जन्म आहे व तें मला आज झाले.) त्यामुळे माझे जीवित माझ्या हाती आले, असे मला वाटते. आज माझ्या आयुष्याची सफलता झाली व माझ्या दैवाला चांगले दिवस उगवले कारण कीं, देवाच्या मुखानें उपदेशरूपी कृपा प्राप्त झाली. आतां या तुझ्या वाक्यरूपी प्रकाशानें आंतील अंधार (स्वतःला आत्मरूप न समजता जीवस्वरूप समजणे, हें अज्ञान) व बाहेरील अंधार (प्रपंचाला ब्रह्मरूप न पाहतां प्रपंचरूप पाहणे हें अज्ञान) हें सर्व नाहीसे झालें म्हणून तुझे स्वरूप खरोखर मी पाहत आहे'.

**अहो जी अवधारा । भला केरु फेडिला संसारा । जाहलो जननीजठरजोहरा । वेगळा प्रभु ।। जी जन्मलेपण आपुलें । हे आजि मियां डोळां देखिलें । जीवित हाता चढले । आवडतसे ।। आजि आयुष्या उजवण जाहली । माझिया दैवा दशा उदयली । जे वाक्य कृपा लाधली । दैविकेनि मुखें ।। आतां येणे वचनतेजाकारें । फिटले आंतील बाहेरील अंधारें । म्हणोनि देखतसें साचोकारें । स्वरूप तुझें ।।** ज्ञा.१०-१४५,१४८

या ठिकाणी अर्जुनाने कबुली दिली कीं, 'जी जन्मलेपण आपुले' म्हणजे माझा आज जन्म झाला. तात्पर्य, ज्या दिवशी गुरुकृपा झाली,

तोच जन्म आणि मरणदिवस होय. ही अवस्था तुकाराम महाराजांना प्राप्त झाली होती. गुरुराज यांनी माझ्यावर कृपा केली हें खरे परंतु माझ्याकडून त्यांची सेवा कांहीं घडली नाहीं हेच अभंगाच्या प्रथम चरणांत सांगतात.

**सत्यगुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥**

कडूसला माघ शुद्ध दशमीला उत्सव साजरा केला जातो त्याचे कारण असे कीं, कडूसचे गंगारामबोवा मवाळ यांची एकदा म्हैस चुकली. तिचा शोध करीत गंगारामबोवा भंडाऱ्या डोंगरावर तुकाराम महाराज देवाचे चिंतन करीत बसले होते तेथें आले व विचारू लागलें, 'महाराज, आमची म्हैस पाहिली कां ?' मोहग्रस्त माणसांना कोणास, कोठे, केव्हां व काय विचारावें हें कळत नाहीं. गंगारामबोवांच्या लक्षांत येत नव्हते ! कारण देहूगांवात काय म्हशी थोड्या होत्या कीं, ती उणीव भरून काढण्याकरिता त्यांना भंडारा गाठावा लागला. मवाळांनी प्रश्न विचारला, 'म्हैस पाहिली कां ?' तुकाराम महाराजांचा खाक्या ठरलेला, जसा आपल्या कुटुंबाला उपदेश केला तसाच त्यांनी गंगारामबोवांनाहि केला कीं बाबा म्हशीचा शोध करण्याकरिता इतके परिश्रम घेतोस, मग देवच्याकरिता कां कांहीं करत नाहीस ? अरे शोध देवाचा करावा.

**देव पहावया करी वो सायास ।**
**न धरी हे आस नाशिवंत ॥ १ ॥** तु. म. ६२७

**अर्थ :-** अगें, देव पाहण्याविषयी यत्न कर, तूं नाशिवंत प्रपंचाची आशा धरू नकोस.

*या बोलण्यामुळे मवाळावर परिणाम झाला हा त्याचाभाव पाहून तुकाराम महाराज म्हणाले, 'तुझी म्हैस घरीं बांधली आहे जा.' तें घरीं गेले तर खरोखरच म्हैस बांधलेली आढळली. त्यामुळे तें*



भाकरी घेऊन पुन्हा भंडाऱ्यावर आले व तुकाराम महाराजांना भाकरी खाण्याविषयी आग्रह करूं लागले. आग्रहास्तव प्रसाद म्हणून भाकर खाल्ली. उपाधी टाळावी म्हणून दुसऱ्या दिवशी महाराज दुसऱ्या डोंगरावर निघून गेले. गंगारामबोवा मवाळ भंडारा डोंगरावर गेले तेव्हां महाराज दिसले नाही. देहूला आले तर महाराज घरीच होते त्यामुळे त्यांना आनंद झाला. तेव्हांपासून तें शिष्य बनून सांगाती राहूं लागले. पुढे तुकाराम महाराजांनी माघ शुद्ध दशमीचा उत्सव कडूसला करण्यास सांगितलें. एके वेळेला त्यांनी महाराजांना उत्सवास येण्याचे निमंत्रण दिले. महाराजहि कडूसला गेले; पण त्या ठिकाणी त्यांच्या घराण्यांतील एक मनुष्य मेल्यामुळें त्या वर्षी उत्सव बंद राहिला हें पाहून तुकाराम महाराजांनी या उत्सवामध्ये कोणी मरणार नाहीं, म्हणजेच सुतक येणार नाही, तसेच मुलं देवी निघून मरणार नाहीं असा आशीर्वाद दिला. तेव्हांपासून उत्सवात कोणी मरत नाहीं, असे त्यांच्या घराण्यांतील लोक सांगतात. ३५० वर्षे झाली तरी उत्सव अद्याप चालू आहे. गंगाराम बोवा हें एक टाळकरी होते तसेच गाथ्याचे लेखक झाले. कडूसप्रमाणें देहू, भंडारा डोंगर, आळंदी, पंढरपूर, इगतपुरी वगैरे सर्व महाराष्ट्रांत माघ शुद्ध दशमीचा उत्सव साजरा केला जातो कारण त्या दिवशी तुकाराम महाराजांना अनुग्रह झाला. त्याचाच विचार या अभंगांत आहे.

**सत्यगुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥**

या अभंगाचा आरंभ मोठा मजेदार आहे. यांत ज्या गोष्टी सांगितल्या त्या सर्व अशक्य वाटतात. यामुळे कोणाचा विश्वास बसणार नाहीं हें तुकाराम महाराज जाणून होते- त्यांना जो अनुभव आला व श्रीगुरूंचा अनुग्रह झाला हें सर्व खरें असून त्यावर लोकांचा विश्वास बसावा म्हणून अभंगाला सुरुवात करतांना सत्य या शब्दाची

योजना केली आहे. **'सत्य गुरुराये कृपा मज केली'** स्वतः त्यांनी संसार जाळला, गिरी कपाटी हिंडलें, तेव्हां कुठे गुरुकृपा झाली. जन्मास येऊन श्रीगुरुकृपा संपादन केली नाहीं तर परमार्थाचा सर्व व्यवहार व्यर्थ आहे. मग बाकीचे ज्ञान कितीहि होवो, तो पुरुष श्रुतीचे पांडित्य करो अथवा शास्त्रांचे अर्थ त्याच्या डोळ्यासमोर उभे राहोत, परंतु तें त्याचे परोक्षज्ञान समजावें असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

**वेदशास्त्र जाणीतलें । आगमी पूर्ण ज्ञान झालें ।**
**पुराणमात्र धांडोळिले । आहे तें राहिले वेगळेंचि ॥ ४ ॥ ज्ञा. १९८**

**अर्थ :-** जरी समग्र वेदांचे व शास्त्रांचे अध्ययन व त्यांचे ज्ञानहि झाले, सर्व पुराणें धुंडाळली तरी प्राप्त वस्तु जो मोक्ष तो वेगळाच आहे.

अपरोक्ष ज्ञान नसेल तर त्यांचा जन्म व्यर्थ होय. शास्त्रांची संपत्ती एका बाजूला आणि श्रीगुरूंची कृपा दुसऱ्या बाजूला. हें दोन्ही जर तोलून पाहिले तर श्रीगुरूंचे पारडे खाली बसेल. उदा.- रुक्मिणीचे तुळशीदळ. भगवंताशी तुलना करतांना तुळशीदळाचे पारडे खाली आले त्यामुळे सत्यभामेचा गर्व परिहार झाला. ही **गोष्ट सांगणे,** त्याप्रमाणे तुकाराम महाराज म्हणतात, 'मी माझा अनुभव सांगतो. आत्मप्रचिती सांगतो. खरोखरच श्रीगुरुरायांनी माझ्यावर कृपा केली म्हणजेच अध्यात्मनिरूपण केले. याचे तात्पर्य असे आहे कीं, १) गुरुराजांनी माझ्यावर कृपा केली हें खरें (सत्य) आहे असे विधान यांत सुचविले आहे. २) सत्य हे कृपेचे विशेषण धरल्यास त्याचा अर्थ गुरुराजांनी माझ्यावर खरी कृपा केली. इतरांकडून होणारी कृपा खोटी असते. उदा. अमक्या महाराजांकडून त्यांच्या कृपेने पैसे मिळाले, लग्न झाले, मुलगा झाला असे बोलले जाते. पण ही खरी कृपा नाहीच. म्हणूनच श्रीगुरुंकडून होणारी कृपा खरी असते. हें तुकाराम महाराजांना सत्य शब्दाने सुचवावयाचे आहे. ३) सत्य हा



शब्द गुरुराये या शब्दाचे विशेषण घेतल्यास ज्या गुरूंनी माझ्यावर कृपा केली, तें सत्य गुरुराज होते, म्हणजेच सद्‌गुरुराज आहेत, असे सत्य या शब्दाने सांगावयाचे आहे. असत्याची (खोट्याची) ओळख करून देणारे तें असद्‌गुरु व सदाचि (परमात्म्याची) ओळख करून देणारे तें सद्‌गुरु होत. असे एकनाथ महाराजांनी सांगितलेले आहे.

**मंत्रतंत्र उपदेशिर्ते । घरोघरीं गुरु आहेत आइते । जो शिष्यासी मेळवी सद्‌वस्तुतें । सद्‌गुरु त्यातें श्रीकृष्ण मानी ॥** ए.भा.२- ४८१

**अर्थ :-** मंत्र तंत्राचा उपदेश करणारे गुरु घरोघर आयते असतात; पण शिष्याला जो सद्वस्तुप्रत पोचवितो, त्यालाच श्रीकृष्ण हें सद्‌गुरु मानतात.

याचे थोडक्यांत तात्पर्य, सत्य शब्दाचे तीन अर्थ - १) गुरुराजांनीमाझ्यावर कृपा केली हें खरें आहे. २) गुरुराजांनी माझ्यावर खरी कृपा केली. ३) स्वतः सद्‌गुरु राजांनी माझ्यावर कृपा केली.

**सत्यगुरुराये कृपा मज केली । परी नाहीं घडली सेवा कांहीं ॥**

१) या ठिकाणी तुकाराम महाराज म्हणतात - श्रीगुरूंनी माझ्यावर कृपा केली, ती कृपा कोणती ? म्हणजे कसा उपदेश केला ?

२) माझ्याकडून सेवा घडली नाहीं असे सांगतात. या सांगण्यांत सेवा न घडता श्रीगुरु उपदेश करूं शकतात काय ? असे दोन मुद्दे निर्माण होतात, त्याचा विचार भावार्थानंतर पाहूं.

सेवा न करता श्रीगुरूंनी उपदेश केला हें निश्चित आहे, कारण त्यांना श्रीगुरुभेटीचा ध्यास लागला होता. तो ध्यास कसा असावा त्याचे ज्ञानेश्वर महाराज वर्णन करतात.

**म्हणे कै हें बिरडें फिटेल । कैं तो स्वामी भेटेल ।**
**युगाहिहूनि वडिल । निमिष मानी ॥ ज्ञा. १३ - ३७८**

अर्थ :- तो म्हणतो, ही गुरुआंज्ञारूपी दाव्याची गांठ केव्हां सुटेल व केव्हां तो स्वामी भेटेल ? तो (गुरूच्या वियोगांत जाणाऱ्या) निमिषाला युगाहून मोठे मानतो.

एकनाथ महाराजहि भागवताच्या दहाव्या अध्यायांत वर्णन करतात.

**सद्गुरु भेटावयाकारणें । हिंडे तीर्थें तपोवनें ।**
**गुरु न विसंबे मने । नित्य विधानें आचरतां ॥** ए. भा.१०-१३३

अर्थ :- सद्गुरूची भेट व्हावी म्हणून तो तीर्थे आणि तपोवनें हिंडत असतो. नित्यकर्में करीत असतांनाहि मनांतून एकक्षणभर सुद्धां सद्गुरूला विसंबत नाहीं.

**अस्वलाचिया परी । गुरुनामाचा जप करी ।**
**गुरुवांचोनि निरंतरीं । चिंता न करी आनाची ॥** ए. भा. १० - १३५

अर्थ :- तो अस्वलासारखा 'गुरु गुरु' असा सारखा जपच करीत असतो. निरंतर गुरुवांचून दुसऱ्या कशाचेहि तो चिंतन करीत नाहीं.

तुकाराम महाराज असे चिंतन करीत फिरत फिरत भंडाऱ्या डोंगरावर आले व त्याठिकाणी तें झोपलें. जागेपणी जसा ध्यास असतो, तोच स्वप्नामध्यें प्रतितीला येतो, असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**आणि जागता जंव असिजे । तंव जेणे ध्यानें भावना भाविजे ।**
**डोळां लागत खेंवो देखिजे । तेंचि स्वप्नीं ॥** ज्ञा. ८ - ७३

अर्थ :- आणि जेव्हां मनुष्य जागा असतो, त्या वेळेला त्याच्या वृत्तीने ज्याचा ध्यास घेतलेला असतो तेच त्याला डोळा लागल्याबरोबर स्वप्नांत दिसते.

त्याप्रमाणे त्यांना स्वप्न पडले व स्वप्नांत आपण इंद्रायणी नदीवर स्नानाला जात आहोत व मध्येच श्रीगरु यांनी आपल्याला गाठले आणि



दर्शन दिले. तुकाराम महाराजांचा असा नियम होता कीं, ब्राह्मण पाहिला कीं, त्याला नमस्कार करावयाचा. बाबाजी श्रीगुरु हें ब्राह्मण होते. त्यांना पाहिल्याबरोबर त्यांनी साष्टांग नमस्कार केला.

**श्रीसंतांचिया माथा चरणावरी ।**
**साष्टांग हें करी दंडवत ॥ १ ॥** तु. म. २१७४

आत्मज्ञानानें सुशोभित असलेल्या संतांच्या पायांवर मस्तक ठेवून मी त्यांना साष्टांग दंडवत घालीत आहे.

नमस्कार केल्यावर गुरुरायांनी तुकाराम महाराजांच्या मस्तकावर हात ठेवला हेच अभंगाच्या दुसऱ्या चरणात सांगतात.

**सांपडविलें वाटें जाता गंगास्नाना । मस्तकी तो जाणा ठेविला कर ॥**

श्रीगुरूंनी मस्तकावर हात ठेवल्याशिवाय खरी कृतार्थता नाहीं.

**या कारणें श्रीगुरुनाथु । जंव मस्तकी न ठेवी हातु ।**
**निवृत्तिदास असे विनवतु । तंव निवांत केवीं होय ॥ ६ ॥** ज्ञा. म. ४९४

अर्थ :- या करिता श्रीगुरूंनीं कृपाळू होऊन तुझ्या मस्तकावर हात ठेविला नाहीं तोपर्यंत तूं निवांत कसा होशील, म्हणजे ब्रह्मानंदाचा अनुभव तूं कसा घेशील, असे महाराज सांगतात. मस्तकावर हात ठेवणें हा एक प्रकारचा शक्तीपात केला. याला स्पर्श दीक्षा म्हणतात. त्याला जणूं काय थापटून जागे केलें.

**तो महावाक्याचेनि नांवें । गुरुकृपेचेनि थांवें ।**
**माथा हातु ठेविला नव्हें । थापटिला जैसा ॥** ज्ञा. १८ - ४०४

अर्थ :- त्यास महावाक्याच्या उपदेशाच्या शब्दांनी (हाक मारून) मग आपल्या कृपेच्या सामर्थ्यानें, गुरूंनी त्याच्या मस्तकावर हात ठेविला असेच नव्हें, तर त्यास थापटून जागे केलें. तो जीव असेल तर शिवदशेला येतो.

**हे असो दिठी जयावरी झळकें । कीं हा पद्मकरू माथां पारुखे । तो जीवचि परि तुके । महेशेंशीं ॥ ९ ॥ ज्ञा. १० - ९**

**अर्थ :-** हे राहूं द्या. ज्याच्यावर आपली कृपादृष्टी पडते अथवा आपला वरदहस्त ज्याच्या मस्तकावर ठेवला जातो, तो जीवच खरा, परंतु तो शिवाच्या बरोबरीला येतो. या न्यायाला अनुसरून तु. म. म्हणतात

**सांपडविले वाटे जाता गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥ २ ॥**

तुकाराम महाराज म्हणतात, 'श्रीगुरूंनी मस्तकावर हात ठेवल्यानंतर भोजनाकरिता पावशेर तूप मागितलें; परंतु स्वप्नामध्येच विसर पडला हेच अभंगाच्या तृतीय चरणांत सांगतात.

**भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजीं ॥ ३ ॥**

तुकाराम महाराजांनी संतांशी भाषण केलें, त्या वेळेस आपणास स्वप्नांत गुरूंचा उपदेश झाला आहे, असे सांगितलें आहे.

**मानियेला स्वप्नी गुरूचा उपदेश ।**
**धरिला विश्वास दृढ नामी ॥ १४ ॥ तु. म. ६४६**

**अर्थ :-** श्रीगुरु बाबाजी चैतन्यांनी स्वप्नामध्यें केलेल्या उपदेशाचा स्वीकार करून 'रामकृष्णहरि' नामाच्या ठिकाणी दृढ विश्वास ठेवला.

निळोबारायांनी देखिल असेच वर्णन केले आहे.

**बाबाजीनें स्वप्नी येऊनि तुकयाला ।**
**अनुग्रह दिला निजप्रिती ॥ ७ ॥ निळोबाराय ८८४**

**यावरून** असे सिद्ध होते कीं, अनुग्रह दिला तो स्वप्नांत, तूप मागितलें तेहि स्वप्नांत व विसर पडला तोहि स्वप्नांतच. ह्या सर्व गोष्टी पाहणाऱ्याला अशक्य वाटतात. कारण स्वप्न हें खोटें असते. स्वप्नवृत्ती



तमाचा व रजाचा भाग आहे. स्वप्नातील नाश व स्वप्नातील उत्कर्ष वगैरे जेवढी ज्ञानें होतात ती सर्व मिथ्या असतात. प्रमाता, प्रमाण प्रमेयद्वारा जें ज्ञान अंतःकरण विशिष्ट चैतन्याचे होईल तेव्हां तें ज्ञान खरें समजावें. व्यवहारामध्यें जागृतीचे ज्ञान खरें असते. परंतु तुकाराम महाराजांना तर स्वप्नांत ज्ञान झाले, म्हणून तें तर प्रातिभासिक म्हणजेच मिथ्या होय. मग आपल्या पदावर मिथ्या ज्ञानानें कसे बसविलें, ही एक शंका आहे. याचे उत्तर द्यावयाचे ते असे - इंद्रियाद्वारें होणारे ज्ञान त्याला नेहमीच खरें म्हणता येत नाही. उदा. वेगाने चाललेलें रथचक्र स्थिर दिसते किंवा रेल्वेत बसले असता झाडें चाललेली दिसतात. हें इंद्रियाद्वारें होणारे ज्ञान जरी सत्य वाटत असले तरी सत्य नाहीं. इंद्रियें खरेच ज्ञान करून देतील असेहि नाहीं. तसेच साक्षीभाष्य ज्ञान सर्वच खोटे नाहीं. उदा. सुख दुःख तेव्हां खोटे असा निश्चय करता येत नाहीं, त्याचे विषय बदलतील. परंतु ज्ञान बदलत नाहीं. ज्ञान हें तिन्ही कालांत, तिन्ही अवस्थांत सारखे असते. स्वप्नांत लिंगशरीर असते म्हणून तें ज्ञान सर्वच खोटे म्हणता येत नाहीं.

उदा. १) हरिश्चंद्राला स्वप्न पडले. स्वप्नांत राज्यदान दिले तें सकाळी खरें करून दाखविलें. २) मंदोदरीला स्वप्न पडले, लंकेमध्यें राम येऊन रावणाचा वध करून बिभीषणाला राज्य दिले तें पुढे खरे ठरले. ३) विठ्ठलपंतांना स्वप्न पडून भगवंतानें आदेश दिला म्हणून रुक्मिणीचा स्वीकार केला. ४) त्याचप्रमाणे तुकाराम महाराजांचेहि स्वप्नं खरें ठरले. यावरून असे सिद्ध होते कीं, स्वप्नें ही खरी ठरू शकतात. याला स्वप्न जागृती म्हणतात. सिद्धान्तबिंदू ग्रंथांत जागृती अवस्थेचें तीन प्रकार, स्वप्नावस्थेचे तीन प्रकार, सुषुप्ति अवस्थेचे तीन प्रकार असे एकंदर नऊ प्रकार सांगितलेलें आहेत, तें आपण तेथेच पाहावे. तपाने पडलेलें स्वप्न खरे ठरते. श्रीगुरूंनी भोजनाकरिता पावशेर

तूप मागितले, तें कोणते ? खाण्याचे तूप मागितलें असेल तर तसे नाहीं. मग तूप म्हणजे काय व तें पावशेरच कां मागितले याचा थोडक्यांत विचार तो असा, तूप याचा अर्थ 'अंतःकरण' तूप जसे स्नेहयुक्त असते तसेच अंतःकरण देखिल स्नेहयुक्त असते म्हणून अंतःकरणाला तुपाची उपमा देतात. त्या अंतःकरणाचें मन, बुद्धि, चित्त, अहंकार असे चार विभाग आहेत. या चार भागांपैकी पावभाग जें चित्त तें श्रीगुरूंनी मागितले म्हणजेच पावशेर तूप मागितले. चित्त मागण्यांत एक हेतू आहे परमार्थ हा चित्ताने होतो. चित्त स्वाधीन झाले तर सर्व कांहीं अवगत होते.

**चित्त मिले तो सब मिले । नहिं तो फुकट संग ।**
**पानी पाथर एक ठोर । कोरा न भिजे अंग ॥** तु. म. ४२२

**अर्थ** :- तुकाराम महाराज म्हणतात, चित्ताला चित्त मिळालें कीं, सर्व कांहीं मिळालेच, नाहीतर कोणाचीहि संगती करणे फुकट आहे, जसे पाणी आणि दगड ह्या दोघांचा योग जरी झाला तरी त्या दगडाच्या आंतील एक भागसुद्धां भिजत नाहीं.
(जलसंगतीनें दगडाच्या काठीण्यांत नरमाई येत नाहीं).

१) शरीरांत पित्त (जठराग्नि प्रदीप्त) २) संसारांत वित्त (पैसा) तसेच ३) परमार्थाला चित्ताची गरज आहे. एवढ्यासाठी श्रीगुरूंनी चित्त मागितलें.

**भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥ ३ ॥**

तुकाराम महाराज म्हणतात, 'सद्गुरूंनी पावशेर तूप मागितलें पण तें दिले गेले नाहीं.' याबद्दल त्यांना जागृतीत आल्यावर खेद झाला व आपणाकडून सेवेत कांहीं अंतराय घडला, म्हणून कीं काय कोण जाणे पण सद्गुरूंनी जाण्याची त्वरा केली. हेच अभंगाच्या चौथ्या चरणांत सांगतात.



**काय कळे उपजला अंतराय । म्हणोनियां काय त्वरा झाली ॥**

पण जाता जाता जो अनुग्रह केला, या ठिकाणी अनुग्रह देणारा व ज्यास अनुग्रह द्यावयाचा तो हें दोघेहि उच्च अधिकाराचे असावे लागतात. ज्याप्रमाणे द्रव्य आणि मुलगी द्यावयाची असेल तर त्याच्या कुळाचा व कर्माचा विचार करणे अवश्य आहे.

**द्रव्य आणि कन्या । येथें कुळ कर्म शोधण्या ॥ ३ ॥** तु. म. ३२२२

**अर्थ** :- द्रव्य दान अथवा कन्यादान करण्यास चांगले-वाईट कुळ, कर्म, आचार, विचार ह्यांचा शोध घेऊन दान करावे.

**शोधूनि अन्वय वंश वंशावळी ।**
**परस्परा कुळी उच्चारण ॥ १ ॥** तु. म. ३९६६

**अर्थ** :- देव हा आपल्या दासांवर मोक्ष साम्राज्याचा अभिषेक करण्याचें वेळी (अन्वय) सांप्रदायाची बोध परंपरा वंश, कुळ, गोत्र, घराणे पवित्र आहे कीं नाहीं याचा शोध घेऊन आई-वडील व वडिलांकडील कुळाचे प्रथम उच्चारण करतो.

म्हणूनच तुकाराम महाराज ज्यांनी आपल्यावर अनुग्रह केला तें योग्य अशा गुरुपरंपरेतलें होतें हे दाखविण्याकरितां ती परंपरा पांचव्या चरणांत सांगतात.

**राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥ ५ ॥**

राघव चैतन्य, केशव चैतन्य ही मालिकेची खूण सांगितली व त्या परंपरेतील मी बाबाजी चैतन्य असे नांव सांगितलें आणि रामकृष्ण हरि या मंत्राचा उपदेश केला हेच अभंगाच्या सहाव्या चरणांत सांगतात.

**बाबाजी आपुलें सांगितलें नाम । मंत्र दिला रामकृष्ण हरि ॥ ६ ॥**

याठिकाणी राघव चैतन्य, केशव चैतन्य, बाबाजी चैतन्य यांच्या विषयींची माहिती, आरंभी तुकाराम महाराजांच्या चैतन्य संप्रदायाचा इतिहास यामध्ये दिलेली आहे. नैमित्तिक कीर्तनमाला भाग ३रा ती आपण पाहून घेणे. तुकाराम महाराज म्हणतात, 'ज्या नाममंत्राविषयी माझ्या ठिकाणी आवड होती तोच सोपा मंत्र सांगितला. माझ्या मनातला भाव जाणूनच उपदेश केला.'

**माझिये मनींचा जाणोनिया भाव । तो करी उपाव गुरुरावो ॥**
**आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नोहे गुंफा कांहीं कोठें ॥**
तु. म. ४८०

**अर्थ :-** गुरुराजाने माझ्या हृदयातील भाव जाणून त्याप्रमाणें मला मार्ग सांगितला. ॥ १ ॥ तो हा कीं, माझ्या आवडीचा, सोपा जो 'रामकृष्ण हरि' हा मंत्र तोच मला सांगितला. त्या मंत्राच्या योगानें चित्त कोठेहि व कशाहि प्रकारे गुंतले जात नाही. ॥ २ ॥

जसे कांहीं गुरु एकांतात मंत्र देतात - टाक १॥ रुपया (दीड रुपया). होय तूं तिकडे व मी इकडे. जर कोणी विचारलें कीं कोणता मंत्र सांगितला तर ते म्हणतात, सांगावयाचे नाहीं. ' असा कान फुंकण्याचा चोरीचा व्यवहार नाहीं.'

**नेणे फुंको कान । नाहीं एकांतीचें ज्ञान ॥ १ ॥** तु. म. ३३९१

**अर्थ :-** कोणाच्या कानांत गुरुमंत्र सांगणे, हें मी मुळीच जाणत नाहीं, तसेच एखाद्या शिष्यास एकांतात बसून तत्त्वमसि महावाक्याचा विचार सांगण्याचे ज्ञानहि मज जवळ नाहीं.

**सुलभ हें केलें सकळां जीवन ।**
**फुंकावेचि कान न लगे कांहीं ॥ ३ ॥** तु. म. ३३५८



**अर्थ :-** कलियुगांत सर्वांना जगावयास हेच एक सोपे साधन केले आहे, म्हणून उगाच वाटेल तो गुरु करून कान फुंकून घ्यावे लागत नाहीं.

**तुका म्हणे नाहीं चोरीचा व्यापार ।**
**विठ्ठलाचें सार नाम घ्यावें ॥ ५ ॥** तु. म. २४९५

**अर्थ :-** तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठलाचे सारभूत नाम घेणे, हा व्यवहार चोरीचा (झाकलेला) नाहीं. तर उघडा मंत्र सांगितला.

**उघडा मंत्र जाणा रामकृष्ण म्हणा ।**
**तुटती यातना गर्भवास ॥ २ ॥** तु. म. २४९५

**अर्थ :-** 'रामकृष्ण' हा मंत्र उघडा आहे, हें जाणून तूं त्याचा उच्चार कर; त्या योगाने तुझ्या गर्भवासाच्या यातना नाहीशा होतील. या मंत्रामध्ये मोठे सामर्थ्य आहे. मंत्र शब्दाचा अर्थच तो आहे कीं ज्याचे मनन केले असतां तो जीवाचे रक्षण करतो म्हणून त्यास मंत्र म्हणतात.

**मननात् त्रायते यस्मात्, तस्मात् मंत्रः प्रकीर्तितः ।**

संसार समुद्रांतून जीव तरून जाऊ शकतो.

**विठोबाचें नाम सुलभ सोपारें ।**
**तारी एकसरें भवसिंधु ॥ २ ॥** तु. म. २५०७

**अर्थ :-** विठोबाचे नाम घेणे कोणालाहि सुलभ असून उच्चारण्यास सोपे आहे आणि तें सरसकट सर्वांना संसार समुद्रांतून तारून नेते.

तुकाराम महाराजांवर सद्गुरूंनी कृपा केली त्या वेळेस माघ शुद्ध दशमी व गुरुवार होता असा दिवस पाहून अंगीकार केला हेच अभंगाच्या शेवटच्या चरणांत सांगतात.

**माहो शुद्ध दशमी पाहुनी गुरुवार । केला अंगीकार तुका म्हणे ॥ ७ ॥**

शके १५५४ माघ शुद्ध दशमी गुरुवारी वयाच्या २४ व्या वर्षी

गुरूंचा उपदेश झाला. वास्तविक गुरूंची भेट होणे कठीण आहे असे एकनाथ महाराज सांगतात.

**चंद्रामृत सुखे सेववेल । रवि अस्ता जातां धरवेल । बाह्या हेळासागर तरवेल । परी त्या साधुची भेटी न होईल गा ।। ४ ।। ऐसे कैसीयानें भेटती तें साधु ।।** ए. म. १६१०

असे जरी असले तरी जीव कर्मसाम्य दशेवर आला म्हणजे सद्गुरु त्याला भेट देतात. कर्मसाम्य दशा म्हणजे संचितकर्म ज्ञानाने जळून खाक होणे, प्रारब्ध कर्म भोगून संपणे व क्रियमाण कर्म भर्जीत बीजवत् होणे. ज्याप्रमाणे आंबा पाडाला आला म्हणजे राघो आपणहून येतात तद्वत् जीव कर्मसाम्यदशेवर आला कीं श्रीगुरु आपोआप भेट देतात.

**धरवणी वेंचे सरें । तैसे भोगे प्राचीन पुरे । नवे तंव नुपकरें । काहींची करूं ।। ऐसी कर्मसाम्यदशा । होय तेथ वीरेशा । मग श्रीगुरु आपैसा । भेटेचि गा ।।** ज्ञा.१८-९६५-६६

**अर्थ :-** सांचवलेले पाणी जसे खर्चून संपते, तसे भोगून प्रारब्ध संपते आणि नवे (क्रियमाण) तर कांहींच करण्याला उपयोगी पडत नाहीं (कारण) पुढच्या जन्माला कारणीभूत होईल असे (क्रियमाण) कर्म तो करीत नाहीं. ।। ९६५ ।। अरे वीरश्रेष्ठा अर्जुना, त्यावेळी अशी कर्मसातत्याची अवस्था होते, तेव्हां मग श्रीगुरु आपण होऊनच भेट देतात. ।। ९६६ ।।

किंवा देवाची कृपा झाली म्हणजे श्रीगुरु भेट देतात. ती कृपा केव्हां होते तें एकनाथ महाराज सांगतात.

**जन्म कोट्यांनी हरिसेवा जोडें । नवविधा भजन सांग घडें । तंव वैराग्य तें पाहे पुढें । पूर्व प्राचीन फल रोकडे ।। १ ।। ऐसे तैच मिळती**



**तें साधु ।। धृ ।।** ए. म. १६११ (हा संपूर्ण अभंग पाहणे.)

**अर्थ काम चाड नाहीं चित्ता । मानामान मोह माया मिथ्या । वर्तें समाधानी जाणोनि नेणतां । साधु भेट देती तया अवचिता रे ।। ४ ।। ऐसे ऐसियाने भेटती तें साधु ।। धृ ।।** तु. म. २१८७

**अर्थ :-** अरे, ज्याच्या चित्तांत द्रव्य कामाची इच्छा नाहीं आणि ज्यास मान-अपमान, मोह-माया ही सर्व खोटी भासत आहेत, सर्व तत्त्वज्ञान संपादन करून जाणिवेचा अभिमान टाकून जो नेणता होतो, तो समाधानाने वागतो; अशा ह्या पुरुषास साधु अकस्मात् भेट देतात. ।। ४ ।। असे साधु अशा ह्या उपायाने भेटतात .

**बहु अवघड आहे संतभेटी । तरि जगजेठी करुणा केली ।।** २२०१

**अर्थ :** संतांची भेट होणे फार दुर्लभ आहे, म्हणून हें जगांत श्रेष्ठ असणाऱ्या देवा, मी ह्याविषयी तुमच्याजवळ करुणा भाकली आहे.

**माहो शुद्ध दशमी पाहुनी गुरुवार । केला अंगीकार तुका म्हणे ।।**

**- भावार्थ समाप्त -**

व्याख्यान :- अभंगाचा भावार्थ सांगत असतांना (१) श्रीगुरूंनी कोणता उपदेश केला व (२) सेवा न घडता श्रीगुरु उपदेश करू शकतात काय ? असे दोन मुद्दें निर्माण केले होते. त्याचा क्रमानें विचार करू.

(१) महात्मे जे उपदेश करतात, ज्याचा जसा अधिकार असेल त्याला तें जसे पेलवेल तसा उपदेश करतात.

**अधिकार तैसा करूं उपदेश ।**
**साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ।। १ ।।** तु. म. ३५१४

**अर्थ :-** आम्ही परमार्थांत ज्याचा जसा अधिकार असेल, तसा

त्यास उपदेश करूं; कारण ज्याला जेवढे ओझे सोसेल तेवढेच त्याचे मस्तकी द्यावें हें बरे.

**ज्याचा जैसा अधिकार । तैसे बोलावे उत्तर ॥**

अधिकारी वर्ग तीन प्रकारचा आहे.

१) कर्मांचा २) उपासनेचा ३) ज्ञानाचा.

आपल्या भारताची लोकसंख्या अंदाजे नव्वद कोटीपर्यंत आहे. त्याचे जर, वर्गीकरण केले तर कांहीं कर्माचें अधिकारी, कांहीं उपासनेचें अधिकारी व कांहीं ज्ञानाचे अधिकारी आहेत.

१) त्यांत पहिल्या प्रथम ज्ञानाचे अधिकारी. त्यांचा आपण विचार करूं. एकनाथ महाराज म्हणतात.

**जें कां ब्रह्मभुवनापर्यंत । साचार जीवींहूनि विरक्त । जे विधिपूर्वक संकल्पयुक्त । कर्म त्यागित संन्यासी ॥ ऐशिया अधिकाऱ्यांकारणें । म्यां 'ज्ञानयोग' प्रकट करणें । जेणें कां निजज्ञानसाधने । माझी पावणें सायुज्यता ॥** ए. भा.२०-७४-७५

**अर्थ :-** जे कोणी खरोखरच अंतःकरणापासून ब्रह्मलोकींच्या भोगापर्यंत विरक्त असतात, जे कोणी विधिपूर्वक व संकल्पयुक्त संन्यास घेऊन कर्माचा त्याग करतात. ॥ ७४ ॥ अशा अधिकाऱ्यांकरिता मी 'ज्ञानयोग' प्रकट केला आहे. त्या आत्मज्ञानाच्या साधनानें माझी सायुज्यता म्हणजे मद्रूपता प्राप्त होते. ॥ ७५ ॥

ज्ञानयोगाच्या अधिकाऱ्यास सद्गुरु हें आपल्या पदावर आरूढ करतात.

**कृपाकटाक्षें न्याहाळिलें । आपल्या पदी बैसविले । बापरखुमादेवीवरे विठ्ठलें । भक्ता दिधले वरदान ॥** ज्ञा.म.७१३

**अर्थ :-** ते ज्याच्याकडे कृपादृष्टीनें पाहतात, त्याला आपल्या योग्यतेला



आणून बसवितात. याप्रमाणें रखुमादेवीवर जो. बाप विठ्ठल याने आपल्या भक्ताला वरदान दिले.

पदावर आरूढ केले म्हणजे काय केले हे ज्ञानेश्वर महाराज सांगतात. श्रीगुरूंची कृपा हीच कोणी पौर्णिमा, तिचा योग होताक्षणीच आत्मा अनुभवाला येतो.

**बोध चंद्राचिया कळा । विखूरलिया एक वळा ।**
**कृपा पुनीव लिला । करी जयाची ॥** अमृ. २ - ७

**अर्थ :-** बोधरूपी चंद्राच्या कला सर्वत्र विखुरलेल्या आहेत. चंद्राच्या विखुरलेल्या कला पौर्णिमेला एकत्र होऊन मिळतात, त्याप्रमाणे श्रीगुरुकृपारूप पौर्णिमेच्या योगाने एकत्र होतात, श्रीगुरूंची कृपा हीच कोणी पौर्णिमा, तिचा योग होता क्षणीच बोधरूपी चंद्राच्या कला बोधरूपी चंद्राशी युक्त होतात. चंद्र षोडश कलांनी युक्त होतो त्याप्रमाणें ज्ञानमात्र आत्मा अनुभवाला येतो.

मायारूपी हत्तीचा नाश करून मुक्तिरूपी मोत्यांच्या पक्वान्नाचे सद्गुरु जेवण घालतात.

**मोडोनि माया कुंजरू । मुक्त मोतियाचा वोगरू ।**
**जेवविता सद्गुरु । निवृत्ति वंदु ॥ ३ ॥** अमृ. २ - ३

**अर्थ :-** मायारूप हत्ती मोडून त्याचा नाश करून (त्या हत्तीच्या गंडस्थळातील) मुक्तिरूप मोत्यांचे पकान्न जेवूं घालणारा, जें सद्गुरु श्रीनिवृत्ती त्यांना वंदन करतो.

याच अनुभवावर आरूढ होऊन तुकाराम महाराज म्हणतात -

**मी वासुदेव तत्त्वतां । कळो येईल विचारीता । आहे ठाऊका सभाग्य संतां । नाहीं दुजा आणीक मागता गा ॥** तु. म.३३८

**अर्थ :-** मी निश्चयानें वासुदेवरूपच आहे, विचार केला असता तुम्हाला हें असे कळून येईल. भाग्यवान संतांना हा प्रकार माहीत आहे. माझ्याखेरीज दान मागणारा दुसरा कोणी येणार नाहीं.

हा अनुभव तुकाराम महाराजांना सद्गुरुकृपेनेच प्राप्त झाला.

२) आतां दुसरा जो कर्मयोगाचा अधिकारी अविरक्त असून विषयांच्या ठिकाणी आवड असलेला त्याच्याकरता सद्गुरु निष्काम कर्मयोगाचा उपदेश करतात.

**आतां जे कां केवळ अविरक्त । विषयालागीं कामासक्त त्यांलागीं म्यां प्रस्तुत । 'कर्मयोग' येथ प्रकाशिला ॥** ए.भा.२०-७६

**अर्थ :-** आतां ह्या लोकांत जे केवळ अविरक्त असतात, विषयासाठी कामासक्त झालेले असतात; त्यांच्यासाठी मी 'कर्मयोग' प्रगट केला आहे.

३) तिसरा जो उपासनेचा अधिकारी आहे. संसाराविषयीचे भय वाटते परंतु सुटत नाहीं. कर्माचा अधिकारी जसा विषयांचे सेवन करतो, तसा हा करीत नाही. संसार नको होतो पण सुटत नाहीं.

**भय वाटे पर । न सुटे हा संसार ॥ १ ॥**
**ऐसा पडिलो काचणी । करी धांवा म्हणऊनि ॥ २ ॥** तु. म. १५०३

**अर्थ :-** ह्या संसाराचे मला मोठे भय वाटते, परंतु हा संसार सुटता सुटत नाहीं. ॥ १ ॥ असा मी मोठा पेचांत सांपडलो आहे. एवढ्याकरिता देवा, तूं धांव घे. ॥ २ ॥

जो विषयासक्तहि नाहीं व एकदम विरक्तहि नाहीं, अशाकरता उपासना सांगितली आहे.

**यापरी जो नव्हे विषयासक्त । ना निधडा नव्हे विरक्त । त्यालागीं**



**माझा भक्तिपंथ । मी बोलिलों निश्चित वेदवाक्यें ॥** ए. भा. २०-८७

**अर्थ :-** ह्याप्रमाणे जो विषयासक्तहि नव्हे आणि खरोखर विरक्तहि नव्हे अशा मधल्या स्थितीतला असेल त्याच्याकरिताच मी वेदमुखानें भक्तिमार्ग दाखवून दिला आहे.

तुकाराम महाराजांना ज्या वेळेस सद्गुरूंचा उपदेश झाला त्यावेळेस तें उपासनेचे अधिकारी होते. बाबाजींनी असे पाहिले कीं, हा उपासनेचा अधिकारी आहे. म्हणून यास नाममंत्र द्यावा कारण तुकाराम महाराजांचे तसे उद्‌गार आहेत.

मंत्र दिला रामकृष्णहरि । हाच उपदेश केला. पुढे याच नाममंत्रावर दृढ विश्वास ठेवला.

त्यामुळे तें जन्मभर नामस्मरण करीत राहिले. ''सत्य गुरुरायें कृपा मज केली'' तुकाराम महाराजांकडून जर सेवा घडली नाहीं, तर मग गुरूची कृपा कशी झाली ?

ह्याचे उत्तर थोडक्यांत असे कीं, ज्या अर्थी कृपा झाली त्या अर्थी सेवा झालीच असली पाहिजे. कारणाशिवाय कार्य दिसत नाहीं. गुरुकृपा हें जर कार्य आहे, तर गुरुसेवा हें कारण मानावेच लागेल. ज्ञानेश्वर महाराजांच्या भाषेत सांगावयाचे झाल्यास

**माझिया सत्यवादाचें तप । वाचा केलें बहुत कल्प ।**
**तया फळांचें हे महाद्वीप । पातली प्रभु ॥** ज्ञा. १६ - ३२

**अर्थ :-** महाराज, माझ्या वाचेने सत्य बोलण्याचे तप पुष्कळ कल्पा पर्यंत केले, त्या तपाच्या फळाचे हें गीता व्याख्यानरूपी मोठे बेट तिला (माझ्या) वाचेला प्राप्त झाले.

**पूर्वजन्मीं सुकृतें थोर केली । ती मज आजी फळासी आली ॥**

अर्थ :- ( ज्ञा. म. ७१९ ) मी अनेक जन्मांत जी थोर पुण्यकर्मे केली, ती मला आज फलद्रूप झाली.

**प्रभु आघवेनि येणें जन्में । जियें पुण्यें केली मियां उत्तमें ।**
**तयांची न ठकतीचि अंगीं कामें । सद्गुरु तुवा ॥ ज्ञा. १० - १६६**

अर्थ :- महाराज, या जन्मासह पूर्वीच्या सर्व जन्मांत मी जी उत्तम पुण्यें केली, त्यांच्याकडे माझी कामगिरी शिल्लक राहिली नाहीं. कारण त्यांनी (पुण्यांनी) तुझ्यासारखा योग्य सद्गुरु जोडून दिला.

तुकाराम महाराजहि तसेच सांगतात.

**परि उपतिष्ठे पूर्व पुण्यें ॥ ४ ॥** तु. म. २२७२

अर्थ :- परंतु, तें साधन प्राप्त होण्यास देखिल पूर्वपुण्य उदयाला यावे लागते.

**तुका म्हणे मज न घडतां सेवा ।**
**पूर्वपुण्य ठेवा वोढवला ॥ ४ ॥** तु. म. २१७४

अर्थ :- तुकाराम महाराज म्हणतात, माझ्याकडून संतांची सेवा न होता जो (ठेवा) = लाभ झाला आहे, तो पूर्वपुण्याईनेंच होय.

तात्पर्य, पूर्वी सेवा केलेली असल्यामुळे श्रीगुरूंची कृपा झाली. गुरुशिष्य परंपरा अगर श्रेष्ठाचार म्हणा असाच आहे. एखादा दांडगेश्वर गुरुकडे गेला व म्हणाला, करा माझ्यावर कृपा; तर तें जमणार नाहीं. गुरुकृपा होण्याकरिता सेवाच केली पाहिजे. सेवेशिवाय मेवा मिळत नाहीं. 'सेवा तर मेवा' अथवा 'चाकरी तर भाकरी' अशी एक म्हण आहे. यावर दृष्टांत -

१) एक वनस्पतीपासून सोने तयार करणारा किमयागार होता. त्याविषयी राजाच्या कानावर गोष्ट गेली. तेव्हां त्याने त्यास राजवाड्यांत



बोलावून घेतले व सागितले कीं, 'तूं मला ही विद्या शिकव.' तेव्हां तो म्हणाला, 'महाराज मला ही विद्या येत नाहीं. वास्तविक ती विद्या त्यास अवगत होती. परंतु त्याने येत नाहीं म्हणून सांगितलें. तेव्हां राजा म्हणाला, 'मी तुला तुरुंगांत ठेवणार व सहा महिन्यांची मुदत देतो. या मुदतीत मला विद्या द्यावी लागेल. न दिल्यास तुला फासावर जावे लागेल.' असे म्हणून त्यास तुरुंगांत नेण्याची आज्ञा केली. राजा प्रत्येक आठवड्यास त्या किमयागारास भेटत असे आणि म्हणत असे, 'मला विद्या शिकव, कशाला विनाकारण मरतोस ?' तेव्हां त्याने म्हणावें, 'महाराज, मला सोने तयार करता येत नाहीं.' शेवटी प्रधानाने राजास सांगितलें कीं, 'महाराज हे लोक लहरी असतात. मरतील पण विद्या देणार नाहींत. तेव्हां तुम्ही याची सेवा करा.' हे ऐकून राजा वेश पालटून तुरुंगांत जाऊं लागला आणि त्या किमयागारास चिलीम भरून देणे, गांजा मळून देणे, शापी भिजवून देणे वगैरे सेवा करी. त्यामुळे त्याने विचार केला, आता राजा आपणास फाशीवर देणार, म्हणून जाताजाता या पोरास आपण विद्या द्यावी. हा विचार आल्यानंतर सोने तयार कसे करावे ही विद्या त्याने शिकविली. पुढे सहा महिन्यांची मुदत संपली. राजाने त्याला सांगितलें, 'आता तरी विद्या शिकव.' तो म्हणाला, 'मला येत नाहीं.' तेव्हां राजा म्हणाला, 'नको शिकवू. मी तुला सोने तयार करून दाखवितो.' असे म्हणून राजाने सोने तयार करून दाखविले. तेव्हां किमयागार म्हणाला, 'राजा, तुला ही विद्या गादीवर बसून मिळाली नाहीं. कुठेतरी घासली असावी. कोणाची तरी सेवा केली असावी.' तात्पर्य, सेवेशिवाय ज्ञान मिळत नाही.

२) जयपाल नांवाचा राजा होता. त्याच्यावेळी मुकुंदराजस्वामी अंबेजोगाई येथे होऊन गेले. राजा त्याच्या नगरांत येणाऱ्या साधूंना बोलावून घ्यायचा व प्रश्न करायचा, आपण साधु

आहांत तर 'रिकबमें पावऔर ब्रह्म बताव' नही तो ले टिकाव.' तेव्हां त्या साधूंनी 'नाहीं म्हटले' तर त्यांना तळे खोदण्याच्या कामाकरता नेत असे. असे बरेच साधु त्याने कामाला लावले. हें पाहून मुकुंदराज स्वामी त्याच्या नगरात आले. शिपायांनी त्यांना राजासमोर उभे केले आणि राजाचा जो ठरलेला प्रश्न, 'रिकबमें पाव और ब्रह्म बताव, नही तो ले टिकाव' असे म्हटले तेव्हां स्वामींनी घोडा आणावयास सांगितला. त्यावर खोगीर टाकला. पाय ठेवण्याकरिता ज्या रिकाबी असतात त्या एका रिकाबीमध्ये राजाला पाय ठेवण्यास सांगितलें. दुसरा पाय दुसऱ्या रिकाबीमध्ये फेकणार अशा घोड्यावर बसणाऱ्या राजाच्या मस्तकावर स्वामींनी हात ठेवला. त्याचा परिणाम राजाला घोड्यावर बसता बसता समाधि लागली व घोड्यालाहि समाधि लागली. ती तीन दिवस होती. नंतर समाधीतून देहदशेवर आला तेव्हां तो हात जोडून म्हणाला, 'महाराज, हा आनंद अखंड मिळावा अशी इच्छा आहे.' तेव्हां स्वामी म्हणाले, 'अरे तूं साधु लोकांना कामाला लावले. त्यांना मोकळे कर व त्यांची सेवा कर.' पुढे संतसेवेने राजास विरक्ती प्राप्त होऊन भक्तिद्वारा अखंड समाधान प्राप्त झाले. तात्पर्य, सेवेशिवाय गुरुकृपा होत नाहीं.

श्रीगुरूंच्या कृपेकरता त्यांची सेवा करावी, असे भगवान देखील सांगतात.

**तद्‌विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः** गी. ४-३४

**अर्थ :-** (आचार्यांकडे जाऊन त्यांना) प्रणिपात करणे, प्रश्न करणे, सेवा करणे अशा रितीने ते ज्ञान प्राप्त करून घे. ज्ञानसंपन्न व अनुभवी आचार्य त्या ज्ञानाचा तुला उपदेश करतील.



**तें ज्ञान पैं गा बरवें । जरी मनी आथि आणावें ।**
**तरी संतां यां भजावे । सर्वस्वेंशीं ॥** ज्ञा. ४-१६५

**अर्थ :-** अरे, अर्जुना, तें उत्तम ज्ञान जर लाभावे असे मनांत असेल, तर या संतांस सर्वस्वेकरून तूं भजावेस.

भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात कीं, तुला ज्ञान प्राप्त करून घ्यायचे असेल तर संताकडे (गुरुकडे) गेले पाहिजे. कारण त्यांच्याकडे ज्ञान असते.

**चंद्र तेथे चंद्रिका । शंभु तेथे अंबिका ।**
**संत तेथे विवेका । असणे कीं जी ॥** ज्ञा. १८-१६३४

**अर्थ :-** महाराज, चंद्र तेथें चांदणें असावयाचे, शिव तेथे शक्ति असावयाचीच व संत तेथे सुविचार असायचाच.

**गुरु तेथ ज्ञान । ज्ञानी आत्मदर्शन ।**
**दर्शनी समाधान । आथी जैसें ॥** ज्ञा. १८ - १६३४

**अर्थ :-** जेथें गुरु तेथे ज्ञान, जेथे ज्ञान तेथे आत्मदर्शन जेथे आत्मदर्शन तेथे जसे समाधान असते.

आत्मज्ञानें चोखडीं । संत जे माझी रूपडी ॥ ज्ञा. १८-१३५६

**अर्थ :-** आत्मज्ञानानें शुद्ध असलेले जें संत, ती माझी रूपें आहेत.

**जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंटा ।**
**तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनी ॥** ज्ञा. ४-१६६

**अर्थ :-** ते संत ज्ञानाचे घर आहेत. त्यांची सेवा हा त्या घराचा उंबरठा आहे, अर्जुना, तूं सेवा करून तो स्वाधीन करून घे.

घरांत जर शिरावयाचे असेल तर दारातूनच गेले पाहिजे. कोणी म्हणेल आम्ही भिंतीतून जाऊं तर प्रवेश न होता डोके फुटेल.

**घरांत रिघावे दाराचिये सोई । भिंतीसवे डोई घेऊनि फोडी ॥** ३१५२

**अर्थ :-** ज्या कोणाला घरांत प्रवेश करावयाचा असेल, तर त्याने दरवाज्यानेच गेले पाहिजे. तसे न केले तर तो भिंतीबरोबर धडक घेऊन आपले डोके फोडून घेईल.

म्हणून संतांची सेवा करणे हा दरवाजा आहे. ती सेवा कशी करावी,

**तरी तनुमनुजीवें । चरणासीं लागावें ।**
**आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ॥** ज्ञा. ४-१६७

**अर्थ :-** एवढ्याकारिता शरीरानें, मनाने व जीवाने त्यांच्या चरणी लागावे आणि अभिमान सोडून त्यांची सर्व सेवा करावी.

सर्व अभिमान सोडून त्यांची सेवा केली पाहिजे. श्रीरामचंद्रप्रभूंनी वसिष्ठांची, तसेच भगवान श्रीकृष्णाने दुर्वास ऋषींची सेवा केली. एकनाथ महाराज म्हणतात :-

**रामनामें करिता घोष । जेणे तुटती भवपाश । तोही शरण श्रीवशिष्ठास । गुरुभक्तीस सादर ॥ ११३ ॥ पूर्णब्रह्म श्रीकृष्णनाथ । तोही म्हणवी गुरुभक्त । दुर्वास ऋषींची सेवा करीत । नित्यमुक्ती लागोनि ॥ ११४ ॥** आनंदलहरी

या उदाहरणांवरून गुरुकृपा होण्याकरता सेवाच केली पाहिजे, असे ज्ञानेश्वर महाराज देखील सांगतात.

**आणि संसारा ऐसा दारुण । जो भेटलाचि हरी शीण ।**
**तो ज्ञानदानीं सकरुण । भजिजे गुरु ॥** ज्ञा. १७-२०८

**अर्थ :-** आणि जो भेटतांक्षणीच संसारासारखें भयंकर दुःख नाहींसे करतो. अशा त्या ज्ञानदान करणाऱ्या व दयावान गुरूला भजतो.

अहंकार ही रात्र असून त्या रात्रीतून श्रीगुरु कृपारूपी पहाट



करतात,असे नामदेव महाराज आपल्या वासुदेवातून सांगतात.

**बाबा अहंकारनिशी घनदाट । गुरुवचनी फुटली पहाट । माता भक्ति भेटली बरवंट । तिने मार्ग दाविला चोखट गा ॥** ना. म.

भगवंतांनी सातव्या अध्यायांत वर्णन केले आहे. ज्ञानी पुरुषांचा साधनांपासून तर साध्यापर्यंत विचार सांगितला आहे.

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते ।**
**वासुदेवः सर्वमिती स महात्मा सुदुर्लभः ॥** गी. ७-१९

**अर्थ :-** अनेक जन्म घेतल्यानंतर 'सर्व (विश्व) वासुदेव होय' असे ज्ञान प्राप्त होऊन, तो ज्ञानी मला शरण येतो. (मला येऊन पोहोचतो); असा महात्मा अत्यंत दुर्लभ आहे.

या श्लोकावर ज्ञानेश्वर महाराजांनी उत्कृष्ट वर्णन केलेले आहे. तें आपण मुळांत पाहावे. त्यात कर्मक्षय होणे, ही एक पहाट आहे व श्रीगुरु कृपा हा उषःकाल आहे.

**ऐसा शरीरसंयोगाचिये राती । माजी धावतां सडिया आयती । तंव कर्मक्षयाची पाहती । पाहाट जाली ॥** ज्ञा. ७-१३०

**अर्थ :-** ह्या प्रमाणे देहतादात्म्यरूप रात्रींत सर्वसंग परित्यागरूपी तयारीने धांवत असतांना, कर्माच्या क्षयाची उजाडती पहाट झाली.

**तैसीच गुरुकृपाउखा उजळली । ज्ञानाची वोतपली पडली ।**
**तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ॥** ज्ञा. ७-१३१

**अर्थ :-** त्याचप्रमाणे गुरुकृपारूप उषःकाल झाला व ज्ञानरूपी कोवळे उन पडले, तेव्हां त्या प्रसंगी त्याच्या दृष्टीला ब्रह्मैक्याचे ऐश्वर्य दिसू लागले.

यावरून तुकाराम महाराजांचा कर्मक्षय झालेला होता. मागे

अनेक जन्मांमध्यें तें साधना करीत आले होते. त्यामुळे प्रस्तुत जन्मांत जरी गुरूंची सेवा झाली नाही तरीहि बाबाजी सद्गुरूंनी त्यांच्यावर कृपा केली. हेच प्रथम चरणांत सांगतात.

**सत्य गुरुरायें कृपा मज केली । परी नाहीं घडली सेवा कांहीं ॥**

गुरुकृपेमुळे मी कृतकृत्य झालो असे तुकाराम महाराज म्हणतात.

**तुम्ही सांभाळिले संतीं । भय निरसली खंती ॥ २ ॥**

**कृतकृत्य जालो । इच्छा केली तें पावलों ॥ ३ ॥ तु. म.२२०७**

**अर्थ :-** तुम्ही संतांनी जन्ममरणाचे भय व त्या विषयींचा खेद नाहींसा करून माझा सांभाळ केला (म्हणून मी कृतार्थ झालो.) ॥ २ ॥ ज्याची इच्छा केली होती तें मला परिपूर्ण मिळाले, मी आज कृतकृत्य झालो आहे. ॥ ३ ॥ संतांनी आपल्यावर कृपा करावी असे वाटत असेल तर त्यांचे आपण एकवेळ भजन करूं.

**ज्ञानेश्वर माउली ज्ञानराज माउली तुकाराम ।**

संत ज्या मार्गाने गेले त्या मार्गाने आपणहि जावें. भगवंताचे नामस्मरण करणे हाच त्यांचा मार्ग. आपणहि त्यांच्या मनोगताप्रमाणे वागले पाहिजे, म्हणजे भगवंतालाहि संतोष होतो.

आम्हां आवडे नाम घेता । तोंही पिता संतोषे ॥ १ ॥ तु.म.१९६७

**अर्थ :-** आम्हास हरीचें नाम घेणे आवडते व त्यामुळे तो आमुचा पिता देवहि संतुष्ट होतो.

**आम्ही तेणे सुखी । म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ॥ १ ॥**
**तुमचे येर वित्त धन । तें मज मृत्तिकेसमान ॥ २ ॥**
**कंठी मिरवा तुळसी । व्रत करा एकादशी ॥ ३ ॥**
**म्हणवा हरीचे दास । तुका म्हणे मज हे आस ॥ ४ ॥ तु. म. ६३८**

**अर्थ :-** (अहो, शिवाजीराजे) आम्ही त्रैलोक्याचे मालक आहोत, तेव्हां आमच्याकडे मग दिवट्या, छत्री, घोडे याचे काय महत्त्व आहे. आम्ही कशाने सुखी होऊं, हें तुम्हाला समजलेच नाहीं. आम्ही कशाने सुखी होऊं तें महाराज सांगतात. तुम्ही मुखाने विठ्ठल ! विठ्ठल ! हे नाम घ्या. ( म्हणा ) म्हणजे त्यायोगाने आम्ही सुखी होऊं. ॥ १ ॥ बाकीची तुमची धनसंपत्ती मला मातीप्रमाणें आहे. ॥ २ ॥ गळ्यामध्ये तुळशीची माळ घाला व एकादशी व्रत करा. ॥ ३ ॥ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही हरीचे दास आहोत. असे म्हणवून घ्या. हीच मला आशा आहे. ॥ ४ ॥



**आम्हा देणे धरा सांगतों तें कानीं । चिंता पाय मनीं विठोबाचे ॥ १ ॥**
**तेणें माझें चित्त होय समाधान । विलास मिष्टान्न नलगे सोनें ॥ २ ॥**
**व्रत एकादशी द्वारीं वृंदावन । कंठी ल्या रे लेणें तुळशीमाळा ॥ ३ ॥**
तु. म. ३५७३

**अर्थ :-** अहो जन हो, जर तुम्ही आम्हाला कांहीं देणगी देत असाल तर ही देणगी द्या, मी जे सांगतो तें तुम्ही कानानें ऐकून मनांत धरा तें असे कीं, मनामध्ये विठोबारायाच्या पायांचे चिंतन सर्वकाळ करा. ॥ १ ॥ अशी देणगी जर तुम्ही मला द्याल, तरच त्यायोगाने माझ्या चित्तास समाधान प्राप्त होईल. मला द्यावांचून तुमचे भोग, मिष्टान्न भोजन व सोनें आदिकरुन उपचारांची कांहींच गरज नाहीं. ॥ २ ॥ अरे, तुम्ही गळ्यांमध्ये तुळशीच्या माळा घालून एकादशी व्रत करा व दारामध्ये तुळशीवृंदावन घालून त्याची पूजा करा. ॥ ३ ॥

संतांना व देवाला खूष करावयाचे असेल तर एका भगवंताचे नामस्मरण केले पाहिजे तें कसे ? तर -

**जय विठ्ठल जयजय विठ्ठल ॥**

**- समाप्त -**

**३०. माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुरावो ॥ १ ॥ आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नोहे गुंफा कांहीं कोठें ॥ २ ॥ जाती पुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥ ३ ॥ जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटे ॥ ४ ॥ तुका म्हणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरू पांडुरंग ॥ ५ ॥**

**अर्थ :-** गुरुराजानें माझ्या हृदयांतील भाव जाणून, त्याप्रमाणेच मला मार्ग सांगितला. ॥ १ ॥ तो हा कीं माझ्या प्रितीचा जो सुलभ रामकृष्ण हरि हा मंत्र तोच मला सांगितला, त्या मंत्राच्या योगाने चित्त कोठेंहि गुंतले जात नाहीं. ॥ २ ॥ कित्येक साधुसंत त्या मंत्राच्या योगाने पुढें जाऊन या संसारसिंधुतून पार झाले. ॥ ३ ॥ हा मंत्र ज्ञान्याला व अज्ञान्याला ज्याला जशी आवड असेल, त्यांना तारणारी सांगड (दोन होड्या किंवा नावा एकत्र बांधून केलेले जलयान) तापें = (ताफा) व पेटें = (भोपळें) बांधून तयार केलेले जलयान आहे. ॥ ४ ॥ तुकाराम महाराज म्हणतात, कृपेचा समुद्र जो पांडुरंग, तोच भवनदीतून तारून नेणारे तारू = (जहाज) आहे; असा तारू मला सद्गुरूंनी = (संतांनी) दाखविला. ॥ ५ ॥

**३१. घालूनियां भार राहिलों निश्चिंती । निरविलें संतीं विठोबासी ॥ १ ॥ लावूनियां हात कुरवाळिली माथा । सांगितलें चिंता न करावी ॥ २ ॥ कटीं कर समचरण साजिरे । राहिला भीवरेतीरीं उभा ॥ ३ ॥ खुंटले सायास आणीक या जीवा । धरिले केशवा पाय तुझे ॥ ४ ॥ तुज वाटे आतां तें करी अनंता । तुका म्हणे संतां लाज माझी ॥ ५ ॥**



**अर्थ :-** मी आपला सर्वस्वी भार संतांवर घालून निष्काळजी राहिलो, त्यांनी मला विठोबाच्या स्वाधीन केले. ॥ १ ॥ माझ्या डोक्यावरून हात फिरवून त्यांनी मला कुरवाळले व तूं कांहीं चिंता करू नकोस, असे सांगितले. ॥ २ ॥ कमरेवर हात ठेऊन व सारखे पाय ठेऊन असणारा तो सुंदर असा पांडुरंग भीवरेच्या (चंद्रभागेच्या) तीरावर, विटेवर उभा राहिला आहे. ॥ ३ ॥ हे केशवा, ह्या जीवाकडून अन्य कोणतेहि उपाय अशक्य झाले, म्हणून तुझे पाय धरले आहेत. ॥ ४ ॥ तुकाराम महाराज म्हणतात, हे अनंता, तूं आतां, तुला वाटेल तें कर पण माझी लाज सर्वस्वी संतांना आहे. ॥ ५ ॥

**३२. माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरु ॥ १ ॥ पढियें देहभाव पुरवी वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥ २ ॥ मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलीया आघात निवारावे ॥ ३ ॥ योगक्षेम त्याचे जाणे जडभारी । वाट दावी करीं धरूनियां ॥ ४ ॥ तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पाहावें पुराणीं विचारूनि ॥ ५ ॥**

**अर्थ :-** माझ्या विठोबाचा भक्ताविषयीं प्रेमभाव कसा आहे ? तो पाहा, तोच माझा देव आणि तोच उपदेश करण्याकरिता माझा गुरु झाला आहे. ॥ १ ॥ आम्हाला जें जें प्रिय आहे, त्या विषयींच्या वासना तो पूर्ण करतो आणि शेवटी तो आपल्याजवळ घेऊन जातो. ॥ २ ॥ आपल्या भक्तावर आघात आले असतां, तें निवारण्याकरिता तो त्यांच्या मागे पुढे उभा राहून सांभाळ करतो. ॥ ३ ॥ कोणत्या वस्तुविषयी त्यांना अडचण आहे, कोणती वस्तु मिळण्याबद्दल त्यांना संकट वाटत आहे तें जाणून, तो त्यांना सावध करून बरोबर हाताला धरून परमार्थ मार्गाला लावतो. ॥ ४ ॥ तुकाराम महाराज म्हणतात, असे देव खरच करतो काय ? असा संशय असून ज्याच्या मनांत विश्वास नाहीं तर त्यांनी अनेक पुराणें धुंडाळून विचारपूर्वक पाहावीत. ॥ ५ ॥

**३३. आदिनाथ उमा बीज प्रकटलें । मच्छिंद्रा लाधलें सहज स्थिति ।। १ ।। तेचि प्रेममुद्रा गोरक्षा दिधली । पूर्ण कृपा केली गहिनीनाथा ।। २ ।। वैराग्यें तापला सप्रेमें निवाला । ठेवा जो लाधला शांतिसुख ।। ३ ।। निर्द्वंद्व निःसंग विचरता मही । सुखानंद हृदयी स्थिरावला ।। ४ ।। विरक्तींचे पात्र अन्वयाचे मुख । देऊनि सम्यक अनन्यता ।। ५ ।। निवृत्ति गहिनी कृपा केली पूर्ण । कूळ हे पावन कृष्णनामें ।। ६ ।।**

**अर्थ :-** आदिनाथ शंकरांनी पार्वतीला स्वबोधाचें रहस्य सांगितले. तें सहज मच्छिंद्रास प्राप्त झाले. ।। १ ।। तोच प्रेमयुक्त बोध त्यांनी गोरक्षाला दिला व त्यांनी गहिनीनाथाला दिला. ।। २ ।। वैराग्यानें तापलेले गहिनीनाथ त्या बोधाने निवाले. त्यांना तो शांतिसुखाचा ठेवाच सांपडला. ।। ३ ।। चित्तांत अभेदभावाचा उदय झाल्यामुळे ते पृथ्वीवर निःसंगपणानें पुष्कळ फिरले व त्यामुळे तो सुखानंद त्यांच्या चित्तांत स्थिर झाला. ।। ४ ।। निवृत्ति हा वैराग्यशील असून त्याच्या चित्तांत अनन्य प्रेम उत्पन्न केले तर हा ( निवृत्ति ) अन्वयाचे मुख म्हणजे सांप्रदायाचा प्रचार करण्याचे उत्तम द्वार होईल. असे ( मुख = द्वार ) जाणून गहिनीनाथांनी अनन्य प्रेम देऊन निवृत्तिवर पूर्ण कृपा केली. ।। ५ ।। निवृत्तिनाथ महाराज म्हणतात, आम्हाला त्यांनी दिलेल्या श्रीकृष्णोपासनेनें आमचे कुळ त्यांनी ( माझ्याव्दारें ) पावन केले. ।। ६ ।।

**३४. आदिनाथ गुरु सकळ सिद्धांचा । मच्छिंद्र तयाचा मुख्य शिष्य ।। १ ।। मच्छिंद्राने बोध गोरक्षासी केला । गोरक्ष वोळला गहिनीप्रती ।। २ ।। गहिनीप्रसादें निवृत्तिदातार । ज्ञानदेवा सार चोजविलें ।। ३ ।।**



**अर्थ :-** सर्व चौऱ्यांशी सिद्ध त्यांचे मुख्य गुरु आदिनाथ शंकर आहेत. त्यांच्या शिष्यांमध्ये मच्छिंद्रनाथ हें मुख्य शिष्य आहेत. ।। १ ।। नंतर मच्छिंद्रनाथांनी आलेला बोध (ज्ञान) गोरक्षनाथांना दिला. गोरक्षनाथांनी तें ज्ञान गहिनीनाथाकडे वळविले. ।। २ ।। गहिनीनाथांच्या कृपाप्रसादाने दात्यांत सर्वश्रेष्ठ असलेले असे निवृत्तिनाथ त्यांना हें ज्ञान प्राप्त झाले. असे साररूप ज्ञान निवृत्तिनाथांकडून ज्ञानेश्वर महाराजांस (चोजविले) प्राप्त झालें. ।। ३ ।।

**३५. अवघाची संसार सुखाची करीन ।**
**आनंदे भरीन तिन्ही लोक ।। १ ।।**
**जाईन गे माये तया पंढरपूरा ।**
**भेटेन माहेरा आपुलिया ।। २ ।।**
**सर्व सुकृतांचें फळ मी लाहीन ।**
**क्षेम मी देईन पांडुरंगा ।। ३ ।।**
**बापरखुमादेवीवरु विठ्ठलाचे भेटी ।**
**आपुले संवसाटी करूनि ठेला ।। ४ ।।**

**अर्थ :-** या अभंगांत ज्ञानेश्वर महाराज सांगतात, सर्व प्रकारच्या चराचररूपी (जगरूपी) संसार सुखमय बनवून जगरूपी स्वर्ग, मृत्यु, पाताळ हें तिन्ही लोक आत्मानंदाने भरवून टाकीन अशा प्रकारची प्रतिज्ञा करीत आहेत. ।। १ ।। त्यासाठी हे बुद्धीमाये मी त्या भूलोकातील वैकुंठ असलेल्या श्रीक्षेत्र पंढरपूरला जाईन. त्याठिकाणी आपले जे माहेर (आईबाप) असे जे पंढरीनाथ पांडुरंग त्यांना मी भेटेन. ।। २ ।। भेट झाल्याबरोबर पांडुरंगास मी आलिंगन देईन. या सर्व गोष्टी घडून येण्याकरिता जणूं काय पूर्वजन्मातील सर्व पुण्याई उदयास आली व त्या पुण्याईचे फलच या रूपानें मी प्राप्त करून घेईन. ।। ३ ।। बापरखुमादेवीवर जो श्री विठ्ठल त्याची भेट (दर्शन) झाली त्या भेटीमुळे त्याने आपल्या बरोबरीला, (संवसाटी =

योग्यतेला) मला आणून ठेवले. ज्याप्रमाणे श्रीमंत असलेला बाप आपल्या मुलास श्रीमंत करून ठेवतो. त्याप्रमाणे माझा बाप जो श्री विठ्ठल त्याने मला आपल्यासारखे ऐश्वर्यसंपन्न करून ठेवले असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात. ॥ ४ ॥

**३६. आरती ज्ञानराजा । महा कैवल्य तेजा । सेविती साधु संत । मनु वेधला माझा ॥ १ ॥ आरती ज्ञानराजा ॥ धृ ॥ लोपले ज्ञान जगी । हित नेणती कोणी । अवतार पांडुरंग । नांव ठेविले ज्ञानी ॥ २ ॥ प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केले । रामा जनार्दनी । पायी टकचि ठेले ॥ ३ ॥**

हरिः ॐ तत्सत् । हरिः ॐ तत्सत् ॥ हरिः ॐ तत्सत् ॥।



पुंडलिक वरदा हरि विठ्ठल श्री ज्ञानदेव तुकाराम ।

श्री संत ज्ञानेश्वर महाराज की जय ।

जगद्गुरु तुकाराम महाराज की जय ॥

सद्गुरु जोग महाराज की जय ॥।



**सार्थ हरिपाठ नामामृत समाप्त**





प. पु. गुरुवर्य नामदेव म. ढवळे (बाबा)

प. पु. गुरुवर्य अशोक म.पांचाळ (गुरुजी)

# श्री गुरुकृपा आध्यात्मिक वारकरी शिक्षण संस्था

आळंदी देवाची, ता.खेड, जि.-पुणे.



## शालेय शिक्षणासह आध्यात्मिक शिक्षणाची सुवर्ण संधी

प्रवेश देणे सुरु आहे.

संस्थापक / अध्यक्ष

मृदंगाचार्य श्री ह.भ.प. कृष्णा महाराज आवटे

(युवा किर्तनकार, प्रवचनकार)

मोबा. 9922709184 / 9970687077

